बहुतेक धर्मग्रंथ देशभाषेंतच रचले. बौद्धांनीं जसे पाली भाषेंत ग्रंथ केले तसे जैनांनीं मागधी भाषेंत केले. तरी त्यांणीं संस्कृतभाषेला बराच आश्रय दिला. अनेक काव्यें, इतिहास वगैरे ग्रंथ त्यांणीं संस्कृत भाषेंत रचलेले आजकाल प्रसिद्ध आहेत.

याप्रमाणें जैनांनीं जो ग्रंथसंग्रह केला तो आतांपर्यंत अगदीं गुप्त होता. हा प्रकार केव्हांपासून सुरू झाला हें खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं, तरी या देशांतला राजकीय अधिकार जैनांच्या हातांतून गेल्यापासून किंवा आर्यलोकांच्या विद्याकलांचा उच्छेद करणारे मुसलमान प्रबल झाल्यापासून जैनांनीं आपल्या ग्रंथांला कारागृहवास किंवा अज्ञातस्थलनिवास भोगण्यास लावलें असावें यांत कांहीं संशय नाहीं. जैनांनीं दुसऱ्याला न दाखवावे म्हणून म्हणा किंवा वैदिकांच्या अथवा यवनांच्या भीतीनें म्हणा, जे आपले ग्रंथ लपवून ठेवले ते बचावले. महंमदीपरूपी वणव्याच्या ज्वाला त्यांला लागल्या नाहींत हें फार चांगलें झालें. नाहीं तर वैदिकधर्मी लोकांच्या कित्येक उत्तमोत्तम ग्रंथांप्रमाणेंच जैनग्रंथांचीही अवस्था झाली असती. पण ते भयाचे दिवस जाऊन निर्भय रितीनें वागण्यास ज्यांत मोकळीक आहे असें, पवित्र आत्म्याच्या भक्तांचें साम्राज्य सांप्रत या देशांत स्थापित झाल्यामुळें फार दिवस—लोकांला ज्ञानरूपी प्रकाश देणारे असूनही स्वतः अंधारांत पडलेले जैनांचे ग्रंथ हळूहळू आतां प्रकाशांत येऊं लागले आहेत. जैसलमेर, बीकानेर, खंबायत व पाटण येथील जैनांचीं ग्रंथभांडारें फार प्रसिद्ध आहेत. डा० ब्युल्हर व डा० पीटरसन् यांणीं जैनभांडारांत प्रवेश करून त्यांचे अज्ञात असलेले पुष्कळ ग्रंथ लोकांच्या दृष्टीसमोर आणले. पाटण हें श्रीमंत बडोदा सरकारच्या इलाख्यांत असून तेथील ग्रंथसंग्रह विद्याप्रिय श्रीमंत महाराज सरकारांनीं उजेडांत आणण्याचें श्रेय घेतलें हें त्यांस मोठें भूषण आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. असो.

---

१ जैनांचे धर्मग्रंथ मागधी भाषेंतच होण्याचें योग्य कारण काहीं समजत नाहीं. तथापि मगध म्हणजे सांप्रत ज्याला बहार प्रांत म्हणतात त्या देशांत या धर्माचा प्रथम उदय झाल्यामुळें जैनांनीं त्या देशाची भाषा अर्थात् मागधी हिला पवित्र अथवा मुख्य मानली असावी असें वाटतें.

जैनलोकांनीं प्रतिसृष्टी करण्याचा आरंभ करून हजारों ग्रंथ केले असें वर सांगितलेंच आहे, तरी कांहीं थोडीं काव्यें वगैरे खेरीजकरून त्यांचें धर्मग्रंथ वगळले असतां शास्त्रीय विषयावर जे त्यांणीं ग्रंथ केले आहेत ते सर्व वैदिकधर्मी लोकांच्या ग्रंथांची नक्कल किंवा त्यांचें रूपांतर अथवा त्यांतून घेतलेले भाग असें ह्मटलें असतां केवळ अयोग्य होईल असें वाटत नाहीं. जैनलोकांनीं न्याय, व्याकरण, ज्योतिष, अलंकार, वैद्यक, नीति वगैरे शास्त्रीय विषयांवर अनेक ग्रंथ केले आहेत, तरी वैदिकलोकांनीं या विषयांवर जे ग्रंथ रचले होते त्यांचेंच तें रूपांतर आहे. कांहीं थोड्या ठिकाणीं अधिकउणा फेरफार असला ह्मणून ते ग्रंथ स्वतंत्र आहेत असें मुळींच ह्मणतां येणार नाहीं. जैनांत जे अनेक ग्रंथकार झाले त्यांत हेमचंद्र हा प्रमुख झाला. याच्या इतके अनेक विषयांवरचे ग्रंथ दुसऱ्या कोणत्याच जैनानें केले नसतील असें वाटतें. तरी त्याणें जे ग्रंथ केले आहेत त्यांत देशभाषेच्या संबंधानें देशीनाममाला इत्यादि जे त्याचे ग्रंथ आहेत ते व धर्मसंबंधी ग्रंथ वजा केले असतां व्याकरणादि त्याचे ग्रंथ बहुधा वैदिकधर्मी ग्रंथांच्या नकला किंवा निदान त्या ग्रंथांचा आधार धरून तरी ते रचले आहेत यांत संशय नाहीं.

प्रबंध, चरित्रें, रास इत्यादि नांवांनीं प्रसिद्ध असलेलीं वाक्यें वगैरे जैनांनीं स्वतंत्र रचलीं असून त्यांत कित्येक अनुपम आहेत. व त्यांबद्दल जैनग्रंथकार विशेष स्तुतीस पात्र आहेत हें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे.

येथवर आह्मीं जें विवेचन केलें त्यावरून जैनांच्या वाङ्मयाची उत्पत्ति, स्थिति व त्याचें स्वरूप वाचकांच्या लक्षांत येईल. आतां आह्मीं आपल्या मुख्य विषयाशीं वरील विवेचनाचा संबंध जोडतों. जैनांच्या वाङ्मयांत वैदिकांनीं ज्या शास्त्राची मूळ पीठिका रचलेली नाहीं अशा प्रकारच्या कोणत्याही शास्त्रीय विषयावर ग्रंथ रचलेला आढळत नाहीं, असें जें आह्मी वर सांगितलें आहे तें बाकी सर्व अंशांनीं खरें आहे. पण ज्या ग्रंथाचा हा आह्मीं उपोद्घात लिहीत आहों तो ग्रंथ, अर्थात् काव्यकल्पलता, याच्याविषयीं मात्र बाधित आहे हें कळविण्यास फार आनंद वाटतो.

सुमारें गेल्या अकरा वर्षांत जैनवाङ्मयाशीं आमचा जो परिचय झाला व त्यांच्या अनेक ग्रंथांचें अवलोकन झालें त्यांत हा वेळपर्यंत शास्त्रीय असून वैदिकांनीं ज्याची पीठिका स्थापित केलेली नाहीं अशा प्रकारच्या विषयाचा ग्रंथ कायसो हा एकेच आमच्या पाहण्यांत आला. या ग्रंथाचें स्वरूप पुढें विशद करून दाखविलेंच आहे, त्यावरून यालों आम्ही कविताशास्त्र असें म्हणतों तें योग्य आहे, अशी मार्मिक विद्वानांची खात्री होईल. या शास्त्राचा मुख्य विषय म्हटला म्हणजे कविता कशी करावी हें शिकविणें, हा होय. या विषयावर वैदिकांच्या वाङ्मयांत उपयुक्त ग्रंथ असल्याचें सांप्रत दिसून येत नाहीं. आतां हें खरें आहे कीं, यांत व्याकरण, अलंकार, रस इत्यादि शास्त्रांतले विषयच येथून तेथून भरले आहेत, यावरून जर कोणी असें म्हणेल कीं 'हा ग्रंथही वैदिकांचें उच्छिष्टच आहे, तर तें मात्र बिलकूल कबूल करतां येणार नाहीं. कारण कोणतेंही शास्त्र घेतलें तरी त्याचें मूलद्रव्य त्या शास्त्राच्या कर्त्यानें उत्पन्न केलेलें नसतें, हें अगदीं उघड आहे. उदाहरणार्थ व्याकरणादि शास्त्रें घेतां येतील. व्याकरणशास्त्र पाणिनीनें रचलें तरी भाषा व तींतले प्रयोग पूर्वींचे सिद्धच होते. याप्रमाणेंच गौतम आणि काणाद यांणीं न्याय, वैशेषिक शास्त्रें रचलीं तरी त्यांचें मूळ जीं द्रव्यें तीं मूळचींच होतीं. मीमांसाशास्त्राचें मूळ जीं वाक्यें तीं, वैद्यशास्त्रांतल्या औषधी, छंदःशास्त्रांतलीं छंदोबद्ध काव्यें हीं किंवा दुसरींही मूळद्रव्यें त्या

---

१ हें तरी सर्वांशीं खरें म्हणतां येत नाहीं. कारण प्रसिद्ध काश्मीरक महाकवि क्षेमेन्द्र यानें कविकण्ठाभरण नांवाचा याच विषयावर एक ग्रंथ केला आहे. यद्यपि हा ग्रंथ अगदीं लहान आहे तथापि त्यांत कविताशास्त्राचीं मूलतत्त्वें वर्णन केलेलीं असून त्यावरून बराच उपयोग होण्यासारखा आहे. क्षेमेंद्र हा काश्मीरचा प्रसिद्ध राजा अनंतदेव याच्या पदरीं होता. अनंतदेव खिस्ती ११ व्या शतकांत काश्मीरचें राज्य करीत होता, हें राजतरंगिणीवरून स्पष्ट होतें. प्रकृत ग्रंथाच्या मूळ सूत्रांचा कर्ता अरिसिंह १२ शतकांत होता हें पुढें मूळांत सांगितलेंच आहे. त्यावरून कालकृत पौर्वापर्यानें कविकण्ठाभरण हा ग्रंथ आधीं झाला हें उघड सिद्ध होतें व केवळ बाह्य प्रमाणावरच अवलंबून राहणारा, प्रकृत कविताशास्त्र हेंही वैदिकांचें उच्छिष्टच आहे असें म्हणेल. दोन्ही ग्रंथांतील विषयाची मांडणी वगैरेच्या संबंधानें आम्हीं जो विचार केला आहे त्यावरून, प्रकृत ग्रंथ हा कविकण्ठाभरणाची नक्कल अथवा त्याचाच विस्तार म्हणतां येणार नाहीं इतकें आम्ही खात्रीपूर्वक सांगूं, तथापि क्षेमेन्द्राचा तो ग्रंथ अरिसिंहास किंवा अमरचंद्रास, या ग्रंथाच्या रचनेच्या कामीं मार्गदर्शक झाला नाहीं असें खात्रीपूर्वक सांगतां येणार नाहीं.

त्या शास्त्राच्या रचनेच्या पूर्वींचींच आहेत हें विस्तारपूर्वक येथें सांगावयास नको. तेव्हां आमच्या या कविताशास्त्राचें मूलद्रव्य ह्या शास्त्रकारानें केलेलें नाहीं एवढ्यावरूनच जर या शास्त्राला उच्छिष्ट ह्मणावयाचें तर वर सांगितलेल्या व्याकरणादिशास्त्रांलाही उच्छिष्टच ह्मटलें पाहिजे, व आमच्या या शास्त्राचा कर्त्ता जर स्वतंत्र शास्त्रकर्तृत्वाच्या मानास योग्य नसेल तर पाणिनि, गौतम इत्यादिकांलाही तो मान देणें अयोग्य असें ह्मणावें लागेल. तेव्हां एकंदरींत तसे आक्षेप घेणें यांत कांहीं अर्थ नसून हें आमचें कविताशास्त्र अगदीं स्वतंत्र आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. या शास्त्राचें स्वरूप व यांतील विषयांची व्यवस्था वगैरे पुढें सांगण्यांत येईल. त्यापूर्वीं याचा कर्त्ता वगैरे यांच्या संबंधानें थोडेंसें विवेचन करतों.

कविता कशी करावी व तींत वर्णन कसें असावें वगैरे प्रकार शिकविणारें जें हें कविताशास्त्र याचा मूळ उत्पादक अरिसिंह हा होय. या शास्त्राचीं मूळसूत्रें या अरिसिंहानें केलीं, असें याचा वृत्तिकार याणें प्रारंभींच्या श्लोकांत ह्मटलें आहे. याशिवाय दुसरें कांहीं आधारभूत असें वाक्य आढळत नाहीं. हा अरिसिंह केव्हां झाला, व तो कोठें होता, त्याणें कोणकोणते ग्रंथ केले, वगैरे गोष्टींच्या संबंधानें ह्मणण्यासारखी फारशी माहिती मिळत नाहीं. वैदिकधर्मी ग्रंथकारांनीं स्वकृतकथनाच्या संबंधानें जसें मौनाचें अवलंबन केलें आहे तसें जैनांनीं केलेलें नाहीं. जैनांच्या बहुतेक ग्रंथांच्या शेवटीं प्रशस्ति असल्याचें दिसून येतें. पण ह्या कविताशास्त्राचा सूत्रकार जो अरिसिंह त्याच्या ग्रंथाला प्रशस्ति जोडल्याचें दिसून आलें नाहीं. अशा महाविद्वानाचा थोडाबहुत वृत्तांत समजला असता तर मोठा आनंद होता. पण त्याविषयीं निरुपाय आहे. आह्मी या संबंधानें अनेक जैनग्रंथ धुंडाळून पाहिले; पण त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. जैन ग्रंथ पाहतां पाहतां आसड कविकृत विवेकमंजरी या ग्रंथाची टीका बालचंद्र नांवाच्या आचार्यानें केली आहे. तिच्या शेवटीं कांहीं थोडीशी माहिती मिळाली ती येथें देतों.

'श्रीभिल्लमाला नामाना प्राग्वाटा अलं काभूत व विष्णुनारगालक्ष्मीनें

वसतिस्थान, या प्रकारचा एक प्रसिद्ध वंश होता. त्या वंशाला आनंद देणारा कटुकराज नामक मोठा जैन होता. त्याची, बुधासारख्या उत्तम पुत्राला प्रसवणारी चंद्राची जशी रोहिणी तशी अनल्लदेवी नांवाची स्त्री होती. तिच्यापासून त्याला आसड आणि जासड नांवाचे दोन पुत्र झाले. ज्यांनीं धर्मरथ वहात असतां सन्मार्गाचें कधीच उलंघन केलें नाहीं. आसडानें कालिदासाची कीर्तिरूपिणी मशाल अशी जी मेघदूत नामक कृति, तिच्यावर टीकारूपानें स्नेहसेचन करून ती अधिक पेटविली. शृंगारादि नवरसांचा जीपासून स्राव होत आहे अशी आसडाची कविता ऐकून गुर्जर देशच्या राजाच्या सभेंतल्या लोकांनीं त्याला 'कविसभाशृंगार' अशी पदवी दिली. आसडानें जिनांचीं स्तोत्रें गद्य आणि पद्यमय अनेक केलीं, तसेंच ज्यानें उपदेशकन्दली व आह्वानप्रकरण या ग्रंथांच्या मिषानें मोक्षमार्गांतल्या वाटसरांना अक्षय्य पाथेय करून ठेविलें. आसडाच्या, शिवाच्या जशा गौरी आणि गंगा तशा पृथ्वीदेवी आणि जैतलदेवी अशा दोघी स्त्रिया होत्या. जैतलदेवीपासून राजड आणि जैत्रसिंह नामक दोघे पुत्र झाले. व पृथ्वीदेवीला अरिसिंह (या ग्रंथाचा सूत्रकार) नांवाचा मोठा उदार व ज्ञाता असा एकच पुत्र झाला.' एवढा काय तो वृत्तांत मिळतो. यावरून अरिसिंह याचें घराणें मोठें विद्वान् असून ऐश्वर्यवान् होतें, हें उघड दिसून येतें.

ज्या ग्रंथावरून आह्मी वरील माहिती दिली तो ग्रंथ अर्थात् अरिसिंहाचा पिता जो आसड त्याणें केलेल्या विवेकमंजरीची बालचंद्र कवीनें केलेली टीका; ती संवत् १३२२ अर्थात् सन १२६६ त लिहिलेली आहे. आतां हें खरें आहे कीं, ही टीका आसड हयात होता त्या वेळीं झाली किंवा त्याच्या पश्चात् झाली याचा निर्णय करण्यास कांहीं साधन नाहीं. तरी यावरून ख्रिस्ति तेराव्या शतकाच्या उत्तरार्धाच्या पहिल्या पादाच्या सुमारास आमचा मूलसूत्रकार अरिसिंह हा होता, किंवा निदान त्याच्या पूर्वीं तरी होता, अशा प्रकारचें कांहीं अनुमान करण्यास बराच आधार मिळतो. टीकाकार बालचंद्र याणें प्रारंभीं जो उपोद्घात दिला आहे त्यावरून आसडाच्या संबंधानें पुढील माहिती मिळते—

"इह हि महितगुणमहिमा मुदा हिमकरस्य मकरकेतुबाणवित्रस्तजन-

परित्राणवज्रपञ्जरस्य गुर्जरवसुन्धरावदनमण्डलीनगरमण्डनश्रीमहावीर-चैत्यप्रतिष्ठाकृतः सुकृतचरितचमत्कृतदेवेन्द्रस्य श्रीदेवेन्द्रगुरुणा स्वहस्तेन स्वपदविनिवेशितस्य भुवनभद्रङ्करस्य श्रीभद्रेश्वरसूरिगुरोः पट्टनभस्तला-लंकरणकिरणमालिना प्रतिवादिदैत्यदमनशौरिणा श्रीमदभयदेवसूरिणा समुपदिष्टसकलसिद्धान्तसारः संसारवैराग्यरसप्रसरपुष्टचेताः शिष्टसमय-सरसिजवनीविकासनैकरविः श्रीमदासडकविः 'कविसभाशृङ्गार' इत्य-परनामधेयः" ।

यावरून अभयदेवसूरि हा आसडाचा मोक्षमार्गोपदेशक गुरु होता. व त्यावरून आसड याचा पुत्र राजड अकालीं वारल्यावरून त्याणें त्या दुःखाच्या बहरांत अभयदेवसूरीचा आश्रय केला असावा, असें—

' पुत्रे राजडनाम्नि बालकदलीकाण्डोपमे स्वःपुरीम्
याते वात्सल्यस्थलीति विदिते तच्छोकमूढाशयः ।
सम्बुद्धो ऽभयदेवसूरिसुगुरोर्यैरेव वाक्यैरसौ
तैरेवेदमसूत्रयत् प्रकरणं श्रीआसडः सत्कविः ' ॥

या श्लोकावरून दिसून येतें. आसड हा जति झाला नसावा असेंही वाटतें. व आसडाप्रमाणेंच अरिसिंह हाही जति नव्हता असेंच अनुमान होतें. कारण त्या पदवीचे सूचक ' सूरि, गणि, मुनि ' इत्यादि शब्द या उभयतांच्याही नांवांला जोडल्याचें कोठें दिसून येत नाहीं. आसड हा जसा नामांकित कवि होता तसाच त्याचा पुत्र अमरसिंह हाही नामांकित कवि होता यांत संशय नाहीं. याच्या नांवाला जेथें तेथें 'सुकवि' हें विशेषण जोडल्याचें दिसून येतें. असो, आमच्या या महाविद्वान् ग्रंथकाराच्या संबंधानें एवढीच कायती माहिती मिळते.

मूळसूत्रांवर अमरचंद्र अथवा अमर याणें वृत्ति केली आहे. ह्या वृत्तिकारानें आपल्या ग्रंथाच्या शेवटीं पुढील श्लोक लिहिला आहे.

' श्रीमद्वायडगच्छवारिधिविधोः पादारविन्दद्वये
येन श्रीजिनदत्तसूरिसुगुरोः भृङ्गायितम् ।
स श्रीमानमरमौलिरत्नममरः श्रीनीरनीरेश्वर-
प्रःहासमा स्फूर्त काव्यकमलविकासिति मनो संभ्रमाप् ' ॥

यावरून अमरचंद्र हा वायड नांवाच्या गच्छांतला होता. तो जैनांपैकीं श्वेतांबरपंथी असून जिनदत्तसूरीचा शिष्य होता, हें वरील श्लोकावरून उघडच होतें. या अमरचंद्रानें पद्मानंदकाव्य अथवा जिनेंद्रचरित्र नांवाचा आठ हजार श्लोकांचा एक मोठा जंगी ग्रंथ केला आहे. याशिवाय द्रौपदीस्वयंवर, छंदोरत्नावलि, अलंकार-प्रबोध, काव्यकल्पलतापरिमल व प्रकृत ग्रंथ अर्थात् कविशिक्षा अथवा काव्यकल्पलतावृत्ति हे ग्रंथ यार्णे केल्याचें समजून येतें. यांतले शेवटचे दोन ग्रंथ बहुतकरून एकाच विषयावरचे आहेत. काव्य-कल्पलतापरिमलांत या वृत्तीपेक्षां विशेष माहिती दिली आहे. असो. अमरचंद्राच्या संबंधानें याहून अधिक कांहीं माहिती मिळत नाहीं. आम्हांस मिळालेल्या या वृत्तीच्या पुस्तकांपैकीं 'छ' पुस्तकाच्या शेवटीं संवत् १४८४ आषाढ वद्य ४ बुधवार घातला आहे. त्यावरून तें पुस्तक १५ व्या शतकाच्या चवथ्या चरणांत लिहिलें गेलें. तेव्हां यापूर्वी वृत्ति झाली असलीच पाहिजे हें उघड आहे. तरी तिचा बरो-बर शक मिळत नाहीं.

येथवर सूत्रकार व वृत्तिकार या उभयतांच्या संबंधानें त्रोटक माहिती मिळाली ती दिली. आतां या ग्रंथाच्या संबंधानें कांहीं सांगतों. कोणताही ग्रंथ—मग तो लौकिक असो किंवा शास्त्रीय असो—त्याला अनुबंधचतुष्टय हें असलेंच पाहिजे. त्याप्रमाणें या ग्रंथाचें अनुबंधचतुष्टय दाखविलें पाहिजे. विषय तर प्रसिद्धच आहे, व त्याचा प्रतिपाद्यप्रतिपादकभाव हा संबंधही स्पष्ट आहे. उत्तम कविता करतां यावी हें याचें प्रयोजन सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. आतां आम्हांस मुख्यत्वें सांगावयाचें काय तें अधिकाऱ्याबद्दल. हा ग्रंथ सरासरी इंग्रजीवरून होणाऱ्या, संस्कृत एक दोन पुस्तकांच्या ज्ञानावरून आपणास लागेल असें मानिलें तर ती त्याची चूक होणार आहे. कविता कशी करावी तें शिकविणें हा या शास्त्राचा विषय असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. तेव्हां कविता करूं इच्छिणाराला, तो ज्या भाषेंत ती करणार असेल त्या भाषेचें उत्तम ज्ञान असल्यावांचून त्याला कविता करतां येणार नाहीं व केली तरी ती यामध्यधूसारखी

होईल हें उघडच आहे. त्याप्रमाणें, या शास्त्राचा अधिकारी तो मनुष्य होईल कीं, ज्याणें, व्याकरण, थोडा बहुत न्याय, अलंकारशास्त्र, छंदःशास्त्र, व पुराणादि इतर ग्रंथ यांची माहिती मिळविली असेल. यावरून महाभाष्यादि ग्रंथांचीं पारायणें केलेला मनुष्य पाहिजे असें नाहीं तरी तो वैय्याकरण व्युत्पन्न पाहिजे यांत कांहीं संशय नाहीं. याशिवाय तो सहृदय असला पाहिजे हें तर सांगावयास नकोच. तेव्हां अशा प्रकारच्या अधिकाऱ्यानें हा ग्रंथ हातांत घेतला तर त्याचा त्याला योग्य उपयोग होईल. बाकी पुस्तकी ज्ञानानें अधिकारी होण्याची आशा बाळगावयास नको.

यांत ग्रंथकारानें प्रथम सर्वसामान्य व सुलभ जो अनुष्टुप् छंद तो साधण्याविषयींचा प्रकार सांगितला आहे. पुढें निरनिराळ्या इतर छंदांचा अभ्यास कसा करावा तें सांगितलें आहे. पुढें त्या त्या छंदांत उपयोगी पडणारे सामान्य शब्द सांगितले आहेत. पुढें छंदोबद्ध वाद कसा करावा तें सांगितलें आहे. नंतर वर्ण्य वस्तूंची स्थिति सांगून या ग्रंथाचा पहिला प्रतान अथवा पहिला भाग तेथें पूर्ण केला आहे. दुसऱ्या भागाच्या प्रारंभीं रूढ, यौगिक आणि मिश्र याविषयीं विशेष विचार करून पुढें तशा प्रकारचे शब्द सांगितले आहेत. नंतर अनुप्रास व लाक्षणिक वगैरे सांगून दुसरा भाग संपविला आहे. तिसऱ्या भागाच्या प्रारंभीं श्लेषाची व्युत्पत्ति सांगून सर्व वस्तूंचें वर्णन व उद्दिष्ट वस्तूंचें वर्णन सांगितलें आहे. पुढें अद्भुत वर्णनाचा प्रकार सांगून चित्रकाव्याविषयीं माहिती दिली आहे. चवथ्या भागाच्या प्रारंभीं अलंकारांचा अभ्यास कसा करावा तें सांगून वर्ण्य वस्तूंचे आकार, क्रिया वगैरे सांगितले आहेत. पुढें या संबंधाची बारिकसारीक आणखी माहिती देऊन समस्येचें विशेष वर्णन केलें आहे. व शेवटीं समस्यापूरणाचा प्रकार सांगून हा ग्रंथ संपविला आहे.

आम्ही या ग्रंथाचें भाषांतर करतांना सूत्रें आणि वृत्ति या दोहोंपैकीं मुळांत कांहीं गाळलेलें नाहीं. दोहोंनांही भाषांतरें निरनिराळीं दिलीं आहेत. यांत जीं कठीण कठीण उदाहरणें दिसलीं त्यांचा कोठें सारांश, व कोठें अक्षरशः भाषांतर दिलें आहे. सामान्यतः प्रत्येक शब्दाला मराठी

शब्द देण्याचा प्रयत्न केला नाहीं. कारण जरी या ग्रंथाचें मराठींत भाषांतर केलें आहे तरी हा, मराठींत कविता करूं इच्छिणारांच्या उपयोगी पडण्याची विशेषशी आशा नाहीं. फार तर इतकें होईल कीं या ग्रंथाचा ज्याणें चांगला अभ्यास केला असेल, त्याणें जे नियम व विशेष प्रकार सांगितले असतील ते ध्यानांत ठेवून मराठींत नवी कविता रचण्याचा प्रयत्न केला तर करतां येईल. तथापि तोही उपयोग फार थोड्या अंशानें होईल. असें असल्यामुळें प्रत्येक शब्दाला मराठी शब्द दिला असतां उपयोग कांहींच नसून विनाकारण गोंधळ मात्र होणार आहे म्हणून तसें आम्ही केलें नाहीं.

या ग्रंथाचें भाषांतर करण्यास आरंभ यापूर्वीच केला असता, पण डायरेक्टर यांजकडून त्याची जी एक प्रत आम्हांस मिळाली होती तिच्यांत पुष्कळ ठिकाणीं अशुद्धें असून अतिशय गोंधळ असल्यामुळें भाषांतर करण्यास आरंभ करण्यापूर्वी मुळाची एक प्रत शुद्ध तयार करावी लागली. प्राचीन महत्त्वाच्या ग्रंथांचें संशोधन करणें किती कठीण आहे व त्या कामीं किती अडचणी आहेत, हें येथें विस्तारपूर्वक सांगतां येत नाहीं. कारण अनुभव घेतल्यावांचून त्याचें स्वरूप कोणाच्याही लक्ष्यांत यावयाचें नाहीं. असो; मुळाचें संशोधन करण्याच्या कामीं आह्मांस आणखी दोन तीन प्रतींची अपेक्षा लागली, प्रती मिळविण्यास फारच प्रयास पडला. शेवटीं तें काम कसें तरी पार पडलें. पुष्कळ दिवस प्रयत्न करून शेवटीं मूळ ग्रंथाची एक प्रत शुद्ध तयार केली.

याप्रमाणें मूळग्रंथसंशोधन करण्याचा व नंतर त्याचें भाषांतर करण्याचा असा दुहेरी प्रयत्न करून आह्मी या अत्यंत कठीण व उपयुक्त ग्रंथाचें यथामति भाषांतर केलें आहे. आतां तें कितपत चांगलें उतरलें आहे व त्याचा उपयोग किती आहे वगैरे गोष्टींचा निर्णय करणें हें आमचें काम नसून तें मार्मिक वाचकांचें आहे, ह्मणून त्याबद्दल येथें कांहीं लिहितां येत नाहीं. ग्रंथकाराला पित्याचें रूपक देऊन त्याच्या कृतीला कन्येचें रूपक दिलें आहे व जसें मुलीच्या अंगच्या गुणांची व तिच्या वैदग्ध्याची गोडी घेणें अथवा कसोटीस लावून पाहणें हा अधिकार तिच्या जनकाचा नसून भर्त्याचा आहे, त्याप्रमाणें कोणत्याही ग्रं-

याची योग्यता ठरविणें हें वाचकाकडे आहे असें एका संस्कृत कवीचें मत आहे तें अक्षरशः खरें आहे.

शेवटीं इतकेंच सांगावयाचें आहे कीं, या ग्रंथाचा विषय हा अगदीं अपूर्व असून तो दुसऱ्या फारशा ग्रंथांत मिळण्याचा संभव नाहीं. या विषयावर विस्तृत असा हा एकच ग्रंथ उपलब्ध आहे. याशिवाय अमरमंगलाचार्य या जैन पंडितानें कविशिक्षा नांवाचा एक लहानसा ग्रंथ केला आहे. पण त्याचा याच्या इतका उपयोग होण्यासारखा नाहीं. अलीकडे आपल्या देशांत व विशेषतः संस्कृतभाषेंत ह्मणण्यासारखा एकही नामांकित कवि झाला नाहीं. पूर्वीं कवींला जसा राजाश्रय मिळत होता, तसा हल्लीं मिळत नसल्यामुळें तिकडे कोणी लक्ष्य पुरवीत नाहीं, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. अकटोविकट कविता करणारे कवि खंडीभर असले तरी त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. या विद्यादेवीच्या स्वच्छ मंदिरांत तसल्या कुकवितारूप कचऱ्यांचे ढीग पडण्यापेक्षां तें अगदीं रिकामें पण स्वच्छ असलें तर पुरवेल. कविता कशी करावी हेंच अलीकडच्या पुष्कळ विद्वान ह्मणविणारांला माहीत नाहीं. जुन्या समजुतीच्या लोकांना कविता करणें हा एक ईश्वरदत्त गुण आहे असें वाटतें. कित्येकांनीं तर कविवृक्ष रुजून येण्यास आमची भरतभूमि सांप्रत निरुपयोगी झाली आहे, किंवा तिच्यांत तो कसच राहिला नाहीं असेंही ठरविलें आहे. दुसरे कित्येक आह्मीं तसा प्रयत्न करीत नाहीं ह्मणून हीन नाहीं. बाकी उत्तम कविता करतां येणें फारसें कठीण नाहीं, या घमेंडीत आहेत. तात्पर्य अशी स्थिति असल्यामुळें सुकवींचा अभाव झाला आहे. अशा ह्या शोचनीय स्थितींत बडोद्याचे श्रीमंत सरकार महाराज सयाजीराव यांणीं हा ग्रंथ प्रकट करण्याचें श्रेय घेतलें हें फार चांगलें केलें. या ग्रंथाच्या अवलोकनानें कोणाला स्फूर्ति होईल व तो सुकवि निपजेल तर ह्या सर्व प्रयत्नांचें सार्थक होईल यांत संशय नाहीं.

नि. गु.—हा ग्रंथ तयार करतेवेळीं कर्त्यानें आपल्याकडून अशुद्धतेबद्दल जेवढी खबरदारी ठेवविली तेवढी ठेविली; तत्रापि अशुद्धें राहण्याचा संभव आहे, व तीं राहिलींही असतील. छापतेवेळीं कर्त्याकडून पुरें वाचलीं गेलीं असतां ह्मणजे त्यांपैकीं बऱ्याच चुका दुरुस्त झाल्या

असत्या. परंतु कांहीं महत्त्वाच्या नडीमुळें तसें झालें नाहीं; करितां ज्या चुका राहिल्या असतील त्यांबद्दल गुण वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

| | |
|---|---|
| मुंबई,<br>गिरगांव, पोर्तुगीजचर्चलाईन,<br>घरनंबर २०<br>तारीख ३१जुलै १८९०. | सर्वांचा नम्र सेवक,<br>वामनशास्त्रिशर्मा. |

# कविताशास्त्र,

## अथवा

# काव्यकल्पलतेचें मराठी भाषांतर.

---

ॐ नमः श्रीगणेशाय.

### व्याख्याकार अमर याचें मंगळ व ग्रंथप्रतिज्ञा.

विमृश्य वाङ्मयं ज्योतिरमरेण यतीन्दुना ।
काव्यकल्पलताख्येयं कविशिक्षा प्रतन्यते ॥ १ ॥

वाङ्मयरूपी* तेजाचें चिंतन अथवा भावना करून यतींदु† अर्थात् यतींत श्रेष्ठ असा मी अमर, काव्यकल्पलता नांवाची ही कविशिक्षा विस्तृत करतों. सारस्वतरूपी अमृतसमुद्राची पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें वृद्धि करणारा असा जो उत्तम कवि अरिसिंह, याच्या कवितेचें रहस्य ध्यानांत घेऊन कांहीं त्यानें केलेलीं, व कांहीं मीं स्वतः

---

* मराठींत या शब्दाला प्रतिशब्द मिळत नाहीं. 'वाङ्मय' या शब्दात जेवढ्या अर्थांचा समावेश होतो तेवढ्या अर्थांचा समावेश होण्यासारखा प्रतिशब्द इंग्रजी भाषेंत मात्र आढळतो. 'Literature' आणि 'वाङ्मय' हे दोन्ही शब्द अगदीं समानार्थक आहेत. भाषा, व्याकरण, व त्या भाषेंतील इतर सर्व प्रकारचे ग्रंथ यांचा 'वाङ्मय' यांत समावेश करतां येतो.

† वैदिकधर्मीलोकांत 'यति' हें संन्याशाचें नांव आहे. परंतु जैन लोक 'जति' म्हणतात. 'य' च्या ठिकाणीं 'ज' या उच्चार करण्याचा प्रचार उत्तर हिंदुस्थानांत अद्यापि चालू आहे. हा प्रकार केवळ व्यवहारांत बोलतांनाच होतो असें नाहीं, तर वेदवाक्यांचा उच्चार करतांना देखील 'यजेत' पदाच्या ठिकाणीं 'जजेत' म्हणतात, पण लिहितांना 'य' च लिहितात. यावरून मुखांतल्या यति शब्दाचा, जति असा जो उच्चार प्रचारांत आला आहे बोध घ्यावा. 'इंदु' शब्द त्याच्या पुढें आहे तो श्रेष्ठत्वाचा द्योतक आहे.

केलेलीं सूत्रें* घेऊन, कविता करूं इच्छिणारांला त्वरित काव्य करतां यावें म्हणून, त्या सूत्रांची विशेष व्याख्या करतों.

या शास्त्राच्या आरंभीं याचा कर्ता जो अरिसिंहकवि तो, त्याला अभिमत अथवा समुचित असलेल्या इष्टदेवतेला प्रथम नमस्कार करून, शास्त्राचें नांव, व प्रेक्षावान् अर्थात् या शास्त्राचें अवलोकन करणारे जे अधिकारी त्यांनी या ग्रंथाच्या अवलोकनाविषयीं प्रवृत्ति होण्यास अंगभूत जें प्रयोजन, त्यांसहित या ग्रंथांत वर्णन करण्याचा विषय सांगतो.

## मूळग्रंथकार अरिसिंहकवि याचें मंगलाचरण.

वाचं नत्वा महानन्दकरसत्काव्यसम्पदे ।
कविशिक्षामिमां वच्मि काव्यकल्पलताह्वयाम् ॥२॥

वाग्देवीला नमस्कार करून, मोठा आनंद देणारें असें जें उत्तम काव्य याची वृद्धि व्हावी म्हणून काव्यकल्पलता नांवाची ही कविशिक्षा मी वर्णन करितों.

---

* 'सूत्र' या शब्दाचा मूळ अर्थ सूक्ष्म असा होतो. या अर्थावरूनच मराठींत सूत्र हा शब्द प्रचारात आला आहे. संस्कृत भाषेंत प्रत्येक शास्त्राची, अति संक्षिप्त व ज्यांत विशेष अर्थाचा समावेश होईल अशा प्रकारचीं वाक्यें रचलेलीं आहेत, त्याला सूत्रें म्हणतात. प्राचीन ग्रंथकारांनीं याचें लक्षण असें वर्णन केलें आहे कीं, "ज्यांत अक्षरें फार थोडीं असून ज्याची रचना संदिग्ध नाहीं, व ज्यात विशेष सार अथवा अर्थाचें गांभीर्य भरलें आहे, व जें विश्वतोमुख अर्थात् अनेक रीतीनें ज्याची व्याख्या करता येते, इतकेंही असून ज्याचा अर्थ सहज ध्यानांत यावयाचा नाहीं असें असेल, व ज्याची रचना निर्दुष्ट असेल त्याला 'सूत्र' असें म्हणतात." जैन ग्रंथकारांनीं हें वर सांगितलेलें सूत्राचें लक्षण, व वैदिकधर्मी ग्रंथकार त्याचें स्वरूप जसें असावें असें मानतात तसें, घेतलेलें नाहीं. त्यांनीं भगवतीसूत्र, सूयगडांगसूत्र इत्यादि मोठमोठ्या ग्रंथाला देखील सूत्र म्हटलें आहे. त्यावरून सूत्र शब्दाचा मूळचा अर्थ जो सूक्ष्मपणा तो त्याला मान्य नाहीं असें वाटतें. प्रकृत ग्रंथकार जैनधर्मी असल्यामुळें त्यानीं येथें सूत्र या नावाचा उपयोग केला आहे. वैदिकधर्मी ग्रंथकारांच्या मताप्रमाणें या ग्रंथांत जीं मूळवाक्यें घेतलीं आहेत, त्याला सूत्र हें नांव देतां येत नाहीं. काव्यप्रकाश, काव्यादर्श, कुवलयानंद इत्यादि साहित्यग्रंथांत जीं मूळवाक्यें घेतलीं आहेत, तशा प्रकारच्या वाक्याला कारिका म्हणण्याचा वैदिकधर्मी ग्रंथकारांचा सांप्रदाय आहे या ग्रंथांतील मूळ वाक्येंही त्याच प्रकारचीं आहेत, व त्यांला त्यांच्या मताप्रमाणें कारिका म्हणतां येईल.

## याची व्याख्या.

यांत 'वाणीला नमस्कार करून' असें म्हटलें आहे. हें श्रेयप्राप्तीला हेतु आहे, अर्थात् हें मंगलाचरणार्थक आहे. मंगल केल्यानें निर्विघ्नपणें* आरंभिलेल्या शास्त्राची समाप्ती होते. इतर सर्व आनंदांहून मोठा आनंद देणारें असें जें सत्काव्य† त्याची संपत् ह्मणजे वृद्धी, अर्थात् उत्तमकाव्यें पुष्कळ रचलीं जाणें; याकरतां आपण ही कविशिक्षा करतों असा अभिप्राय. काव्यापासून मोठा आनंद कसा होतो असें ह्मणाल तर, त्याच्या रसाचा आस्वाद घेत असतां, तत्काळ उत्पन्न झालेला, जीहून उत्तम असें दुसरें कांहींच नाहीं, अशी परब्रह्मरूप रसाच्या आस्वादाची केवळ सख्खी बहीण, अर्थात् त्याच्या सारखी जी परम प्रीति, तिला महानंद ह्मणतात. सर्व प्रयोजनाचें मूलभूत असें कवि आणि सहृदय‡ यांला मान्य

---

* आर्यलोकांच्या सर्व प्राचीन ग्रंथांच्या आरंभीं मंगल केल्याचें बहुतकरून दिसून येतें. वैदिक ग्रंथांत मात्र याचा नियम आढळत नाहीं, तरी व्याख्याकारांनीं ॐकार आणि अथ याला मंगलार्थक ठरविलें असल्यामुळें, वैदिक ग्रंथांच्या प्रारंभीं ॐकार असतो, व व्याकरणादिकांच्या सूत्रग्रंथाच्या प्रारंभीं अथशब्द असल्यावरून, तेथेंही मंगलाचरण केलें आहे. असें व्याख्याकारांनीं ठरविलें आहे. मंगल केल्यावांचून ग्रंथ निर्विघ्नपणें समाप्तीस जात नाहीं, अशी जी समजूत पडलेली आहे, ती फार प्राचीन काळची असावी असें वाटतें, व जेव्हां ही समजूत प्रचारांत आली, तेव्हां आपल्या पूर्वींच्या ग्रंथकारांचा असाच संप्रदाय असल्याचें दाखविण्याकरितां अथ इत्यादि शब्दांलाही मंगलार्थकत्व दिलें असावें. इतक्यानेंही निर्वाह होईना. कारण कांहीं महाकवींच्या काव्याच्या प्रारंभीं ॐकार अथवा अथ शब्द देखील नसल्यामुळें, केवळ काव्यांतल्या कथेची सूचना अर्थात् वस्तुनिर्देश करणें याला, व आशीर्वाद देणें यालाही, या सदरांत घातलें असावें असें दिसतें कोणीं मंगल केलें नाहीं. व दुर्दैवानें तो ग्रंथकार अकालीं मरण पावल्यामुळें, अथवा अन्य कोणत्याही कारणानें, ग्रंथ अपुरता राहिला असला तर—'मंगल न केल्यामुळें तसें झालें' असें त्याच्या पुढचे ग्रंथकार म्हणू लागले, वस्तुतः हें केवळ मंगलाचरणाची आवश्यकता दाखविण्यास प्राचीन ग्रंथकारांनीं एक उदाहरण पुढें केलें आहे; याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं. कारण मंगल करून ही कादंबरी, रसगंगाधर, शब्दकौस्तुभ, दमयंतिकथा, इत्यादि ग्रंथ अपुरते राहिल्याचें दिसून येतें, तें कां? या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर मिळत नाहीं

† 'सत्' म्हणजे चांगलें, ज्यांत वाचकाला वाईट प्रकारचें उदाहरण मिळेल, अशाला असत् काव्य, व ज्यांत चांगलें उदाहरण मिळेल, त्याला सत्काव्य, असें म्हणण्याचा प्रचार आहे.

‡ 'सहृदय' म्हणजे ज्याला हृदय आहे तो, वस्तुतः हा शब्द मोठा चमत्कारिक आहे. कोणत्याही मनुष्यमात्राला हृदय नाहीं, असें कधींच होण्याचा संभव नाहीं. मग अमका,

असलेलें काव्याचें मुख्य प्रयोजन तें हेंच. आतां या ग्रंथाला 'काव्यकल्पलता' असें म्हटलें आहे, याचा हेतु असा आहे कीं, कल्पलता ही संकल्पमात्रानें इच्छित हेतु पूर्ण करते, म्हणून ती मोठा आनंद देणारी आहे. सत्पुरुषांनीं जिचें वर्णन करण्यास योग्य अशाप्रकारच्या उत्तम काव्यांची वृद्धि या ग्रंथापासून होणार आहे. व तीही इच्छामात्रानें होणार, म्हणून कल्पलतेचें आणि ह्या काव्यकल्पलतेचें सादृश्य आहे. जशी ती कल्पलता इच्छामात्रेंकरून अपेक्षित वस्तूंची प्राप्ती करून देते तशी ही काव्यकल्पलता इच्छामात्रेंकरून अपेक्षित काव्यांची समृद्धी होण्यास कारणीभूत होईल.

यावरून कविता करूं इच्छिणारे हे या ग्रंथाचे अधिकारी.* महानंदाची प्राप्ति, ही हा ग्रंथ करण्याचें प्रयोजन. तत्सहित सत्काव्य हें अभिधेय; अर्थात् या ग्रंथाचा वर्णन करण्याचा विषय, व हा ग्रंथ, हा अभिधायक म्हणजे तो विषय सांगणारा, या उभयतांत अभिधान आणि अभिधेय एतल्लक्षण संबंध आहे.

## शास्त्रसंग्रह.

आतां शास्त्रसंग्रह सांगतों.

या ग्रंथांत छंदःसिद्धि, शब्दसिद्धि, श्लेषसिद्धि आणि अर्थ-

---

सहृदय, असें म्हणण्यांत काय अर्थ आहे? असें कोणास ही वाटेल; पण ज्या साहित्यशास्त्रकारांनीं हा शब्द प्रचारांत आणला; त्याचा हेतु निराळाच आहे. ज्याला काव्यरसाची गोडी समजत नाहीं त्याला—मग तो मनुष्य असो किंवा कोणी ही असो—हृदय नाहीं, असें मुखोंच म्हणतील नाहींत. जसें, वायवल्कनें पशूंत्य आत्मा नाहीं म्हणतात, तसेंच साहित्यशास्त्रकारांच्या मतें काव्यरसाचा आस्वाद घेण्याविषयीं अनभिज्ञ असलेल्याना मुळीं हृदयच नाहीं.

* प्राचीन ग्रंथकारांच्या संप्रदायाप्रमाणें प्रत्येक ग्रंथाला अनुबंधचतुष्टय अर्थात चार अनुबंध असतात. अधिकारी, प्रयोजन, विषय आणि संबंध हें अनुबंधचतुष्टय केवळ मोठ्या ग्रंथामध्य असतें असें नाहीं. लहानसा एखादा निबंध लिहिला, तरी त्यालादेखील हा चौकडी लागू असायाचीच पण लिहिणारा अर्धकच्चा असला, म्हणजे मात्र दुर्दशा होते.. तो अनुबंधचतुष्टयावर लक्ष्य ठेवून. ज्यांस लिहितो येईल, त्यांचा तो लेख बहुतकरून तितक्या योग्यतेचे असतील, व टाळीच न सहकतील, "सरस्वती विभंगत अथवा योग्य होण्याचा संभव नाहीं. हे चार ही अनुबंध क्रमानें सांगितले आहेत, लक्ष्यांत येईल.

सिद्धि नांवाचे अनुक्रमानें प्रतान* असून ते पांच, चार व पांच, आणि सात स्तबकांनीं* विस्तृत केले आहेत.

यांतील स्तबकांची संख्या अनुक्रमानें जाणावी, ह्मणजे छंदःसिद्धिप्रतानांत पांच, शब्दसिद्धिप्रतानांत चार, श्लेषसिद्धिप्रतानांत पांच, व अर्थसिद्धिप्रतानांत सात आहेत, असें जाणावें. ग्रंथावर वेलीचे धर्म आरोपित केले आहेत, ह्मणून प्रतान आणि स्तबक यांचा आरोप केला आहे.

## स्तबकांचीं नांवें.

आतां अनुक्रमानें प्रत्येक प्रतानांतील स्तबकांचीं नांवें सांगतों—

पहिल्या प्रतानांत अनुष्टुप्शासन १, छंदोभ्यास २, सामान्यशब्दक ३, वाद ४, आणि वर्ण्यस्थिति ५, या नांवाचे पांच स्तबक आहेत. दुसऱ्या प्रतानांत—रूढ यौगिकमिश्राख्य १, यौगिकाख्यानमालिका २, अनुप्रास ३, आणि लाक्षणिक ४, या नांवाचे चार स्तबक आहेत. तिसऱ्या प्रतानांत—श्लेषव्युत्पादन १, सर्ववर्णन २, उद्दिष्टवर्णन ३, अद्भुत ४, आणि चित्र ५, या नांवाचे स्तबक केले आहेत. चवथ्या प्रतानांत अलंकाराभ्यास १, वर्ण्य २, आकृति ३, क्रिया ४, प्रकीर्णक ५, संख्या ६ आणि समस्या ७ नांवाचे स्तबक आहेत.

येथवर शास्त्रसंग्रह सांगितला.

---

* या ग्रंथाला काव्यकल्पलता असें नांव दिलें आहे, तेव्हां लता ह्मणजे वेल तिचा प्रतान (फांदी, पानें वगैरेचा संबंध) म्हणजे सामान्यतः फांदी अर्थ म्हटलें, तरी चालेल. हा मुख्य विभाग व त्या प्रत्येक मुख्य विभागाचे स्तबक (फुलांचे गुच्छ) ही नावें अन्वर्थक आहेत.

## छंदःसिद्धिप्रतान पहिला.

### अनुष्टुप्शासनस्तबक १ ला.

काव्य हें छंदोमूलक आहे, या हेतुस्तव प्रथम छंदाची सिद्धि ज्यांत सांगितली आहे, तो प्रतान घेतों. त्यांत अनुष्टुप् हा सर्व छंदांत पहिला छंद आहे, म्हणून अनुष्टुप्शासनस्तबक वर्णन करितों; जसें—

### प्रथम साध्यपद स्थापन करावें.

कविनें प्रथम साध्य, म्हणजे अवश्य योजण्याला योग्य असें जें पद असेल तें घ्यावें. साध्यपदें अनेक प्रकारचीं आहेत, त्यांत एक अक्षर, दोन अक्षरें वगैरे ज्यांत आहेत, अशा प्रकारचीं कांहीं साध्य पदें सांगतों; जसें—

श्रीः, लक्ष्मीः, कमला, कमलजा, जलधिजा, दुग्धाब्धिपुत्री, दुग्धाब्धितनया, दुग्धाम्भोनिधिसम्भूता.

### एकादिद्विलघुद्वयाह्वान.

एक—ह्रस्व अथवा दीर्घ—वर्ण आहे, प्रथम ज्यांच्या; ते 'एकादि' असें असून दोन लघु ज्या पदांत आहेत, तें एकादिद्विलघु असें पद, जलधिजा,* वारिधिजा इत्यादि वर्णद्वयाहून पुढें ठेवावें. जसें—'असौ† जलधिजा देवी, यं वारिधिजा देवी' इत्यादि वर सांगितलेलें जें स्वादि द्विलघुपद (अर्थात जलधिजा हें) त्याच्या पूर्वी, जे दोन वर्ण योजावयाचे, ते दोन ही लघु अथवा पहिला गुरु, आणि दुसरा लघु असे

* या शब्दांत 'ज' कारांतला 'अ'कार लघु असून त्याच्या पुढें 'ल' आणि 'धि' यांतले दोन स्वर लघु आहेत, आणि 'वारिधिजा' यांत 'व' काराच्या पुढचा 'आ'कार दीर्घ स्वर असून 'रि' आणि 'धि' यांतले दोन स्वर ह्रस्व आहेत याप्रमाणेंच 'कमलजा' इत्यादि उदाहरणें जाणावीं.

† या दोन उदाहरणांत अनुक्रमानें 'असौ' आणि 'यं' हे दोन दोन-वर्ण प्रथम ठेविले आहेत.

योजूं नयेत. जसें—'इह* जलधिजा देवी, अत्र जलधिजा देवी' इत्यादि प्रकारची योजना करूं नये.†

**पंचाक्षरपद समासानें, क प्रत्ययानें, विभक्तिभ्रंश होण्याला हेतू असा स्वर पुढें असतां.**

ज्यांत पांच अक्षरें आहेत असें जें तें पंचाक्षर पद; अर्थात 'कुमारपाल, क्षीराब्धिपुत्री' इत्यादि. समासानें‡ अथवा क प्रत्ययानें किंवा जो स्वर पुढें असतां, पूर्वपदाच्या शेवटची विभक्ति लुप्त होईल अशा स्वरानें योजावें; जसें—'कुमारपाल§ भूपालः, 'क्षीराब्धिपुत्रिका सेयं, कुमारपालको राजा, कुमारपाल उल्लासि'.

**चार पांच आणि सहा ह्रस्व ज्यांत आहेत, अशीं पदें विषम पादाच्या शेवटीं.**

ज्यांत चार अक्षरें ह्रस्व आहेत असें पद, 'दशरथ' इत्यादि. पांच ह्रस्व अक्षरांचें पद, 'कमलवन' इत्यादि. सहा ह्रस्व अक्षरांचें पद, 'समवसरण' इत्यादि; अशा प्रकारचीं पदें, विषम म्हणजे पहिला आणि तिसरा या पादांत, अंतभागांत म्हणजे चार तीन किंवा दोन वर्णांहून पुढें योजावे, ते वर्ण बहुतकरून सर्व गुरु असावेत, किंवा शेवटचा वर्ण

---

* या दोनही प्रत्युदाहरणांत 'इह' यांतले दोनही स्वर लघु आहेत, व अत्र यांत पुढें संयुक्त अक्षर असल्यामुळें पहिला जो 'अ' तो गुरु झाला आहे. यामुळें अशा प्रकारचे शब्द ह्रस्वादि द्विलघु शब्दापूर्वी योजूं नयेत.

† हा नियम ज्या साध्य पदांत पहिलें अक्षर लघु किंवा गुरु असून, पुढील दोन अक्षरें लघु येतील, त्यांसच लागू आहे. कारण "अत्र शिवा समायान्ति" इत्यादि प्रकारचे प्रयोग अनेक आढळतात.

‡ येथें 'समास' असें मोघम म्हटलें आहे समासकालीं व्हहत करून मध्यपतित विभक्तीचा लोप होत असतो. म्हणून अमुकच समास असावा, असें सांगितलें नाहीं. तथापि 'अलुक्' समास असला तर चालणार नाहीं. हें ध्यानांत ठेवावें.

§ हीं चार उदाहरणें आहेत, या पहिल्या उदाहरणांत 'कुमारपाल' हें पांच अक्षरांचें पद 'भूपाल' या पदाशीं समास करून योजलें आहे दुसऱ्या व तिसऱ्या उदाहरणांत 'क्षीराब्धिपुत्री' आणि 'कुमारपाल' या दोन पंचाक्षरपदाला 'क' प्रत्यय लावून दाखविला आहे. चवथ्या उदाहरणांत 'उल्लासि' या शब्दांतला पहिला जो 'उ' कार त्याच्या योगानें, त्याच्या पूर्वींचें पंचाक्षर पद 'कुमारपाल' याच्या शेवटच्या विभक्तीचा लोप झाल्याचें दाखविलें आहे.

हेत. मगणांत तीनही अक्षरें गुरु, यगणांत पहिलें अक्षर लघु, रगणांत मधलें अक्षर लघु, सगणांत अन्त्य अक्षर गुरु, तगणांत अन्त्य अक्षर लघु, जगणांत मध्य अक्षर गुरु, भगणांत आद्य अक्षर गुरु, आणि नगणांत तीनही अक्षरें लघु असतात.

या गणांचें स्वरूप खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| | | |
|---|---|---|
| सर्वगुरु | मगण | ऽ ऽ ऽ |
| आद्यलघु | यगण | । ऽ ऽ |
| मध्यलघु | रगण | ऽ । ऽ |
| अन्त्यगुरु | सगण | । । ऽ |
| अन्त्यलघु | तगण | ऽ ऽ । |
| मध्यगुरु | जगण | । ऽ । |
| आद्यगुरु | भगण | ऽ । । |
| सर्वलघु | नगण | । । । |

## मात्रागण.

मात्रागण पांच आहेत. त्यांत अनुक्रमानें दोन, तीन, चार, पांच आणि सहा मात्रा असतात; त्यांचीं नांवें द, त, च, प आणि ष हीं होत.

---

समवृत्त— स्मर तिला रतिलाभ न ईश तो ।
अतनु जो तनुभोत्तम दीसतो ॥
नृपति तो पतिनोत्तम भासती ।
नवरि ते वरितें मधुनें सती ॥

अर्धसमवृत्त—नृपमननगरींत सौख्य दाहा ।
नृपभवनालय स्वर्गनी, घरीं न दाहा ॥
नगरीहि भरली दिसे समग्रा ।
ध्वज शिखरीं लतिकाच पुष्पिताग्रा ॥ १ ॥

विषमवृत्त— कन्या ही कनकोज्ज्वला मनोहरगात्री ।
शशिनिर्मलवदना विशालनेत्री ॥
अती पीनोरु जियेचे ।
अतिशय सुखविति हृदय तरुणाचें ॥ १ ॥

यांचें स्वरूप खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| द | गण | ।। | अथवा | ऽ |
| त | गण | ।।। | ,, | ।ऽ |
| च | गण | ।।।। | ,, | ऽऽ |
| प | गण | ।।।।। | ,, | ऽऽ। |
| ष | गण | ।।।।।। | ,, | ऽऽऽ |

प्रस्तारानें यांतील प्रत्येक गणाचे अनुक्रमानें दोन, तीन, पांच, आठ आणि तेरा इतके भेद होतात.

## प्रस्ताराचा प्रकार.

### वर्णप्रस्तार.

जितक्या अक्षरांच्या वृत्ताचा प्रस्तार करावयाचा असेल, तितक्या गुरु चिन्हांची एक ओळ लिहावी. नंतर दुसऱ्या ओळींत, पहिल्या ओळींतील पहिल्या गुरूच्या चिन्हाखालीं, एक लघूचें चिन्ह लिहून, पुढें वरच्या ओळींत जशीं चिन्हें असतील तशीं लिहावीं, नंतर तिसरी ओळ लिहितांना पूर्वींप्रमाणेंच म्हणजे—पहिल्या गुरुचिन्हाखालीं लघूचें चिन्ह लिहून, त्यापुढें वरच्या ओळींतीलच सर्व चिन्हें लिहावीं. असें करतांना, ज्या ओळींत मागें चिन्हांची जागा रिकामी राहील त्या ठिकाणीं गुरूचें चिन्ह लिहावें. याप्रमाणें सर्व लघुचिन्हांची ओळ निष्पन्न होईपर्यंत करीत जावें, म्हणजे प्रस्तार होतो.

१. प्रस्ताराचा मुख्य उद्देश, नवीन छंद शोधून काढण्याचा आहे. अमुक वर्णांच्या छंदाचे किती व कसकसे भेद होतील, हें प्रस्ताराच्या योगानें समजतें. वर लिहिलेल्या

### मात्राप्रस्तार.

मात्राछंदांत लघु अक्षराची मात्रा एक, व गुरु अक्षराच्या दोन धरण्याचा संप्रदाय आहे. म्हणून जितक्या मात्रांचा प्रस्तार करावयाचा असेल, तितक्या मात्रांच्या गुरुचिन्हांची ओळ लिहावी; पुढें वर्णप्रस्ताराप्रमाणेंच पहिल्या गुरु-खालीं एक लघूचें चिन्ह, व त्यापुढें, वरच्या ओळीप्रमाणें चिन्हें लिहावीं. ज्या ओळींत मागें जागा रिकामी राहील, तेथें जितक्या मात्रांची जागा रिकामी असेल, तितक्या मात्रा, दोन मात्रांबद्दल एक गुरूचें चिन्ह, व एका मात्रेबद्दल एक लघूचें चिन्ह लिहून, ती जागा पूर्ण करावी.

ऱ्हस्वाची मात्रा एक असते, व त्यास लघु म्हणतात.

---

रीतीनें, तीन तीन अक्षराच्या छंदाचा प्रस्तार करून दाखवितों. प्रथम तीन अक्षरांचा प्रस्तार करावयाचा म्हणून, तीन गुरु चिन्हांची एक ओळ लिहिली. नंतर दुसऱ्या ओळींत, पहिल्या गुरुचिन्हाखालीं लघु लिहून, त्यापुढें वरच्या ओळींतील गुरूंचीं चिन्हें लिहिलीं. नंतर तिसऱ्या ओळींत, पुन्हा पहिल्या गुरूखालीं लघूचें चिन्ह, व पुढें वरच्या ओळीप्रमाणें गुरूचें चिन्ह लिहिलें. तेव्हां अर्थात् दुसऱ्या ओळींतील लघु चिन्हाखालची जागा रिकामी राहिली. त्या ठिकाणीं गुरूचें चिन्ह लिहिलें. या रीतीनें पुढें ओळी लिहितां लिहितां आठवी ओळ सर्व लघुचिन्हांची आली. तेथें प्रस्तार पूर्ण झाला. या प्रस्तारानें तीन वर्णांच्या प्रस्तारात दाखविलेल्या प्रकारचे आठ भेद होतात, हें समजलें. याच क्रमानें पाहिजे तितक्या अक्षरांचा प्रस्तार करून घ्यावा.

| १ | २ | ३ | |
|---|---|---|---|
| ऽ | ऽ | ऽ | १ |
| । | ऽ | ऽ | २ |
| ऽ | । | ऽ | ३ |
| । | । | ऽ | ४ |
| ऽ | ऽ | । | ५ |
| । | ऽ | । | ६ |
| ऽ | । | । | ७ |
| । | । | । | ८ |

१. समजुतीकरितां चार मात्रांचा प्रस्तार करून दाखवितों. पूर्वी चार मात्रांचे दोन गुरु होतात, म्हणून दोन गुरु चिन्हांची एक ओळ लिहिली. दुसऱ्या ओळींत पहिल्या गुरूखालीं लघूचें चिन्ह लिहून, पुढें वरच्याप्रमाणें गुरूचें चिन्ह लिहिलें; तेव्हा या ओळींत एक लघु, व एक गुरु अशीं चिन्हें आल्यानें, एक लघूची एक व गुरूच्या दोन मिळून, तीनच मात्रा आल्या, व एक मात्रा कमी पडली म्हणून, तिच्याबद्दल एक मात्रेचा एक लघु मागें लिहिला. तिसऱ्या ओळींत पहिल्या गुरूखालीं एक लघु लिहिला, तेव्हा तीन मात्रा कमी पडल्या म्हणून, दोन मात्रांबद्दल एक गुरु, व एक मात्रेबद्दल एक लघु लिहिला. या कामीं मात्रांचीं चिन्हें भरतांना एवढें लक्षात ठेविलें पाहिजे कीं, तीं चिन्हें उजवीकडून डावीकडे मांडीत जावीं. असो. या क्रमानें ओळी मांडीत गेलें असतां, पांचवी ओळ सर्व लघूंची आल्यानें तेथें, प्रस्तार पूर्ण झाला.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ऽ | | | ऽ | १ |
| ।। | | | ऽ | २ |
| । | ऽ | । | ऽ | |
| ऽ | । | । | | |
| । | । | ।। | | ४ |

आणि तो '।' असा लिहितात. दीर्घाच्या मात्रा दोन असतात, त्यास गुरु म्हणतात. व तो 'ऽ' असा लिहितात. विसर्ग आणि अनुस्वार यांहीं युक्त व्यंजनें हीं दीर्घ मानिलीं जातात. क्वचित् 'अर्ह' इत्यादि जोडाक्षरयुक्त व्यंजनाच्या पूर्वीचें अक्षर लघु असलें तरी, तेंहि गुरु मानलें जातें, तसेंच पादांतीं विकल्पानें लघूला गुरुत्व येतें. पण वंशस्थ इत्यादि कांहीं वृत्तांत येत नाहीं.

अऱ्हादींचें उदाहरण, जसें—

अह्रादि.

यथा "तव ह्रियाऽपऱ्हियो मम ऱ्हीरभू-
च्छशिग्रहेऽपि द्रुतं न धृता ततः।
बहुलभ्रामरमेचकतामसं
मम प्रिये क्व समेष्यति तत्पुनः॥"

जेथें जोडाक्षरांच्या योगानें त्याच्या मागच्या लघु अक्षरावर अंमळ आघात होतो, तें लघु अक्षर, दीर्घ होतें. जसें—

ग्रहैर्भारिपु केशान्वा झषमीन इव ह्रदः।

विशेषणाची योजना.

पूर्वी विशेषणानें बाकीची पूर्ति करावी, असें सांगितलें होतें, त्याप्रमाणें आतां विशेषणाच्या योजनेचा उपाय सांगतों.

---

१ अनुस्वार आणि विसर्ग, सर्वत्र दीर्घ अथवा गुरुत्व मानले जात नाहीत. याविषयीं पूर्वी (पृष्ठ ८ टीप †) पहा.

२. हा असाच शब्द आहे, असें समजूं नये. तर रेफयुक्त हकार घेणें, विवक्षित आहे, असें समजावें.

३. या उदाहरणांत ऱ्हच्या मागचीं अक्षरें दीर्घ होत नाहींत.

वर्ण, आकार, आधार, आधेय आणि क्रिया इत्यादिकांनीं अर्थ (पदार्थ) विशिष्ट होतो.

वर्ण्य पदार्थ वर्ण म्हणजे रंग त्यानें, आकारानें, आधारानें, आधेयानें व क्रियेनें, मूळांत 'आदि' शब्द आहे, त्यावरून परिवारादिकांनीं विशेषणविशिष्ट केला जातो. जसें—

“ पूर्णिमेन्दुः सितच्छायः सद्वृत्तोऽम्बरभूषणम् ।
कलाकलापकलितो नयनानन्दनो बभौ ॥

तसेंच तुल्य कांतीच्या दुसऱ्या पदार्थानें वर्ण्य पदार्थ चारु, बंधु, चोर, रिपु, आणि सुहृत् असल्याचें वर्णन करावें.

वर्ण्य पदार्थ, वर्ण, आकार इत्यादिकानें त्याच्या सारखे जे दुसरे पदार्थ असतील त्यांहीं सुंदर, बंधु, चोर, अथवा शत्रु किंवा मित्र आहे, असें वर्णन करावें. जसें—

“ भवद्यशोभरो भाति स्मेरकुन्देन्दुसुन्दरः ।
हारतारकमन्दारकैलासोदरसोदरः ॥

---

१. या उदाहरणांत पौर्णिमेच्या चंद्राला — ज्याची कांति पांढरी आहे, जो वाटोळा आहे, जो आकाशाचें भूषण आहे, व कलांच्या समुदायानें युक्त आहे, आणि नेत्रांला आनंदकारक आहे; अशीं [illegible] देऊन श्लोकाची पूर्तता केली आहे. मूळांत पूर्वी सांगितलेल्या नियमाप्रमाणें 'पूर्णि[illegible]' [illegible] कवितेंतलें साध्यपद आहे, व बाकीचीं सर्व विशेषणें आहेत. यांत अनुक्रमानें [illegible], व एक [illegible] आधार, आधेय आणि क्रिया यांहीं वर्ण्य पदार्थ जो चंद्र, तो विशेषणविशिष्ट [illegible] आहे सितच्छाय, (पांढऱ्या कांतीचा) यांत त्याचा रंग आला. [illegible] (वाटोळा) यांत आकार आला 'अम्बरभूषणम्' (आकाशाचा अलंकार [illegible] आधारभूत असल्यामुळें, आधाराचा समावेश झाला. [illegible] (कलांच्या समुदा]यानें युक्त)' यानें आकाशाचें आधेय अर्थात् चंद्र [illegible] 'डोळ्यांला आनंद देणारा) ही चंद्राची क्रिया झाली. [illegible] 'आधार इत्यादिकाविषयीं विचार पुढें करण्याचा प्रकार पूर्ण झाला.

कर्पूरपूररुक्चौरः शरदभ्रप्रभारिपुः ।
ऐरावततुषाराद्रिशेषमित्रं क्षमापते ॥"

वर्ण्य वस्तूच्या गुणांहून पुढें 'श्री' शब्द लावून, त्याच्या पुढें युत, भ्राजिष्णु, रोचिष्णु; द्योतित इत्यादि शब्द लावून वर्णन करावें.

वर्ण्य वस्तूच्या गुणवाचक शब्दाहून पुढें 'श्री' शब्द. येथें श्री हा शब्द केवळ उपलक्षणार्थ आहे. त्यावरून त्याचे पर्याय शब्द—लक्ष्मी, छाया, शोभा, कला, कांति व भावप्रत्ययादि लावावे. श्री शब्दाहून पुढें समासानें युत (युक्त) या अर्थानें, व भ्राजिष्णु, रोजिष्णु, द्योतित इत्यादि अर्थानेंही शब्द योजावे. कोठें कोठें श्री इत्यादि शब्द न लावतांही केवळ गुणवाचक शब्दाहून युत इत्यादि अर्थाचे शब्द लावावे, व क्वचित् समास न करतांही अशा प्रकारचे शब्द लावावे. जसें—

"शोणश्रीसंयुतो भानुर्वृत्तलक्ष्मीसमन्वितः ।
अंशूनां शोभया कीर्णो गगनस्थितिसङ्गतः ॥

१ यांत वर्णन करणारा वर्ण्याला (राजाला) म्हणतो—"तुझ्या यशाच्या भर प्रफुल्लित कुन्द व पूर्णचंद्र यांच्या सारखा सुंदर भासतो. तसाच हार, तारा, मंदार आणि कैलास यांच्या उदरांत प्रणत असलेल्या (संकेत) भागाचा तो (यशोभर) बंधु आहे. तो कर्पूराच्या गोळ्याच्या कांतीचा चोर आहे. शरदृतूतल्या आकाशाच्या कांतीचा रिपु आहे ऐरावत हिमाचल आणि शेष यांचा मित्र आहे." यावरून या उदाहरणांत अनुक्रमानें, वर सुचविल्याप्रमाणें भाऊ, बंधु, चोर, शत्रु, आणि सुहृद हे पांचही प्रकार अनुक्रमानें वर्णन करून दाखविले आहेत.

२ हा सूर्य लाल श्रीनें (कांतीनें) संयुक्त (युक्त) आहे. त्याचप्रमाणें वाटोळ्या लक्ष्मीनें (कांतीनें) समन्वित (युक्त) आहे, तसाच किरणांच्या शोभेनें (कांतीनें) व्याप्त आहे.

३ या उदाहरणांतील पहिल्या चरणांत वर सांगितलेल्या नियमाप्रमाणें वर्ण्य जो 'भानु' (सूर्य) त्याचा 'शोणत्व' (लालपणा) रूप जो गुण त्याहून 'श्री' शब्द योजून पुढें 'संयुत' हा शब्द घातला आहे, व यांत त्याचा वर्णरूप गुण घेतला आहे. दुसऱ्या चरणांत 'वृत्त' (वाटोळा) हा त्याचा आकाररूप गुण घेऊन त्याला श्री' या पर्याय शब्द 'लक्ष्मी' व 'युत' याचा समानार्थी शब्द समन्वित हा योजला आहे. तिसऱ्या चरणांत 'अंशु' (किरण)

## छंदोऽभ्यासस्तबक ॥ २ ॥

आतां छंदाचा अभ्यास कसा करावा, तें सांगतों.

अ आ इ ई उ ऊ अं अः हे आठ स्वर, ह्रस्व किंवा दीर्घ या व्यवस्थेनें व क्वचित् एकाच व्यंजनास जोडून, छंदांची रचना करावी.

रचना करावयाची ती अशी करावी कीं, अ आ हे स्वर पहिल्या चरणांत, इ ई हे दुसऱ्या चरणांत, उ ऊ हे तिसऱ्या चरणांत, अनुस्वार आणि विसर्ग हे चवथ्या चरणांत, जेथें लघु पाहिजे तेथें ह्रस्व, व गुरु पाहिजे असेल तेथें दीर्घ, या व्यवस्थेनें क पासून ह पर्यंत जीं व्यंजनें, त्यांतून एक व्यंजन घेऊन, त्याला हे स्वर जोडून, पुनः पुनः त्याचाच उच्चार होईल, अशा रीतीनें पद्य रचावें.

ज्याच्या प्रत्येक चरणांत एकपासून सात अक्षरांपर्यंत अक्षरें असतील, अशा प्रकारचे छंद, प्राचीन कवींनीं बहुत करून, कोठें योजतेले दिसत नाहींत, म्हणून ते आम्हीं येथें लिहिले नाहींत. सर्वत्र प्रचार आठ व त्यांहून अधिक अक्षरें ज्यांच्या चरणांत असतील, अशाच वृत्तांचा विशेष प्रचार असल्यामुळें तशा प्रकारचीं वृत्तें सांगतों.

### अष्टाक्षरविषमवृत्त.

आठ अक्षरांचें विषमवृत्त पथ्यावक्त्र सांगतों, जसें—

"का का का का क का का का
की की की की कि की कि की ।
कू कू कू कू कु कू कू कू
कं कं कं कं क कं क कम् ॥"

याप्रमाणें सर्वत्र व्यंजनांनीं रचना करावी.

## नऊ अक्षरांचा छंद.

**भद्रिका—या वृत्तांत र, न, र हे तीन गण येतात.**

**कामिनी—र, ज, र.**

---

१ छंदःशास्त्रांत एका अक्षरापासून २६ अक्षरांपर्यंतचे छंद सांगितले असून, त्यांस सर्वांस निरनिराळीं नांवें आहेत. त्यांत नऊ अक्षरांच्या वृत्तास बृहती असें नांव आहे. हीं नांवें पुढें जेथल्या तेथें देण्यांत येतील.

२ छंदांचीं याप्रमाणें नांवें लिहून, त्यापुढें गणांचीं नांवें लिहिण्यांत येतील, त्यावरून त्या त्या वृत्तांत ते ते गण असतात असें समजावें. जसें—वर दिलेले 'र, न, र, हे गण आले असतां भद्रिकावृत्त होतें. हें छंदाचें उदाहरण फक्त एकाच चरणाचें आहे, व यापुढें ही प्रत्येक छंदाचें लक्षण अशा युक्तीनें सांगितलेलें आहे कीं, त्या वृत्ताचा पहिला चरण त्यांत बांधला जाईल. ग्रंथाचा विस्तार होईल, म्हणून कर्त्यानें अशी वारकाई केली आहे, पण एक चरण समजल्यानें सामान्य समजुतीच्या वाचकांस त्या वृत्ताचें पूर्ण स्वरूप समजणार नाहीं, म्हणून आम्ही त्या त्या वृत्तांचीं पूर्ण उदाहरणें देतों, असें—

र न र
भद्रिका हरिण लोचना कामिनी सकलसुंदरी ।
पुण्यतो भवति नान्यथा गेहिनी मदनवल्लरी ॥

मुळांत नऊ अक्षरांचें वृत्त, एक भद्रिका आणि कामिनी हीं दोनच सांगितलीं आहेत. पण नऊ अक्षरांचीं वृत्तें दुसरीं अनेक आहेत. त्यांतून कांहीं येथें सांगतों.

हंसमुखी—र, न, स.

उदाहरण.

निंदितो बहुधैः पुरुषैरेभिः विरलं रसनाम् ।
तां श्रये प्रतिपक्षिभिः दूरतस्त्यज हंसमुखी ॥

त्याचप्रमाणेंच न, न, स या गणांनीं क्रमानें, भ, म, स यांनीं मणिबंध, स, ज, र यांनीं भुजंगसंगता इत्यादि वृत्तें होतात.

## छंदोऽभ्यासस्तवक ॥ २ ॥

### आतां छंदाचा अभ्यास कसा करावा, तें सांगतों.

अ आ इ ई उ ऊ अं अः हे आठ स्वर, ह्रस्व किंवा दीर्घ या व्यवस्थेनें व क्वचित् एकाद्या व्यंजनास जोडून, छंदांची रचना करावी.

रचना करावयाची ती अशी करावी कीं, अ आ हे स्वर पहिल्या चरणांत, इ ई हे दुसऱ्या चरणांत, उ ऊ हे तिसऱ्या चरणांत, अनुस्वार आणि विसर्ग हे चवथ्या चरणांत, जेथें लघु पाहिजे तेथें ह्रस्व, व गुरु पाहिजे असेल तेथें दीर्घ, या व्यवस्थेनें क पासून ह पर्यंत जीं व्यंजनें, त्यांतून एक व्यंजन घेऊन, त्याला हे स्वर जोडून, पुनः पुनः त्याचाच उच्चार होईल, अशा रीतीनें पद्य रचावें. १

ज्याच्या प्रत्येक चरणांत एकपासून सात अक्षरांपर्यंत अक्षरें असतील, अशा प्रकारचे छंद, प्राचीन कवींनीं बहुत करून, कोठें योजलेले दिसत नाहींत, म्हणून ते आम्हीं येथें लिहिले नाहींत. सर्वत्र प्रचार आठ व त्यांहून अधिक अक्षरें ज्यांच्या चरणांत असतील, अशाच वृत्तांचा विशेष प्रचार असल्यामुळें तशा प्रकारचीं वृत्तें सांगतों.

### अष्टाक्षरविषमवृत्त.

आठ अक्षरांचें विषमवृत्त पथ्यावक्त्र सांगतों, जसें—

"का का का का क का का का
की की की की कि की कि की ।
कू कू कू कू कु कू कू कू
कं कं कं कं क कं क कम् ॥"

याप्रमाणें सर्वत्र व्यंजनांनीं रचना करावी.

## नऊ अक्षरांचा छंद.

भद्रिका—या वृत्तांत र, न, र हे तीन गण येतात.

कामिनी—र, ज, र.

---

१ छंद शास्त्रांत एका अक्षरापासून २६ अक्षरापर्यंतचे छंद सांगितले असून, त्यास सव्वीस निरनिराळीं नांवें आहेत. त्यांत नऊ अक्षरांच्या वृत्तास बृहती असें नांव आहे. हीं नांवें पुढें जेथल्या तेथें देण्यांत येतील.

२ छंदांचीं याप्रमाणें नांवें लिहून, त्यापुढें गणाचीं नांवें लिहिण्यांत येतील, त्यावरून त्या त्या वृत्तांत ते ते गण असतात असें समजावें. जसें—वर दिलेले 'र, न, र, हे गण आले असता भद्रिकावृत्त होतें. हें छंदाचें उदाहरण फक्त एकाच चरणाचें आहे, व यापुढें ही प्रत्येक छंदाचें लक्षण अशा युक्तीनें सांगितलेलें आहे कीं, त्या वृत्ताचा पहिला चरण त्यात बांधला जाईल. ग्रंथाचा विस्तार होईल, म्हणून कर्त्यांनें अशी चतुराई केली आहे, पण एक चरण समजल्यानें सामान्य समजुतीच्या वाचकांस त्या वृत्ताचें पूर्ण स्वरूप समजणार नाहीं, म्हणून आम्ही त्या त्या वृत्तांचीं पूर्ण उदाहरणें देतों. जसें—

र न र

भद्रिका हरिण लोचना कामिनी सकलसुंदरी।
पुष्पतो भवति नान्यथा मोहिनी मदनमञ्जरी॥

मुळांत नऊ अक्षरांचें वृत्त, एक भद्रिका आणि कामिनी हीं दोनच सांगितलीं आहेत. पण नऊ अक्षरांचीं वृत्तें दुसरीं अनेक आहेत. त्यांतून कांहीं येथें सांगतों.

हलमुखी—र, न, स.

उदाहरण.

निंदितो भुवि पुरन्दरेण्यो विरलदशनाम्।
तां सखे परिणयेद्धि दूरतस्त्यज हलमुखीम्॥

याप्रमाणेंच न, न, स या गणांनीं युक्त, म, म, स यांनीं मणिबंध, स, ज, य यांनीं भुजगसंगता इत्यादि वृत्तें होतात.

| | |
|---|---|
| स्वागता— | र, न, भ, ग, ग. |
| शालिनी— | म, त, त, ग, ग. ४ । ७ |
| उत्थापिनी— | त, ज, भ, ल, ग. |
| लयग्राही— | त, त, त, ग, ग. |
| दोधक— | भ, भ, भ, ग, ग. |
| विदुषी— | स, स, स, ल, ग. |
| मोटनक— | त, ज, ज, ल, ग. |
| भ्रमरविलसित— | म, भ, न, ल, ग. ४ । ७ |

## द्वादशाक्षरी वृत्तें.

| | |
|---|---|
| इंद्रवंशा— | त, त, ज, र. असंयुक्त असावे. |

---

१ याचें उदाहरण—

तार्किका घटपटेति घटेरन् शाब्दिकाः करूठेति रटेयुः ।
मादृशेन सततं स्मरणीयौ रामचंद्रचरणौ रमणीयौ ।।

२ याचें उदाहरण—

ग्रामे वासो नायको निर्विवेकः कौटिल्यानामेकपात्रं कलत्रम्
नित्यं रोगः पारवश्यं च पुंसामेतत्सर्वं जीवतामेव मृत्युः ॥

३ याचें उदाहरण—

पुष्करमंबुदगर्जितधीरैः श्राव्यमदोधकधीकृतिनादैः ।
व्यंजितनादकृतिध्वनिदम्यात्स समाविरन्यात्यतिसुभ्रूः ।

४ "रङ्गे, खलु मल्लकलाकुशलचाणूरमहाभटमोटनकम् ।
यः केलिलवेन चकार स मे संसाररिपुं परिमोटयतु ॥ "

५ याचें उदाहरण—

प्रीत्यै यूनो व्यवदत तपनाः प्रौढध्वांतं दिनमिह जलदाः ।
दोषामन्यं विदधति सुरतक्रीडायासश्रमशमपटवः ॥

६ हे 'जगति' जातीपैकीं आहेत असें समजावें.

७ " दैत्येन्द्रवंशाभिरुदीर्णदीधितिः पीताम्बरोऽसौ जगतां तमोपहः ।
यस्मिन्ममज्जुः शलभा इव स्वयं ते कंसचाणूरमुखा मखद्विषः ॥ "

| | |
|---|---|
| वंशस्थ— | ज, त, ज, र. |
| द्रुतविलंबित— | न, भ, भ, र. |
| तोटक— | स, स, स, स. |
| भुजंगप्रयात— | य, य, य, य. |
| स्रग्विणी— | र, र, र, र. |
| ललिता— | त, भ, ज, र. |
| प्रमिताक्षरा— | स, ज, स, ज. |
| कोकिरव— | स, य, स, य. |

---

१ याचें उदाहरण—

अनेकनारीपरिरंभसंभ्रमस्फुरन्मनोहारिविलाससलालसम् ।
मुरारिमारादुपदर्शयत्यसौ सखीसमक्षं पुनराह राधिकाम् ॥

२ याचें उदाहरण—

सुकुलजन्मविभूतिरनेकधा प्रियसमागम इष्टपरंपरा ।
नृपकुले गुरुता विमलं यशो भवति पुण्यतरोः फलमीदृशम् ॥

३ याचें उदाहरण—

द्विजराजमुखी मृगराजकटी गजराजविराजितमंदगतिः ।
यदि सा दयिता हृदये वसति क्व जप क्व तपः क्व समाधिरतिः ॥

४ याचें उदाहरण—

अरे रे वरेनाधिनाथस्य भूतानभूतानुकंपालवस्तादृशानाम् ।
किमेतावता नास्ति मे तावकीभिरहं सेवको देवकीशावकीय ॥

५ याचें उदाहरण—

वर्जयन्त्या जनैः संगमं कोनवस्तर्कयन्त्याः सुरतं संगमे कांतनः ।
योषयैव स्वरासक्तता पांगयोः सेव्यतेनेकया संगतापांगया ॥

६ सारंध्वनमंकलभोगतर्जनी सुभ्रूलतेव वरलादियोषिताम् ।
सा वै अपम्त्यभिमुखी रणे रणे या भागी ते न लालिता न चोद्धता ॥

७ याचें उदाहरण—

मथिता सखीभिरितिविभ्रतया कबरी बभौ किल कुरंगदृशः ।
मुखचंद्रमंदरसुधामुषिता मिलितेव पातुमसिता भ्रमरी ॥

हरिणीछंदाविषयीं.

पहिलीं सहा अक्षरें — रुचिरमिचरत्, विमलविलसत्, नवनवमिलत्.

पहिल्या सहा अक्षरांच्या पुढें योजायाचीं चार अक्षरें—विभ्राजिष्णुः, संवर्द्धिष्णुः, नव्योन्मीलत्, प्रौढक्रीडत्, चारुदञ्चत्, स्फारस्फूर्जत्.

पहिल्या दहा अक्षरांच्या पुढें योजायाचीं तीन अक्षरें—प्रधान, प्रहास्य, प्रवीण, प्ररूढ, विसर्पि, विसारि, विलासि, विराजि.

दहा अक्षरांच्या पुढें योजायाचीं चार अक्षरें—मनोहर, विकस्वर, नवोदित, शुभोच्छ्रित, प्रकाशित.

दहा अक्षरांच्या पुढें योजायाचीं पांच अक्षरें—वरप्रचरत्, नवप्रसरत्, विसर्पिरुचिः, विलासिमहः.

दहा अक्षरांच्या पुढें योजायाचीं सात अक्षरें—विकस्वरवैभवः, स्फुटस्फुरितोदयः, प्रशस्यरुचिरस्थितिः, श्रिया परिलासितः.

मंदाक्रान्ताछंदाविषयीं.

पहिलीं दोन अक्षरें—उद्यत्, भावत्, राजत्, रङ्गत्, प्रेङ्खत्, क्रीडत्, भ्राजत्.

पहिलीं चार अक्षरें—स्फारस्फूर्जत्, वल्गुवल्गत्, उच्चैश्चञ्चत्, लीलोन्मीलत्, चञ्चलक्ष्मीः.

चार अक्षरांच्या पुढें योजायाचीं दोन अक्षरें—बहु, दृढ, घन, पर.

चार अक्षरांच्या पुढें योजायाचीं तीन अक्षरें—निबिड, बहुल, प्रसृत, स्फुरित, रुचित.

चार अक्षरांच्या पुढें योजायाचीं चार अक्षरें—बहुतम, सुनिबिड, विसृमर.

चार अक्षरांच्या पुढें योजायाचीं सहा अक्षरें—प्रवरविलसत्, रुचिरविचरत्, स्फुटतररुचिः, बहुतममहः.

दहा अक्षरांच्या पुढें सात अक्षरें मालिनी छंदांतल्या शेवटच्या सात अक्षरांप्रमाणें योजावीं.

पहिलीं दहा अक्षरें—उच्चैश्चेतोहरपरिलसत्, विश्वानन्दप्रदसमुदयम्, प्रौढप्रीतिप्रदाविसृमर, हर्षोत्कर्षप्रकटनलसत्.

### शार्दूलविक्रीडितछंदाविषयीं.

पहिलीं तीन अक्षरें—प्रक्रीडत्, प्रोन्मीलत्, प्रस्फूर्जत्, उन्मेङ्खत्, नव्योद्यत्, स्फारश्रीः, चारुश्रीः, लक्ष्मीवान्, स्वच्छायः, शोभावान्.

पहिलीं चार अक्षरें—चञ्चचारु, रङ्गत्तुङ्ग, प्रेङ्खत्तार, स्मेरोद्दाम, विभ्राजिष्णुः, संवर्द्धिष्णु, स्फारस्मेर.

पहिलीं पांच अक्षरें—लीलोन्मीलित, उच्चैश्चुम्बित, स्फारस्मेरित, चारूदञ्चित.

पहिलीं सहा अक्षरें—उद्दामप्रसरत्, प्रोत्तालप्रमिलत्, प्राचीण्यप्रचलन्, नव्योत्सर्पिरुचिः.

सहा अक्षरांच्या पुढें योजायाचीं तीन अक्षरें—प्रचारि, प्रसारि, विसर्पि, मनोज्ञ, प्रशस्य, प्रधान, प्ररोहि, विवर्द्धि, विलासि.

नऊ अक्षरांच्या पुढें योजायाचीं तीन अक्षरें—विलसत्, विकसत्, विहसत्, विचरत्, रुचिर, सुभग, बहुल, विमल, विभव.

बारा अक्षरांच्या पुढें योजायाचीं चार अक्षरें—स्फारस्फुरत्, स्फूर्जन्महाः, क्रीडद्गुणः, प्रौढोद्यत्, रम्योदयत्.

बारा अक्षरांच्या पुढें योजायाचीं पांच अक्षरें—प्रौढप्रसर्पत्, भ्राजिष्णुलक्ष्मीः, भास्वद्विभाव, प्रौढप्रभाव, स्फुटप्रकाश.

पंधरा अक्षरांच्या पुढें योजायाचीं चार अक्षरें—सारद्युति, सर्वद्गुण, रङ्गद्गुणि, तारोद्यत, विभ्राजित, संशोभित.

### स्रग्धराछंदाविषयीं.

पहिलीं चार अक्षरें—स्फारस्फूर्जत्, लीलोन्मीलत्, सर्पन्लक्ष्मीः.

चार अक्षरांच्या पुढचीं तीन अक्षरें—प्रसर्पत्, विराजत्, स्फुटश्री, वरेण्य, प्रशस्य, प्रधान.

सात अक्षरांच्या पुढें योजायाचीं चार अक्षरें—वरतर, स्फुटतम, प्रभूमर, विभूमर, विकसित, विलसित, प्रकटित.

अकरा अक्षरां पुढें योजायाचीं तीन अक्षरें—विलसत्, विकसत्, विचरत्, सुभग, विमल, विशद, बहुल, रुचिर.

चवदा अक्षरांच्या पुढें योजायाचीं चार अक्षरें—वल्गुवल्गन्, चारुचञ्चत्, सारसर्पत्, प्रौढलक्ष्मीः, स्फारशोभ.

अठरा अक्षरांच्या पुढें योजायाचीं तीन अक्षरें—प्रकामम्, नितान्तम्, विसर्पत्, प्रसर्पत्.

इत्यादि याप्रमाणें बाकीच्या छंदांतही योग्य प्रकारें शब्दयोजना करावी.

दीर्घ आणि ऱ्हस्व अक्षरें यांचें द्वंद्व, गण, प्रस्तार इत्यादिकांच्या क्रमानें सर्व प्रकारचे साधारण शब्द सर्व प्रकारच्या छंदांच्या योजनेविषयीं उपयुक्त असे पाहून घ्यावे.

हे व अशा प्रकारचे शब्द मीं (अमरचंद्रानें) केलेल्या काव्यकल्पलतापरिमल ग्रंथांत पहावे.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधायाः शब्दसिद्धिप्रताने प्रथमे सामान्यशब्दो नाम तृतीयः स्तबकः समाप्तः ॥ ३ ॥

---

## वादशिक्षास्तबक चवथा.

आतां वाद कसा करावा तें सांगतों.—

वादांत अनुप्रासयुक्त उक्ति अमून तींत आपला उत्कर्ष व दुसऱ्याची निंदा, कुल, शास्त्र इत्यादिकाविषयीं प्रश्न (दुसऱ्याला) व आपल्या शास्त्राध्ययनाची प्रौढि असावी.

अनुप्रासयुक्त उक्ति पुढें लिहिल्याप्रमाणें असावी, जसें—

जल्पामि कल्पामितश्रीर्भूमो भूमोटनाश्रिताः ।
"वदामि दामि भो जल्पिष्यामि श्यामितशात्रवः ॥
जल्पामो ऽनल्पसम्बोधवादसादरनादभृत् ॥

## अनुप्रासयुक्त शब्द.

याप्रमाणें वादोक्तीची योजना करण्याविषयीं अनुप्रासयुक्त शब्द योजावे.

अनुप्रासयुक्त कांहीं शब्द सांगतों. जसें—

स्फुरि, भुरि, पुरित, तूरीणाम्, हुरि, कुरी, क्रुंगीकृनम्, दम्भ, जम्भ, रम्भ, लम्भ, भम्भ, क्रूर, तूर, पूर, सूर, पुरण, क्षोभ, लोभ, प्रेम, स्थेम, हेम, क्षेम, हेमया, येमया, लेमदः, ते महान्तः, प्राज्ञ, मान्य, धान्य, नान्य, नान्यस्यवस्थापयन्, भूप, स्तूप, धूप, युप, कूप, रूप, सुपकार, भूम्याम्, धूम्याम्, अपन्याम्, मन्याम्, गुर्वी, उर्वी, उर्वीधर, क्षोणी, श्रोणी, श्रोणीकृत, द्रोणी, क्षामाम्, मायाम्, कायाम्, जायाम्, सायान्धतमसम्, व्योम, सोम, रोम, स्तोम, कोमल, लोम, कोमया, यो, महान्, उक्ति, युक्ति, भुक्ति, शुक्ति, सुक्ति, मोहम्, मोहम्, द्रोहम्, दोहम्, कोहङ्कारः,

१ अनुप्रास या शब्द [illegible] परिच्छेदात आहे. [illegible] [illegible] आली की अनुप्रास [illegible] [illegible] [illegible] शब्द [illegible] [illegible] [illegible] आहे.

दोह, लौह, दोहद, सन्देह, सन्दोह, दुग्ध, मुग्ध, स्निग्ध, विदग्ध, दात्र, गात्र पात्र, क्षात्र, मात्र, छात्र, मात्र, शात्रव, गोत्र, स्तोत्र, कौत्र, पौत्र, यौत्र, होत्र, कुर्याम्, माधुर्यम्, चातुर्यम्, तुर्यम्, पुर्याम्, काव्यम्, भाव्यम्, नाव्यम्, क्रव्यम्, वाद, नाद, माद, साद, सादर, छाद, शाद, यादः, पाद, अब्द, शब्द, ध्यान, अध्यान, ध्मान, गान, ज्ञान, त्रान, स्थान, पान, भान, मान, यान, घोष, जोष तोष, दोष, शोष, पोष, लोला, कोला, कोलाहल, गोला, दोला, तोलन, लोलुप, मन्द्र, चन्द्र, तन्द्र, चन्द्रमाः, सान्द्र, पद्र, भद्र, मद्र, वानः, काच, प्राम्लन्, साचि, नाचि, का, चित्, साचि, वाचाल, नाचार, मचाचीत्, शाणी, दाणी, वाणी, पाणी, कृत्या, भारत्या, क्षारत्यागम्, भाषा, शाखा, गावो, नावो, शस्ताव, स्थावर, दाव, पावन, माघ, राव, हाव, सरस्वत्या, सत्यापितनत्या, हत्या, पत्या, मत्या, रत्या, गीर्वाण, गीर्वाण, कविता, भविता, सविता, पविता, रचिता, पाता, नैव, दैव, सैन, धीर, कीर, क्षीर, चीर, जीरक, तीर, नीर, वीर, सीर, हीर, कोटीर, कुटीर, वानीर, महीरमण, आरब्ध, लब्ध, स्तब्ध, वर्ण, कर्ण, अर्ण, वर्णक, तर्णक, अर्णक, पर्णक, अर्णव, स्वर्ण, पण्डित, खण्डित, दण्डित, मण्डित, क्रुद्ध, क्षुद्ध, रुद्ध, शुद्ध, प्रबुद्ध, युद्ध, उद्धव, मालती, भारती, व्रतती, कृती, कवि, गवि, छवि, पवि, रवि, रिक्त, सिक्त, विविक्त, द्वेधा, त्रेधा, वेधा, मेधा, मेधावी, आतुर, चतुर, कोत्र, क्षेत्र, तेत्र, शेत्र, नेत्र, येत्र, क्षत्र, क्षेत्रज, क्षेत्रज्ञ, धर्म, नर्म, नर्म, शर्म, मर्म, कर्म, घर्म, हर्म्य, दक्ष, कक्ष, वक्ष, यक्ष, पक्ष, रक्ष, भक्ष, कुशलय, कल, गल, दल, पल, उपल, फल, पद्दल, हल, गेय, जेय, देय, ज्ञेय, धेय, नेय, पेय, हेय, मेय, विधेय, पारीण, प्रवीण, धुरीण, दर्प, कर्पर, खर्पर, तर्पण, दर्पण, अर्पण, सर्पण, सर्प, तर्प, विनद, छद, पद, मद, रद, गान, तान, स्थान, दान, मान, पान, खान, रान, लान, भान, सर्व, गर्व, खर्व, पर्व, चर्वण, अथर्वण, अहंकार, हुङ्कार, ओङ्कार, आकार, कोप, गोप, आटोप, रोप, क्रोध, बोध, योध, रोध, शोध, उत्कर्ष, अमर्ष, अपकर्ष, काय, उपाय.

## आपला उत्कर्ष वर्णन करण्याचा प्रकार.

जसें—

" ज्योतिषामिव तिग्मांशुस्ताराणामिव चन्द्रमाः ।
सैन्येशानामिव स्कन्दः कवीनामहमुत्तमः ॥"

प्रशंसा जी करावयाची, तिला हेतुभूत निरनिराळ्या जाति, वस्तु वगैरेंत मुख्य मुख्य वस्तु कोणत्या आहेत, तें सांगतों. जसें—वसूंत अग्नि, नक्षत्रांत चंद्रमा, तेजस्व्यांत सूर्य, रुद्रांत शंकर, यक्ष आणि राक्षसांत कुबेर, गंधर्वांत चित्ररथ, पुरोहितांत बृहस्पति, महर्षींत भृगुऋषि, देवर्षींत नारद, सेनापतींत स्कंद, मरुद्देवांत मरीचि, सिद्धांत कपिल, मुनींत व्यास, वेगवानांत वायु, जलजंतूंत वरुण, नागांत शेष, रूपवानांत मदन, सर्पांत वासुकी, कवींत शुक्राचार्य, मनुष्यांत राजा, शस्त्रधाऱ्यांत राम, पांडवांत अर्जुन, सर्व आयुधांत वज्र, पक्ष्यांत गरुड, घोड्यांत उच्चैःश्रवा, हत्तींत ऐरावत, सर्व विद्यांत अध्यात्म विद्या, छंदांत गायत्री, माशांत मकर, मृगांत सिंह, गाईंत कामधेनु, पर्वतांत मेरु, स्थिर वस्तूंत हिमालय, नद्यांत गंगा, सरोवरांत समुद्र, अक्षरांत अंकार, प्राणिमात्रांत चेतना, वेदांत सामवेद, महिन्यांत मार्गशीर्ष,

---

१ वरच्या उदाहरणांत—"तेजांत सूर्य, नक्षत्रांत चंद्र, सेनापतींत कार्तिकस्वामी हे जसे त्या त्या समुदायांत मुख्य आहेत, तसा साऱ्या कवींत मी उत्तम आहें" यांत कवीनें आपला उत्कर्ष वर्णन केला आहे, हें उघड दिसून येतें.

२. वसु या नावाचे देव असून त्यांचा आठांचा गण (जूट) आहे. अग्नीची यांतच गणना आहे.

३. या नावाचे देव असून ते एकादशसंख्याक आहेत. शंकर हा त्या सर्वांत श्रेष्ठ मानला आहे.

४. या नावाचे पन्नास देव आहेत. यांची सविस्तर कथा श्रीमद्भागवताच्या सहाव्या स्कंधांत सांगितली आहे.

यज्ञांत जपयज्ञ, वृक्षांत श्रीवृक्ष (पिंपळ) ऋतूंत वसंत, औषधींत जव, तृणजातींत दर्भ, धातूंत सुवर्ण, इंद्रियांत मनं.

वर सांगितलेल्या मुख्यांच्या उपयोगाचें उदाहरण.[1]

"प्रशस्यः पर्जन्यो भुवनजनने जीवनसृजाम्
सुधांशुर्धिष्ण्यानां पवनपथरत्नं द्युतिमताम् ।
"गिरीणां स्वर्णाद्रिर्मणिसमुदयानां सुरमणि-
द्रुमाणां कल्पद्रुः सुकविनिवहानामहमहो ॥"[2]

दुसऱ्याचें वर्णन करायाचें असतांही त्याचा उत्कर्ष दाखविण्याकरितां वर दिलेल्या मुख्य मुख्य वस्तु उपमानभूत कल्पाव्या. जसें—

"पीयूषमोषधिषु शाखिषु कल्पशाखी
चिंतामणिर्मणिषु धेनुषु कामधेनुः ॥
'ध्यानं तपस्सु सुकृतेषु कृपा व्रतेषु
ब्रह्मव्रतं क्षितिपतित्वमुरीकरोतु ॥
'वृषी विषाणमहतीस्तनोत्यहो

१. येथवर लिहिलेल्या वर्गांतल्या मुख्यांचीं नांवें सांगितलीं; त्याचें कारण इतकेंच कीं, आपली प्रौढी वर्णन करूं इच्छिणाऱ्या कवीनें त्याच्या सारखा आपण मुख्य आहे, असें वर्णन करण्याच्या कामीं याचा उपयोग व्हावा. यांत जीं मुख्यांचीं नांवें सांगितलीं आहेत, तीं सर्व ही भगवद्गीतेच्या विभूतियोग नामक दहाव्या अध्यायांत, व श्रीमद्भागवताच्या अकराव्या स्कंधांत सांगितलीं आहेत; तेथें पाहून आणखीही कित्येक मुख्य वर्णन केलेले आहेत.

२. यांत वर दिलेल्या उदाहरणानमार्गेच उत्तम कवींत आपण श्रेष्ठ असल्याचें वर्णन केलें आहे.

३. या उदाहरणांत औषधींत जसें अमृत, वृक्षांत जसा कल्पवृक्ष श्रेष्ठ, तसें मुद्रे क्षितिपतित्व श्रेष्ठ आहे, असें वर्णन करणारा कवि राजाचें वर्णन करीत आहे. बाकी अर्थ सुलभ आहे.

जयेहया जन्मनि शुम्भकुम्भिनः ।
मया समं तत्त्वमतत्त्ववित्तमो
मुधाकृतोन्मादविवादसादरः ॥
त्वयाब्धेरारब्धं करचरणचारेण तरणं
करेणोपक्रान्तस्थगनकरणं चाम्बरमणेः ।
शिरोऽग्रेण स्वर्गाचलदलनमङ्गीकृतमहो
मदोग्रेण ध्याता यदिह मम वादेन समता ॥
वदामो यद्वामोदरपदसरिद्वीचिपटल-
प्रगल्भाभिर्वाग्भिर्भवति मतिहीने सति पुनः ।
तदन्धाग्रे नृत्यं बधिरपुरुषे मन्त्रकरणं
दृपल्लेपोत्कर्षो गगनहननं मुष्टिनिवहैः ॥
प्रारेभे सिकताकणाशनमिदं मोहामदावानल-
ज्वालालिङ्गनमुग्रशेषतरलव्यालावलीखेलनम् ।

---

१. या उदाहरणांत-बैल इंद्राच्या ऐरावतीवर आपल्या शिंगाचे प्रहार त्याला धिक्कारितां करीत आहे. असा असंभावित स्पर्धेनें वाद करायाला आलेल्या प्रतिवादीयाला तूं व्यर्थ वादाला तयार झालास. असें दाखविलें आहे. या व याच्या पुढच्या उदाहरणांत मुख्यत्वें सामनेवाल्याला धमकावून वश करण्याचा प्रयत्न केल्याचें दिसून येईल.

२. यांत आपण बोलायाला तयार आहों; पण तें आपलें बोलणें सामनेवाल्या अज्ञान असल्यामुळें आंधळ्यापुढें नृत्य, बहिऱ्याशीं मसलत, दगड कुटणें, आकाशावर बुक्या मारणें, वाळूसारखें अगदीं निष्फळ असल्याचें दाखविलें आहे. बाकीच्याहून यांतला प्रकार कांहींसा भिन्न आहे. म्हणजे सामनेवाला मूर्ख असल्यामुळें आपल्या बोलण्याचा कांहीं उपयोग नाहीं असें दाखविलें आहे.

सन्तप्तत्रपुपानकर्म भवता यद्विश्वविश्वम्भरा
विद्वद्वृन्दयपदद्वयस्य मम भो वादोक्तिरङ्गीकृता ॥[1]

पक्षीन्द्रपक्षैरवतंसकांक्षा
स्वर्दन्तिदन्तैः सितकुण्डलाशा ।
गजास्यकुम्भस्थलमौक्तिकौघै-
र्हारस्पृहा मज्जयमीहसे यत् ॥

हस्तप्रस्तरताडनेन हि कृतः कृष्णाहिरुग्यरुरुणः
सिंहः स्वाङ्घ्रिमहाप्रहारविधिना सुप्तः सुखं बोधितः ।
वातस्याभिमुखस्थितेन भवता दावाग्निरुज्ज्वालितो
वादोन्मादवशंवदेन यदहं साटोपमाकोपितः ॥

जातिः सातिशया तव स्फुरति का श्रीसंकुलं किं कुलं
देशः क्लेशनिवेशलेशरहितः कः सुन्दरं किं पुरम् ।
शास्त्रेष्वत्र पवित्रतामतिरपि प्रौढप्रस्दैर्गिरां
भारैः सारतरं विशारद वद प्रीत्यै मम प्रोन्मदः ॥

किं त्वं लक्षणदक्षिणोऽसि किमु वा साहित्यसौहित्यभू-
श्छन्दःकन्दलितोऽसि किं च किमु वाऽलङ्कारसारस्थितिः।

---

१. या उदाहरणात सामनेवाल्याला तूं माझ्याशीं वाद करायाला आलास, ही अघटित गोष्ट किंवा अशक्य गोष्ट करण्याचें आरंभलेंस. असें दाखविण्याकरितां रेती खाणें, अग्नीच्या ज्वालांत मिठी मारणें, इत्यादि उपमानें दिलीं आहेत. या पुढील दोन श्लोकांतही असा प्रकारचेंच वर्णन आहे.

२ या श्लोकांत सामनेवाल्याच्या जात, त्याचें कुल, नगर, श्रीमंती, शास्त्रज्ञान वगैरे विचारिलें आहे.

किं वा तर्हि वितर्ककर्कशमनाः किं ज्ञानविज्ञानवान्
यज्ज्ञानासि सभां जयेयमिति भोः सर्वं सगर्वं वद ॥
सर्वव्याकरणार्णवान्तरमपि क्षोभोद्यमैर्निर्मला
छन्दःप्रावरणोत्थितावपि विधाऽलङ्कारतारप्रभा ।
षट्कर्ममकरन्दसङ्गसुरभिः स्फूर्जत्कलाशालिनी
काव्येषा मम शेमुषी सुमनसां स्वान्तानि हन्तुं क्षमा ॥
अग्रे यस्य न कोऽपि रोपितपदो विद्वान् परप्रातिभ-
प्रौढिप्राभृतकीकरोति निभृतं भानोरिवोडुव्रजः ।
सोऽहं मोहतमःप्ररोहदमनप्रागल्भ्यसम्यक्स्फुर-
द्वाग्दीप्तिप्रसरप्रकाशितसुहृद्वृन्दारवृंदारकः ॥

## दुसऱ्याची निंदा.

जसें—

कृष्णसर्पस्य मण्डूकश्चपेटां दातुमुद्यतः ।
रे मूढ यन्मया सार्धं विवादं कर्तुमिच्छसि ॥

या प्रमाणेंच बैल आपल्या शिंगांनीं इंद्राच्या हत्तीला प्रहार करण्याविषयीं इच्छा करितो. हत्ती दांतांनीं पर्वताला पाडण्याविषयीं, ससा दातांनीं सिंहाच्या मानेवरचे केंस ओढण्याविषयीं, उंदीर आपल्या दांतांनीं मांजराच्या दाढा पाडण्याविषयीं उद्युक्त झाला, इत्यादि प्रकारें दुसऱ्याची निंदा करावी.

---

१ या श्लोककाराने स्वतःचे विद्वत्तेविषयी 'तुला माहीत आहेत काय?' म्हणून लिहिले आहे. व पुढच्या श्लोकांत आपली योग्यता दाखवून सभाजिंकण्याचा निश्चय केला आहे.
२ पाठांतर ... आहे.

तसेंच—

" तुलया तोलनं मेरोः करेण स्थगनं रवेः ।
मानं व्योम्नोऽङ्गुलीभिर्यत् प्रेप्सुर्वादेन मज्जयम्[1] ॥"

याप्रमाणेंच बाहूंनीं समुद्र तरण्याविषयीं, मस्तकानें पर्वताचा भेद करण्याविषयीं, पायांनीं नदीच्या प्रवाहाच्या गतीच्या उलट चालण्याविषयीं इच्छा करितो इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

तसेंच—

" इदं पाषाणदलनमन्धस्यालेख्यदर्शनम् ।
मन्त्रणं बधिरैर्मूढ त्वया वादं तनोमि यत् ॥"

याप्रमाणेंच—जलाचें विलोडन करणें, आकाशाचें हनन करणें, निर्धनाला द्रव्यदंड करणें, मृगतृष्णेंत पाणी पिण्याची इच्छा करणें इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

तसेंच—

" खड्गधाराग्रसञ्चारमयश्चणकचर्वणम् ।
अङ्गारशयनं प्रेप्सुर्यत्त्वं मज्जयमीहसे ॥"

याप्रमाणेंच रेतीचे कण खाणें, तापलेल्या शिशाचा रस पिणें, दावाग्नीच्या ज्वालांचें आलिंगन करणें, कृष्णसर्पाच्या तोंडाचा मुका घेणें, नागाशीं खेळणें इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

तसेंच—

" करेण काङ्क्षसि क्रष्टुं भूस्थः स्वर्गद्रुमञ्जरीम् ।
वादेन यदसौ मूढ जिघृक्षुर्मज्जयाश्रियम्[2] ॥ "

---

१ यांत तुला वादांत जय मिळणें असंभवित आहे, असें मेरूचें तुलन इत्यादि उपमानांनीं सिद्ध करून दाखविलें आहे. पुढचीं उदाहरणेंही या प्रकारचींच आहेत.

२ या उदाहरणांत तूं मूर्खपणानें उगीच मला वादांत बोलावून आपलें अहित करून घेण्याचा प्रसंग आणतोस, असें वर्णन करून दाखविलें आहे. हा व याच्या पुढचा श्लोक उजानाचें असल्यामुळें विशेष लिहिण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

याप्रमाणें—शेषाच्या मस्तकावरचा मणि घेण्याची इच्छा करणें, गरुडाच्या पंखांचा तुरा, ऐरावताच्या दातांचीं कुंडलें*; यमाच्या रेड्याच्या पाठीवरून पाण्याची पखाल आणणें, सिंहाच्या दाढेनें पाठीची खाज घालविण्याची इच्छा करणें इत्यादि प्रकारचें वर्णन करावें.

तसेंच—

"सुखसुप्तस्त्वया सिंहः पादाघातेन बोधितः ।
यदहं वादवचनाटोपेन परिकोपितः ॥"

याप्रमाणें—थापट मारून काळ्या ( कृष्ण ) सर्पाला फणा काढायाला लावला, वाऱ्याच्या गतीसमोर गवताची गंजी पेटविली, शरीराला सुख होण्याकरितां खाजकोलतीच्या वेलीला मिठी मारली, दुर्वासऋषीला वाईट बोलून राग आणिला. इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

## कुल, शास्त्र इत्यादिकांविषयीं प्रश्न.

जसें—

"कस्मिन् कुले तवोत्पत्तिः कुत्र शास्त्रे परिश्रमः ।
कस्मादकस्मात् प्राप्तो ऽत्र सर्वमेतत्प्रकाश्यताम् ॥"

आपल्या शास्त्राध्ययनाची प्रौढी.

"लक्षणे मम दक्षत्वं साहित्ये संहिता मतिः ।
तर्के कर्कशतात्पर्यं क्व शास्त्रे नास्ति मे श्रमः ॥"

इत्यादि प्रकारच्या अनेक गोष्टींचा उल्लेख करून सर्व प्रकारच्या छंदांत कविता रचून याद करण्याचा अभ्यास करावा.

---

* गुजराथ, मारवाड, वगैरे प्रदेशांत नवरीस बायका हस्तिदंताचीं कानांत कुंडलें. हातात चुडे वगैरे घालतात हें सामान्य आहे. ह्याला अनुसरून ग्रंथकारानें हें वर्णन केलें आहे. इतर काव्यांत अशा प्रकारचा उल्लेख कोठें आढळत नाहीं.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधायाः शब्दसिद्धिप्रताने प्रथमे वादस्तबको नाम चतुर्थः स्तबकः समाप्तः ॥ ४ ॥

## वर्ण्यस्थिति स्तबक ५ वा.

यानंतर वर्ण्य विषय सांगतों. जे मोठ मोठया कविराजांनीं महाकाव्यें इत्यादि प्रबंधांत संकलित केले आहेत तेच.

जसें—राजा, अमात्य, पुरोहित, राजस्त्रिया, राजपुत्र, सेनापति, देश, गांव, नगर, सरोवर, समुद्र, नद्या, बागा, अनेक अरण्यें, आश्रम, मसलती, दूत, लढाई, स्वारी, मृगया, घोडे, हत्ती, सूर्य, आणि चंद्र यांचे उदय, विवाह, स्त्रीपुरुषांचा विरह, स्वयंवर, सुरा, पुष्पें, जलक्रीडा, सुरत, इत्यादिकांचें वर्णन करावें.

राजाचें वर्णन करतांना विद्या, नीति, शक्ति, बल ( सैन्य ), चोरादिकांचा नाश, प्रजेचें शिक्षण, प्रजेचा अनुराग, धर्म, काम, आणि अर्थ यांचें योग्य सेवन, त्याचें शत्रूवर प्रयाण, लढाईचा प्रसंग, तरवार इत्यादि शस्त्रें, शत्रूंचा पराभव, अरीचा नाश, शत्रूंचा पर्वतादिकांवर वास, शत्रूची नगरी ओस पडणें, राजाचें तेज, ऐश्वर्य-दान-कीर्ति इत्यादि त्याच्या अंगचे गुण, तसेंच त्याचें रूप इत्यादिकांचें वर्णन करावें.

मनुष्याचें जेव्हां वर्णन करावयाचें असेल, तेव्हां त्याच्या मस्तकापासून एकेका भागाचें वर्णन करण्यास आरंभ करावा

अमात्याचें वर्णन करतांना त्याची नीति, शास्त्रज्ञान, स्वभावस्थिरता, बुद्धीचें गांभीर्य, शक्ति, त्याचा तरवारबहादूरपणा, निर्लोभता, त्याच्यावर लोकांची प्रीति, विवेकीपणा इत्यादिकांचें वर्णन करावें.

मंत्री असावयाचा तो आपल्यावर भक्ति ठेवणारा, उत्साही, कृतज्ञ, धार्मिक शुद्धआचरणाचा, कर्कशपणारहित कुलीन, स्मृति इत्यादि जाणणारा, सत्यभापणी, विनीत, मोठ्या मनाचा, निर्व्यसनी, क्षुद्रस्वभाव नसलेला, सत्त्वधीर, प्राज्ञ, शूर व यजमानाचा हुकूम वेळच्यावेळीं अमलांत आणणारा असा असून सर्व रीतींनीं ज्याची परीक्षा केली आहे, असा; आपल्याच देशांत ज्याचें घरदार, जन्म वगैरे आहे, असा; राजाचा, आपला व लोकांचा अर्थ साधणारा, निस्पृही, शांत, निष्फल भापण न करणारा, समर्थ, सर्वदर्शनें अवलोकन केलेला, हाताखालच्या लोकांला यथायोग्य अधिकार देणारा, राजनीति-आत्मज्ञान-व्यापार-उदीम-दंडनीति इत्यादि विषयांवर विशेष श्रम केलेला; असा पिढीजादा असून, जातीनें वैश्य अशा प्रकारचा राजानें दिवाण केला तर राज्यवृद्धिकर असा होईल.

पुरोहिताचें वर्णन करतांना स्मृति, वेद, शुभाशुभनिमित्तें (शकुन वगैरे) आपत्तीचा प्रतीकार, दंडनीतिज्ञता, शुद्धता, धर्मशीलता, कुलीनता इत्यादिकांचें वर्णन करावें.

राणीचें वर्णन करतांना अनेक कलांत तिची निपुणता, चातुर्य, लाजाळू स्वभाव, व्रतादिकांचें आचरण, रूपलावण्य, सौभाग्य, प्रेम, शृंगार, मदन, वेणी, बुचडा, भांग, ल-

लाट, कान, नासिका, गाल, अधरोष्ट, नेत्राश्रु, कटाक्ष, दंत, मधुर भाषण, कंठाचें माधुर्य, गळा, बाहु, हात, मांड्या, कमर, वळकट्या, रोमावली, ढुंगण, पोटऱ्या, चालण्याची तऱ्हा, नखें इत्यादिकांचें अनुक्रमानें वर्णन करावें.

राजकुमाराचें वर्णन करतांना शस्त्र, शास्त्रें, श्रीमंती, कला, बळ, गुणाचें महत्त्व, उन्नति, बाह्याली, खुरली, राजभक्ति, सुभगपणा इत्यादिकांचें वर्णन करावें.

सेनापतीच्या वर्णनांत—मोटा उत्साह, स्वामिभक्ति, उत्तम बुद्धि, निर्भयपणा, वाहनें, युद्धशास्त्र व शस्त्रें यांच्यावर विशेष अभ्यास, युद्धांत विजय इत्यादिकांचें वर्णन करावें.

देशाच्या वर्णनांत—अनेक खनिजपदार्थांच्या खाणी, व्यापाराच्या वस्तू, धान्योत्पत्तीचीं स्थानें, रत्नादिकांच्या खाणी, किल्ले, गांव, लोक इत्यादिकांची दाटी, नद्यांची विपुलता इत्यादिकांचें वर्णन करावें.

गांवाच्या वर्णनांत धान्य, वेली, वृक्ष, तळीं, पशूंची पुष्टता, शेतें, मळे, धान्याचे वाफे, गांवढळ स्त्रियांचे साधे विलास इत्यादिकांचें वर्णन करावें.

नगराच्या वर्णनांत तटबंदी, खंदक, बुरुज, वेशी, लढाईची जागा, मोटे मोठे बंगले, राजमार्ग, सुंदर पाणपोई, बगीचे, वेश्यांची वस्ती इत्यादिकांचें वर्णन करावें.

सरोवराच्या वर्णनांत कमलें, भ्रमर, उदक, त्यावरच्या लाटा, हत्तींचा त्यांत संचार, हंस, चक्रवाक इत्यादि पक्ष्यां-

चें त्याच्या तीरावर फिरणें, तीरावरची बाग, स्त्रिया-बाटसरू इत्यादिकांच्या क्रीडा वगैरेचें वर्णन करावें.

समुद्रांत द्वीप, पर्वत, रत्नें, लाटा, गलबतें, जलजंतु, जग बुडविणें, भागीरथीचा त्याच्याशीं समागम, चंद्रोदयापासून वृद्धि, वडवाग्नीपासून नाश, मेघाला पाणी पुरविणें इत्यादिकांचें वर्णन करावें.

नदीच्या वर्णनांत तिचा समुद्राशीं संगम, लाटा, जल, त्यांत क्रीडा करणारे हत्ती, पद्में, भ्रमर, हंस-चक्रवाकादि पक्षी, तीरावरचे वृक्ष इत्यादिकांचें वर्णन करावें.

बागेच्या वर्णनांत-तींत फिरण्याचे मार्ग, सर्व प्रकारचीं फळें-पुष्पें-लता-वृक्ष कोकिल-भ्रमर-हंस इत्यादिकांची क्रीडा, लहान लहान तळीं, पांथांचें तेथें बसणें वगैरे वर्णन करावें.

पर्वताच्या वर्णनांत-मेघ, औषधि, धातु, वेळू, किन्नर, पाण्याचे झरे, शिखरें, पायथा, गुहा, रत्नें, अरण्यांतले जीव, डोंक्यावरची सपाटी, जवळची भूमि इत्यादिकांचें वर्णन करावें.

अरण्याच्या वर्णनांत-सर्प, वराह, हत्तीचे यूथ, सिंहादि पशु, वृक्ष, कावळे, घुबड, कपोत, इत्यादि पक्षी, भिल्ल-भल्ल, दावाग्नि, पर्वत इत्यादिकांचें वर्णन करावें.

आश्रमांत-अतिथिपूजन, मृगांचा विश्वास, हिंस्र पशूंचा शांतपणा, होमाचा धूर, मुनिबालकांचा वेदघोष, मुनिकन्यकांचें झाडांला पाणी घालणें, वल्कलें वाळत असलेले वृक्ष इत्यादिकांचें वर्णन करावें.

मसलतींत-सेनादि पांच अंगें, प्रभुशक्ति इत्यादि शक्ति-

त्यादि त्यांचीं उत्तम लक्षणें, त्यांची अतिशय त्वरित व घोराची गति, मंडलांत फिरणें, त्यांच्या तोंडांतून निघणाऱ्या फेंसाचें वर्णन करणें, हें असावें.

हत्तीचें वर्णन करायाचें असलें म्हणजे—हजार अथवा असंख्य वीरांशीं युद्ध करण्याचें त्याचें सामर्थ्य, तसाच त्याचा उंचपणा, कानाची चपलता, शत्रूच्या सैन्याचा व्यूह[1] फोडण्याचें सामर्थ्य, त्याच्या गंडस्थळांतील मोत्यें, व मस्तकावरून वाहणाऱ्या मदावर संचार करणारे भ्रमर, यांचें वर्णन करावें.

वसंतऋतूंत—झोंपाळा, कोकिल, वायु, सूर्याची गति, वृक्षाला नवीन फुटणारे अंकुर, जाईवांचून इतर जातीच्या पुष्पांचा बहर, आंब्याचा मोहोर आणि भ्रमराचा झंकार इत्यादिकांचें वर्णन करावें.

ग्रीष्मऋतूंत—पाडळी, मोगरी, सूर्याचा ताप, सरोवर, प्रवाश्याला पडणारा शोष, वावटळें, सत्तु[2], पाणपोई, तीवरची अभिकारिणी स्त्री, मृगतृष्णा, आंबे इत्यादि फलांची पक्वता वगैरेंचें वर्णन करावें.

वर्षाऋतूंत—मेघ, मोराचा आनंद, हंसाचें प्रयाण, चिखल, आळवी इत्यादि कंदांची उत्पत्ति, जाई, कलंब, केतकी,

---

१ हा शब्द मराठींत अगदीं अपरिचित आहे. लढाईच्या वेळीं फौज नीट व्यवस्थेनें लावणें याला संस्कृत भाषेंत व्यूह म्हणतात. व्यूह अनेक प्रकारचे असून त्यांचीं नांवें हीं निरनिराळ्या प्रकारचीं आहेत. चक्रव्यूह वगैरे यांतलेच भेद आहेत.

२ हा शब्द महाराष्ट्र लोकाच्या प्रचारांतला नाहीं. उत्तर हिंदुस्थानात जसें सातान्याकडे ओंधळ्यांच्या लाह्यांचें पीठ, दहीं, ताक, गूळ वगैरेशीं खातात, तसेंच जवाचें पीठ अथवा गहूं, हरभरे याचें मिश्रणाचें पीठ कालवून खातात, त्याला सत्तु म्हणतात. संस्कृतात याला सक्तु म्हणतात. हा शब्द कग्वदांतही आढळतो. प्रवासी लोक वाटेंत क्षुधेची शांति करण्याच्या कामीं याचा फार उपयोग करतात.

झंझावात अथवा सोसाट्याचा वारा, नद्या, तसेंच शेतकी करणाराचा आनंद इत्यादिकांचें वर्णन करावें.

शरदृतूंत चंद्राच्या प्रकाशाची स्वच्छता, सूर्याच्या प्रकाशाची स्वच्छता, उदकाची स्वच्छता, अगस्तीचें दर्शन, हंस, बैलांची मस्ती, सप्तपर्ण अथवा सातवीण, कमल, पांढरें आकाश, पिकलेलें धान्य, मोरांचे पंख व त्याचा मद यांची हानि यांचें वर्णन करावें.

हेमंतऋतूंत–दिवसाचा लहानपणा, थंडी, जव, तृण, मर्वा, बर्फ इत्यादिकांचें वर्णन करावें.

शिशिरऋतूंत–शिरस, धूमारि, कुंद, कमलांचा दाह, मोरांची रति, क्रीडेविषयीं उत्कंठा यांचें वर्णन करावें.

सूर्याचें वर्णन करायाचें असलें ह्मणजे–त्याच्या प्रकाशांत लाली दिसणें, सूर्यकांतमणि, चक्रें, कमल, आणि पथिकांचे नयन यांची त्याच्या ठिकाणीं प्रीति, नक्षत्रें, चंद्र, दिवा, औषधि, घुबड, अंधकार, चोर, कुमुद, आणि जारिणी स्त्रिया यास त्याच्या प्रकाशापासून होणारी पीडा यांचें वर्णन करावें.

चंद्राच्या वर्णनांत–जारिणी स्त्रिया, चक्रवाक, कमलें, स्त्रियांचा मान, विरही जनांची स्थिति, अंधकाराची निवृत्ति, उज्ज्वलता, समुद्र, लोकांचे नेत्र, रात्रिविकासी कमलें, चकोर, चंद्रकांतमणि आणि स्त्रीपुरुषें यांची त्याच्या ठिकाणीं प्रीति यांचें वर्णन करावें.

---

१ छापील पुस्तकांत 'शिखिपक्षमदपात' व लेखी पुस्तकांत 'शिखिपक्षमदह्रासः' असे पाठ आहेत. दोहोंचाही अर्थ एकच दिसतो.

२ छापील पुस्तकांत 'धूमाहि' असें आहे. धूमारि अथवा धूमाहि दोन्ही शब्दांचा बरोबर कांहीं अर्थ लागत नाहीं.

३ अतिशय थंडी पडल्यानें कमलें जळून जातात. हें प्रसिद्ध आहे

विवाहांत–मंगलस्नान, शुभवस्त्रें, अंगावरचे अलंकार, त्रयी अर्थात् ऋग्वेद-यजुर्वेद आणि सामवेद यांचा घोष, वेदी म्हणजे बोहलें, संगीत, नक्षत्रांचें अवलोकन, लाजाहोम, मंगलारती इत्यादिकांचें वर्णन करावें.

विरहांत–शरीराचा ताप, निश्वास अथवा दुःखाचे सुस्कारे, चिंता, मौन, शरीराची कृशता, कमलपानांची शय्या, रात्रींचा मोठेपणा भासतो तो, जागरण, शीतल पदार्थ उष्ण वाटणें इत्यादिकांचें वर्णन करावें.

स्वयंवरांत–शचीरक्षा, मुलींचें रक्षण, मंडपांत स्वयंवराकरितां आलेल्या मंडळीला बसण्याकरतां केलेले मंचक, मंडपाची तयारी, जिचा स्वयंवर व्हावयाचा ती राजकन्या, तिला वरायाला आलेल्या राजांचें रूप, कुल, व चेष्टा यांचें वर्णन इत्यादि असावें.

सुरापानांत–अंगाची विकलता, ठेंचा खाणें, अडखळत बोलणें, लज्जा, मानहीनपणा, प्रेमाचें आधिक्य, डोळ्यांची लाली, आणि श्रम यांचें वर्णन करावें.

पुष्पावचयांत म्हणजे फुलें वेंचण्याचें वर्णन करण्यांत—फुलें काढणें, आपल्या प्रियाला फुलें देणें व त्याच्याकडे मागणें इत्यादिकांचें वर्णन असावें.

---

१. येथें दोन्ही पुस्तकांत 'भुगलूल' असें आहे. पण त्याचा काहीं बरोबर अर्थ समजत नाहीं.

२. छापील पुस्तकांत 'सीमत' असा पाठ आहे; पण तो बरोबर येथें लागत नाहीं.

३. लग्नांत नवऱ्यामुलीकडून ध्रुव आणि अरुंधती यांचें अवलोकन करवावें लागतें,हें प्रसिद्धच आहे.

४. याचा अर्थ बरोबर समजत नाहीं, तरी नवऱ्यामुलीची रक्षा अर्थात् रक्षण व तें शची म्हणजे इंद्राणी इच्या नांवानें करावयाचें असावें असें वाटतें

स्त्रियांला मान चढतो, त्याचें वर्णन करण्यांत, गोत्रस्खलन म्हणजे चुकून दुसरेंच नांव तोंडांत येणें, ईर्षा, वक्रभाषण, संभ्रम, व आलिंगन इत्यादिकांचें वर्णन असावें.

जलकेलींत—सरोवराच्या पाण्याचा क्षोभ, चक्रवाक, हंस इत्यादि पक्ष्यांचें दूर जाणें, कमलांचा विस्खलितपणा, उदकाचे बिंदु, डोळ्यांची लाली, अंगावरचीं भूषणें, अर्थात् केशरादिकांचे वेलबुट्टे वगैरे धुवून जाणें इत्यादिकांचें वर्णन करावें.

सुरतांत—सात्त्विकभाव[1], सीत्कार[2], डोळे मिटणें, कमरपट्टा, कांकणें व पैंजण यांचा शब्द, अधरोष्ठावर दंतांचीं क्षतें व उरस्थलादिकांवर नखांचीं क्षतें इत्यादिकांचें वर्णन करावें.

याप्रमाणें काव्यांत वर्णन करावयाच्या पदार्थांच्या वर्णनाचें हें केवळ दिक्प्रदर्शन मात्र येथें केलें आहे. चैतन्यरूपानें ह्मणजे सूक्ष्मदृष्टीनें याच पदार्थांचें विशेष चिंतन केलें असतां यांचेंच अनंतत्व दिसून येतें. ह्मणजे जितकें जितकें सूक्ष्म विवेचन करावें, तितकें तितकें त्यांत वर्णन करण्यासारखें आहे, असें दिसतें.

असत् ह्मणजे मुळींच नसलेल्या गोष्टीचें वर्णन करणें, खऱ्या असलेल्यांचेंही वर्णन न करणें, व जात्यादिकांचा

१. अंगाला दरदरून घाम सुटणें, कापरें भरणें, तोंडावाटे शब्द न निघणें, नेत्रांतून प्रेमाश्रु निघणें, स्तन-कंपित होणें, गळा दाटून येणें, इत्यादि हे साहित्यशास्त्रकारांनीं सात्त्विकभाव ह्मणून वर्णन केले आहेत. केवळ अनुरागानें वश झालेल्या स्त्रीला मानसिक अथवा नियमभंगाच्या वेळीं हे भाव उत्पन्न होतात.

२ दांताच्या आंतल्या बाजूला जिभेचें टोंक लावून, जो आवाज निघतो, त्याला सीत्कार ह्मणतात हा सीत्कार समागमाच्या वेळीं स्त्रिया करीत असतात.

नियम या तीन रीतींनीं कवींचा समय अर्थात् त्यांची वर्णन करण्याची रीत अथवा मर्यादा तीन प्रकारची आहे.

असत् वस्तूचें ही वर्णन; जसें—

ज्या पर्वतावर रत्नें वगैरे असतील, त्यावर हंस व अल्पजलाशय, आकाशगंगेंत पाणहत्ती इत्यादिकांचें वर्णन, नदींत कमलादिक, अंधकाराचें मुष्टिग्राह्यत्व म्हणजे मुठींत धरण्याची योग्यता, आणि सूचिभेद्यत्व म्हणजे सुयांनीं भेदण्याला योग्यत्व, चंद्राच्या प्रकाशाची अंजलिग्राह्यता म्हणजे ओंजळींत घेण्यास योग्य असणें, आणि घागरींत भरून नेण्यास योग्य असणें, कीर्त्ति-हास्य इत्यादिकांच्या ठिकाणीं शुक्लत्व (पांढरेपणा), दुष्कीर्ति-पातक इत्यादिकांच्या ठिकाणीं काळेपणा, प्रतापाच्या ठिकाणीं रक्तत्व आणि उष्णत्व, क्रोध आणि प्रीति यांच्या ठिकाणीं लाली, रात्रीं चक्रवाक पक्ष्याच्या जोडप्यानें भिन्न ठिकाणीं असणें, म्हणजे मादी एकीकडे, आणि नर दुसरीकडे असणें, चकोर पक्ष्यांनीं चंद्रप्रकाशाचें प्राशन करणें इत्यादि गोष्टी वस्तुतः अगदीं असत् आहेत; तरी कवीनें आपल्या काव्यांत त्यांचें वर्णन करावें.

येथून चार श्लोकांचें कलापक आहे.

खऱ्या गोष्टीचें ही वर्णन न करणें; जसें—

वसंतऋतूंत मालतीपुष्प, चंदनवृक्षाला फल आणि पुष्प येणें, अशोकवृक्षाला फल येणें, कृष्णपक्षांत चंद्रज्योत्स्ना, व शुक्लपक्षांत अंधकार, कामी पुरुषाचे दांत व कुंदाच्या कळ्या यांच्या ठिकाणीं लाली, वाघंटीच्या फुलांच्या ठिकाणीं पिंवळेपणा, कमलाच्या कळ्या इत्यादिकांच्या ठिकाणीं हिरवे-

निरनिराळ्या बोराही सूर्यांचें, समुद्रांतून आणि अत्रिऋषीच्या दृष्टींतून उत्पन्न झालेल्या चंद्रांचें वर्णन करावयाचें असतां, त्यांचें लांछन शश (ससा) आणि मृग (हरिण) यांचें, विष्णु शेष मत्स्यकूर्मादि अवतार, नारायण, दामोदर, माधव इत्यादिकांचें; दानवांचें वर्णन करावयाचें असतां असुर, दैत्य आणि दानव यांचें ऐक्य मानणें इष्ट आहे.

आतां येथून चार श्लोकांनीं कलापक.

दानव, विप्रचित्ति, शंबर, नमुचि, पुलोमा इत्यादि, दैत्य-हिरण्याक्ष, विरोचन, बाण, हिरण्यकश्यपु, बलि, प्रल्हाद इत्यादि होत. असुर, वृषपर्वा, बल, वृत्र इत्यादि होत, असें समजावें.

---

१. पुराणात बारा आदित्य वर्णन केले असून त्यांचीं रूपें व नांवें सविता, अर्क इत्यादि निरनिराळीं आहेत. प्राचीन कवि ते बारा आदित्य आणि आकाशांत तेजस्वी दिसणारा गोल जो सूर्य तो एकच असें मानतात. मूळ ग्रंथकाराच्या सांगण्याचें हृद्‍ असें आहे कीं, जरी ते बारा निरनिराळे आहेत, तरी ते सर्व एक मानून चालावें. अर्थात् त्यांतल्या एकाचें नाव घेतलें, तरी ते सर्व आले असें समजावें इतकाच दिसतो. वस्तुतः त्या बारा आदित्यांचें अस्तित्व हें केवळ पौराणिक आहे. त्याविषयीं प्रत्यक्ष प्रमाण कांहींच नाहीं, आणि जरी ते तसे असले, तरी जगाला प्रकाश करणारा जो आकाशांत तेजोराशि दिसतो, त्याच्याशीं त्यांचें ऐक्य कसें होऊं शकेल, हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. तात्पर्य हा कविसमय इतकेंच घेऊन चालावें.

२. चंद्राची उत्पत्ति पुराणात दोन प्रकारची उत्पन्न केली आहे. देवदैत्यांनीं क्षीरसमुद्राचें मथन केलें तेव्हां त्यांतून उत्पन्न झालेला चंद्र एक, व अत्रिऋषीच्या तपानें संतुष्ट होऊन ब्रह्मदेवानें त्याच्या डोळ्यांपासून आपला अंशभूत पुत्र दिला तो चंद्र एक. मिळून दोन झाले. हे दोन्ही एकच मानून वर्णन करावें, असा मूळ ग्रंथकाराचा हेतु दिसतो. वस्तुतः अर्वाचीन शोधाप्रमाणें चंद्र ही उपग्रहाला संज्ञा आहे. रात्रीं जो आपल्या शीतल प्रकाशानें लोकांला आनंद देतो, तो चंद्र सूर्याचा उपग्रह असून स्वतः तेजोहीन आहे. तो सूर्याच्या प्रकाशानें प्रकाशित होतो असें आहे. अत्रीचा किंवा समुद्राचा पुत्र कोणी चंद्र असेल, तर तो केवळ पौराणिक असावा असें म्हटलें पाहिजे. आपल्याला दृग्गोचर होणाऱ्या चंद्राशीं आणि त्याच्याशीं कांहींच संबंध नाहीं.

३. कश्यप ऋषीच्या दनु आणि दिति नांवाच्या स्त्रिया होत्या. त्यांच्या संततीला अनुक्रमें दानव आणि दैत्य असें म्हणतात. असुर हें त्यांचें सामान्य नांव आहे. सुर म्हणजे देव, ते नव्हत असे जे ते असुर असा याचा अर्थ होतो. यावरून दानव आणि दैत्य या दोघां-

स्त्रियांच्या नेत्रकटाक्षांचें वर्णन करतांना त्यांचें शुक्लत्व किंवा कृष्णत्व किंवा कृष्णत्वच अथवा शुक्लश्यामता किंवा शुक्लकृष्णता वर्णन करावी. शिवाच्या मस्तकावरचा चंद्र होऊन पुष्कळ काळ गेला आहे, तथापि त्याचें बालत्वच वर्णन करावें. मदन मूर्तिमान् किंवा देहरहितही वर्णन करावा. देव आणि देवी यांची स्थिति जाणावी. नायिका व नायक यांचा क्रम जाणावा. सर्व जीवांचे स्वभाव व देश आणि काल यांची व्यवस्था जाणून कवींनीं आपल्या काव्यांत त्यांचें त्यांचें वर्णन करावें.

ह्या वरच्या भागांत सांगितलेले पदार्थ व वर्ण्य वस्तूंचे इतर विशेष प्रकार यासंबंधीं कविमयाचीं उदाहरणें मी केलेल्या काव्यकल्पलतापरिमल नांवाच्या ग्रंथावरून जाणावीं.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधायाः वर्ण्यस्थितिर्नाम पंचमः स्तबकः समाप्तश्चायं छंदःसिद्धिप्रतानः।

छंदःसिद्धि नामक पहिला प्रतान समाप्त.

---

भारी तें नांव भासत नसे. तरी मूळ ग्रंथकर्त्यानें दानव आणि दैत्य यांतून निराळे असून त्यांच्यांतल्या मोठ्यांत जे बृहस्पत्यादि त्यांचें असुर शब्दानें ग्रहण केलें आहे. इत्यादि हें [illegible] [illegible] वचन हें [illegible] आहे.

१. काव्यकल्प टीकाकार अमरचंद्र यांनीं वर्णन [illegible] दुसरा एक ग्रंथ केला आहे असें उघड दिसतें.

इत्यादींत समानार्थ आहे. मत्वर्थ इन्, अण्, इक इत्यादिही होत; यावरून केवळ मत्वर्थकच असें समजूं नये; तर मत्वर्थाचा व्यभिचार नसल्यामुळें मतूनेंही ग्रहण करणें. मुळांत 'आदि' शब्द घेतला आहे, त्यावरून या इत्यादिकांनीही ग्रहण करावें. 'तद्वान् जे असतील, त्यांचें नांव' हें याचा पुढेंही अन्वय करावा.

## आतां यांचीं क्रमानें उदाहरणें सांगतों.

भूनेता, भूपति, भूभुक्, भूपाल, भूधन तसाच मा न् इत्यादि कवींच्या रूढीप्रमाणें उदाहरणावली जाणावी.

मुळांत 'इति' शब्द आहे, तो प्रकारार्थक आहे, ह्मणून मुळांत न सांगितलेले जे भूप इत्यादि शब्द तेही घ्यावे. (कवींनी रूढी) अर्थात् परंपरेनें आलेली प्रसिद्धि तिला अनुसरून शब्द घ्यावे. तिचें अतिक्रमण करून घेऊं नये. जसें 'कपाली' इत्यादि शब्दांच्या ठिकाणीं स्वस्वामिभावसंबंध आहे, तरी कपाली शब्द मत्वर्थीयांतच अन्तर्भूत होतो. पण यावरून कपालपालः कपालधनः कपालभूपः कपालनेता कपालपतिः इत्यादि शब्द कवितेंत योजूं नयेत. कारण कवींची रूढी तशी नाहीं.

आतां जन्यजनकभावसंबंधाविषयीं सांगतों, जसें—

जन्य अर्थात् कार्यवाचक शब्दांहून पुढें-विधातृ, कर, सृ, कृत्, कर्तृ, स्रष्टृ, सृद्, जनक इत्यादि शब्द व जनकाहून योनिज, जनि, भू, संभव, रुह, सूति हे शब्द व अणादि प्रत्ययांत. हे त्यांचे ह्मणजे जनकांचे किंवा कारणांचे नामवाचक शब्द होतात.

जसें विश्वविधाता, विश्वकरः, विश्वसृः, विश्वकृत्, विश्वकर्त्ता, विश्वस्रष्टा, विश्वसृद्, विश्वजनकः इत्यादि. या शब्दांत विश्व हें जन्य अथवा कार्य असून, त्याच्या पुढें वर सांगितलेले शब्द आले आहेत. ब्रह्मा हा कर्ता असून विश्व हें त्याचें कार्य असल्याची रूढि ह्मणजे कविप्र- आहे, ह्मणून वरील सर्व ब्रह्मदेवाचीं नांवें होत. मुळांत

'मुख्य' शब्द आहे, तो आदि शब्दाच्या अर्थी योजलेला आहे. त्यावरून विश्वकारक इत्यादि दुसरींही उदाहरणें घ्यावीं; तथापि तीं कवींच्या रूढींतलींच घ्यावीं. इतर घेऊं नयेत. उदाहरणार्थ चित्राऱ्याला 'चित्रकृत्' ह्मणतात, ह्मणून त्याला 'चित्रसू' ह्मणूं नये. कारण तो चित्रें प्रसवत नाहीं. ह्मणून कवींची रूढीही तशी नाहीं. वर जसे कार्यवाचक शब्दांत पुढें आलेले विधातृ इत्यादि शब्द योजून दाखविले, तसे कारणवाचक शब्दांहून पुढें वर सांगितलेले शब्द अर्थात् आत्मयोनिः, आत्मजः, आत्मजनिः, आत्मभूः, आत्मसंभवः, आत्मरुहः, आत्मसूतिः, हीं सर्व नांवें ब्रह्मदेवाचीं वाचक होत. कारण ब्रह्मदेव आपल्यापासूनच आपण उत्पन्न झाल्याची प्रसिद्धि आहे. अर्थात् आत्मा हेंच त्याचें कारण ह्मणून त्या शब्दापुढें योनि इत्यादिक शब्द येऊन जीं नांवें सिद्ध झालीं,[१] तीं त्यांचीं वाचक. 'अण्' इत्यादि हे प्रत्यय तद्धितार्थ आहेत. अपत्यार्थी झालेला अण् प्रत्यय त्याचा वाचक होतो. जसें—भृगूचें अपत्य (मूल अथवा संतति) तो भार्गव, दितीचें अपत्य तो दैत्य, वत्सऋषीचें अपत्य वात्स्यायन इत्यादि. येथें ही भार्गव इत्यादि शब्दांचे भृगु इत्यादि हे जनक होत, अशी कविप्रसिद्धि आहे. हेही शब्द कविरूढीप्रमाणेंच योजले पाहिजेत. कारण 'आत्मयोनि' असें नांव केलें आहे, ह्मणून 'आत्मजनक' अथवा 'आत्मकारक' अशीं योजूं नयेत.

आतां धार्यधारकभावसंबंधाविषयीं सांगतों; जसें—

धार्य शब्दाहून—ध्वज, अस्त्र, पाणि, अंक, मौलि, भृत्, मंडण हे अथवा याच्यासारख्या अर्थाचे दुसरे शब्द व धर, भर्तृ, मालिन्, व मत्वर्थक, आणि शालिन्, शेखर, व यांच्याच सारखे दुसरे धारकाचे अर्थात् तें धरणाऱ्याचे वाचक होत.

जसें— वृषध्वजः, शूलास्त्रः, पिनाकपाणिः, वृषांकः, चंद्रमौलिः, शूलभृत्, शशिमंडणः व यांच्याच सारख्याच अर्थाचे—वृषकेतनः, शूला-

१ पिनाक हें महादेवाच्या धनुष्याचें नाव पिनाकम् पाळते (धारयति) इति पिनाकपाणी असा याचा विग्रह होतो.

ध्वजः, वृषलक्ष्मा, चंद्रशिराः, चंद्रमुकुटः, चंद्राभरणः इत्यादि शब्द घ्यावेत. तसेंच गंगाभृत्, पिनाकभर्ता, पिनाकमाली, शूली, पिनाकशाली, शशिशेखरः इत्यादि हेही कविरूढिप्रमाणेंच घ्यावे. यावरून धार्यधारक संबंध असतांही सर्व ध्वजादिकांच्या अर्थानें धार्यवाचक जे शब्द ते योजतां येतील, असें समजूं नये. 'वृषध्वज' या शब्दाप्रमाणेंच 'शूलध्वज' किंवा 'शूलास्त्र' याप्रमाणें 'चंद्रास्त्र'; 'पिनाकपाणि' प्रमाणें 'अहिपाणि;' 'वृषांक' याप्रमाणें 'चंद्रांक'; 'चंद्रमौलि,' प्रमाणें 'गंगामौलि;' 'शशिमंडण' याप्रमाणें 'चंद्रमंडण'; 'गंगाधर' याप्रमाणें 'चंद्रधर'; 'पिनाकभर्ता' याप्रमाणें 'चंद्रभर्ता;' 'पिनाकमाली' याप्रमाणें 'सर्पमाली;' किंवा 'शूली' याप्रमाणें 'शूलवान्'; 'शूलशाली' याप्रमाणें 'चंद्रशाली'; 'चंद्रशेखर' याप्रमाणें 'गंगाशेखर', असे शब्द होत नाहींत.

भोज्यभोजकसंबंधाविषयीं सांगतों; जसें —

**भोज्य म्हणजे भक्ष्य, तद्वाचक शब्दांहून पुढें—भुज् लिह् पायिन् अंध व्रत पा आश अशना इत्यादि शब्द असले म्हणजे ते भोक्त्यांचे वाचक अथवा त्यांचीं नांवें होतात.**

जसें—अमृतभुजः अमृतलिहः अमृतपायिनः अमृतांधसः व अमृतव्रताः अमृतपाः अमृताशाः अमृताशनाः इत्यादि. 'अमृत' हें भक्ष्याचें नांव, त्याच्यापुढें मुळांत सांगितलेले भुक् इत्यादि शब्द आल्यामुळें हे शब्द अमृतभोजन करणारे जे देव, त्यांचे वाचक झाले. देव अमृत खाणारे आहेत, अशी रूढि आहे.

मुळांत 'प्रमुख' शब्द आहे, तो तत्समानार्थक दुसरे शब्द घेण्याकरतांच आहे. हेही शब्द कविसंप्रदायाप्रमाणेंच घेतले पाहिजेत, नाहीं

---

१ शूल (एक आयुध) ज्याला आहे, तो शूली असा विग्रह होत असून, हा शब्द कृत् प्रत्ययांत झाला आहे.

२ 'वृषध्वज' याप्रमाणें 'शूलध्वज' का होऊं नये, याविषयीं सूक्ष्म विचार केला पाहिजे. वृष म्हणजे बैल अर्थात् नंदी. तो शंकराच्या ध्वजावर आहे, म्हणून त्याला वृषध्वज असें म्हणतात. पण शूल हें त्याचें आयुध आहे व तो त्याला धारणही करीत आहे, तरी तो त्याचा ध्वज नव्हे. याप्रमाणेंच 'चंद्रास्त्र' असें न होण्याचें कारण चंद्राला शिव धारण करितो, तरी तो त्याचें अस्त्र नव्हे, म्हणून 'शूलध्वज' इत्यादि शब्द योजूं नयेत. असा भावार्थ.

तर जसा 'अमृतभुजः' हा नामवाचक शब्द झाला, तसा 'अमृतवल्लभः' हा होणार नाहीं.

## पतिपत्नीभावसंबंधाविषयीं सांगतों; जसें—

पतीच्या (अर्थात् त्या स्त्रीला वरणाऱ्याच्या) नांवापुढें कांता, दयिता, वधू, प्रणयिनी, प्रिया, अंगना, व यासारखे दुसरे शब्द पुढें असतां, ते त्या स्त्रीचे वाचक होतात. व पत्नीच्या नांवापुढें—प्राणप्रिय, वर, रमण, प्राणेश्वर, ईश, व यांच्या सारख्याच अर्थाचे दुसरे शब्द पतीचे वाचक होतात.

जसें—शिवकांता, शिवदयिता, शिववधू, शिवप्रणयिनी, शिवप्रिया, शिवांगना इत्यादि. गौरी हिचा पति शिव असल्याची कविप्रसिद्धि आहे, म्हणून हे शब्द तिचे वाचक होतात. समानार्थक असल्यावरून रमण, वल्लभ इत्यादि शब्दही घ्यावे, व त्यांवरून शिववल्लभः शिवरमणः अशीं नांवें घेतलीं, तर तीं अयोग्य होणार नाहींत. येथेंही रूढीचें अतिक्रमण करतां कामा नये. जसें 'शिवकांता' हा शब्द होतो तसाच 'शिवपरिग्रह' हा शब्द होईल असें समजूं नये. याप्रमाणेंच पत्नीवाचक शब्दांहून, मुळांत सांगितलेले प्रणयी इत्यादि शब्द पुढें असतां—गौरीप्रणयी, गौरीप्रियः, गौरीवरः, गौरीरमणः, गौरीप्राणेश्वरः, गौरीशः इत्यादि शब्द शंकराचे वाचक होतात. गौरी ही शिवाची स्त्री अशी प्रसिद्धि आहे. त्यांच्याच सारखे गौरीपतिः, गौरीधवः इत्यादि शब्दही घ्यावे; तथापि ते कविरूढीप्रमाणेंच घेतले पाहिजेत. कारण जसा 'गौरीश्वर' शब्द होतो, तसा 'गंगेश्वर' हा व्हावयाचा नाहीं.

१ 'कांता आणि परिग्रह' हे दोन्ही शब्द सारख्याच अर्थाचे आहेत, तेव्हां 'शिवकांता' शब्दाप्रमाणें 'शिवपरिग्रह' असा शब्द घेतला, तर दुसरा कांहीं दोष येत नाहीं. प्राचीन कवींनीं तसा कोठें योजला नाहीं, हाच काय तो दोष.

२ गंगा ही शिवाची विवाहित स्त्री असल्याचें पुराणांतरीं कोठें आढळत नाहीं. तरी कवींनीं तिला शिवाची स्त्री कल्पून, गौरीच्या आणि तिच्या सवतीमत्सराचें मजेदार वर्णन केलेलें आढळतें. तथापि तो शिव हा गंगेचा पति अशी कविप्रसिद्धि नाहीं. म्हणून 'गंगेश्वर' असें त्याला नांव देतां येत नाहीं.

## आतां सखिसंबंधाविषयीं सांगतों; जसें—

सखिवाचक शब्दांहून पुढें-सखि किंवा त्यांचे समानार्थक शब्द आले असतां, ते ज्याचा सखा आहे, त्याचे वाचक होतात.

जसें—श्रीकंठाचा (शिवाचा) सखा ह्मणजे मित्र तो 'श्रीकंठसख' अर्थात् कुबेर, हा शिवाचा मित्र असल्याची कविप्रसिद्धि आहे. याप्रमाणेंच 'मधु' ह्मणजे वसंतऋतु त्याचा सखा ह्मणजे मित्र तो 'मधुसख' अर्थात् काम; याप्रमाणेंच 'सुहृत्', 'मित्र' इत्यादि शब्द लावून 'श्रीकंठसुहृत्' किंवा श्रीकंठमित्र' इत्यादि शब्द, कुबेराचे वाचक करतां येतात. येथेंही कविरूढीकडे लक्ष्य दिलें पाहिजे. कारण 'श्रीकंठसख' असें कुबेराला नांव दिलें, ह्मणून तसेंच 'धनदसख' हें शंकराला नांव देतां येणार नाहीं.

## आतां वाह्यवाहकसंबंधाविषयीं सांगतों; जसें—

वाह्यवाचक शब्दाहून पुढें-यान, आसन किंवा याच अर्थाचे दुसरे शब्द योजले असतां, नामवाचक शब्द, तें ज्याचें नांव असेल त्याचे वाचक होतात.

जसें—वृषयानः, वृषासनः इत्यादि वृष ह्मणजे बैल (नंदी), तें शिवाचें वाहन असल्याची प्रसिद्धि आहे, ह्मणून हीं शंकराचीं नांवें होत. याचप्रमाणें वृषगामी, वृषवाहन इत्यादि शब्दही घ्यावे. यांतही रूढीला धरून वागलेंच पाहिजे. जसा 'नरवाहन' शब्द कुबेराचा वाचक होतो, तसे 'नरगामी' अथवा 'नरयान' हे शब्द कुबेराकडे लावतां येणार नाहींत.

## ज्ञातेयसंबंधाविषयीं सांगतों; जसें—

ज्ञाति (नातें असलेला) वाचक शब्दाहून, पुढें स्वसृ, दु-

हित, आत्मज, अग्रज, अवरज व यांसारखेच दुसरे शब्द, तें ज्याचें नातें असेल, त्याचे वाचक होतात.

जसें—यमस्वसा हें यमुनेचें नांव होतें; कारण यमुना ही यमाची बहीण असल्याची कविप्रसिद्धि आहे. कारण याप्रमाणेंच हिमवद्दुहिता हा शब्द गौरीचा, चंद्रात्मज हा बुधाचा, गदाग्रज हा कृष्णाचा, व इंद्रावरज हा विष्णूचा वाचक होतो. कारण तीं तीं त्यांचीं नातीं, कवींच्या रूढींतलीं आहेत. यांसारखेच सोदर, सगर्भ्य इत्यादि शब्दही घ्यावेत. कालिंदीसोदर असें यमाला नांव देतां येईल. यमुनाभ्राता असेंही ह्मणतां येईल. येथेंही कविरूढीला मान दिलाच पाहिजे. यमुनेला 'यमस्वसा' ह्मटल्याप्रमाणें तिला 'शनिस्वसा' असें ह्मणतां येणार नाहीं.

## आतां आश्रयाश्रयिभावसंबंध दाखवितों; जसें—

आश्रय (निवास) तद्वाचक शब्दांहून, पुढें सदनांचीं नांवें, तसेंच सदन इत्यादि शब्द, त्यांत राहणारांचे वाचक होतात.

जसें—द्युसदनाः, द्युसद्मानः इत्यादि; द्यु हा शब्द स्वर्गाचा वाचक आहे; तेथें राहणारे ह्मणून द्युसदन म्हणजे देव स्वर्गात राहतात, ही प्रसिद्धि आहे. याप्रमाणेंच दिवौकसः, द्युवसतयः, दिवालयः, द्युसदः, द्युनिवासिनः, द्युशयाः हे शब्द देवांचीं नांवें होतात. या ठिकाणींही रूढि मानलीच पाहिजे. देवांला 'द्युसद्मानः' ह्मणतां येईल ह्मणून मनुष्यांला 'भूमिसद्मानः' असें ह्मणतां येणार नाहीं.

---

१ यम, यमुना आणि शनि तिन्ही सूर्याचीं अपत्यें असल्याची प्रसिद्धि आहे. तीवरून 'यमस्वसा' म्हणावें आणि 'शनिस्वसा' म्हणूं नये, तें का असें कोणी म्हणेल, तर त्याला कारण इतकेंच कीं, 'यमस्वसा' या शब्दाचा प्राचीन ग्रंथकारानीं जसा उपयोग केला आहे, तसा 'शनिस्वसा' शब्दाचा उपयोग केल्याचें कोठें दिसून येत नाहीं इतकेंच.

२ यांतला दिव शब्द अकारांतही होतो.

## आतां वध्यवधकसंबंध सांगतों; जसें—

वध्यवाचक शब्दाहून, पुढें भित्, जित्, घाती, द्वेषी, ध्रुक्, ध्वंसी, शासन, आणि विपक्ष हे व अंतक, अरिसूदन, दर्पच्छिद्, दमन, दारी, मथन इत्यादि शब्द असतां, ते वधकाचे वाचक होतात.

जसें—पुरभित्, पुरजित्, पुरघाती, पुरद्वेषी, पुरध्रुक्, पुरध्वंसी, पुरशासनः, पुरविपक्षः, पुरांतकारी, पुरसूदनः, पुरदर्पच्छिद्, पुरदमनः, पुरदारी, पुरमथनः इत्यादि. शिवानें पुराचा अर्थात् त्रिपुराचा नाश केला आहे, तेव्हां पुर हें वध्य असून, शिव त्याचा (घातक) असल्याची प्रसिद्धि आहे. ह्मणून पूर्वोक्त शब्द शिवाचे वाचक होतात. याप्रमाणेंच पुरनिहंता, पुरकेतुः, पुरहः, पुरांतकः, पुरंजयः, हेही त्याचे वाचक होतात. मुळांत 'वध्य' असें ह्मटलें आहे, यावरून त्याला मारलेलेंच असलें पाहिजे असें नाहीं. मारण्याला योग्य असला, तरी चालतें. उदाहरणार्थ—कालियमर्दन, कालियारि, कालियदमन इत्यादि शब्द विष्णूचीं नांवें होतात. येथेंही कविसंप्रदायाला अनुसरलेंच पाहिजे. कालियदमन या शब्दाप्रमाणें कालियघाती असें ह्मटलें तर तें योग्य होणार नाहीं.

याप्रमाणें—स्वस्वामिभाव, जन्यजनकभाव, धार्यधारकभाव, भोज्यभोजकभाव, पतिपत्नीभाव, सखिभाव, वाह्यवाहकभाव, शत्रुशात्रवभाव, आश्रयाश्रयिभाव, आणि वध्यवधकभाव असे दहा प्रकारचे संबंधाचे भेद सांगितले. आतां हे भेद जसे भिन्न भिन्न द्रव्याच्या आश्रयानें होतात, असें वर दाखविलें. तसेंच आतां ते एका द्रव्याचा आश्रय करूनही होतात, असें दाखविण्याकरितां सांगतों.

संबंध हाही विपक्षेनेंच होत असतो. ह्मणून एकाद्या संबंधी पदाहून पुढें पूर्वी दाखविलेले जे संबंधी शब्द, ते ज्ञात्यांनीं यथोचित रीतीनें योजावे.

१ कालिय नावाच्या सर्पाला विष्णूनें (कृष्णानें) ठार मारलें नसून, तो त्याला मारण्याला योग्य होता. इतकेंच येथें समजावाचें.

संबंधी पद अर्थात् 'वृष' इत्यादि दुसऱ्या संबंधाने वाहनादि शब्द असें समजावें.

## हेंच सांगतों.

वाह्यवाहकभावसंबंधाची विवक्षा असतां, वृषवाहन असें शंकराला ह्मणावें. तेंच धार्यधारकसंबंध असतांही वृषांक म्हणावें. स्वस्वामिभावसंबंधविवक्षा असतां, त्यालाच वृषपति म्हणावें. याप्रमाणेंच धार्यधारकसंबंधाची विवक्षा असतां, जसें रवीला अंशुमाली म्हणावें. तसेंच स्वस्वामिभावसंबंध असतां अंशुमान् म्हणावें. तसेंच वध्यवधकभावसंबंधाची विवक्षा असतां, मोराला जसें अहिरिपु ह्मणावें, तसेंच भोज्यभोजक संबंधाची विवक्षा असतां, अहिभुक् असें ह्मणावें.

यावरून असें सिद्ध होतें कीं, ज्या वेळीं जसल्या संबंधाची कवीला विवक्षा असेल, त्यावेळीं त्या संबंधाचा ज्यांत अर्थ निघेल, असेच शब्द योजावे. उदाहरणाकरितां दिलेल्या नांवांची व्युत्पत्ति संबंधावर अवलंबून आहे असें समजावें.

याप्रमाणें संबंधनिबंधनांत अर्थात् संबंधाच्या तंत्रानें असणारी व्युत्पत्ति सांगून आतां दुसरी व्युत्पत्ति सांगतों.

जें चिन्ह विशेषण व्यक्त असेल त्यानें चिन्हित असा जातीचा अभिप्रायदर्शकही शब्द व्यक्तीचा वाचक होतो. जसें, अगस्तिनिवासा दिशेला दक्षिणदिशा म्हणतात.

अगस्तिनांवाचा प्रसिद्ध ऋषि याचा निवास जिच्या ठिकाणीं आहे, ती 'अगस्तिनिवासा.' अगस्ति ऋषि दक्षिणेस राहतो, हें प्रसिद्ध आहे. तें एक विशेष चिन्ह असल्यावरून दक्षिण दिशेला 'अगस्तिनिवासा' हें नांव देतात. यांत जातिवाचक शब्द दक्षिणदिगारूपव्यक्तीचा वाचक होतो. त्याप्रमाणेंच—'सप्तर्षिपूता दिक्' ह्मणजे उत्तर

इत्यादि शब्द यौगिक आहेत, असें समजावें. गीर्वाण इत्यादि शब्द पहिल्या किंवा दुसऱ्या कोणत्याच पदांत पर्यायाचा बदल केलेला सहन करीत नाहींत, म्हणून त्यांना मिश्र म्हणावें. मिश्र म्हणजे केवळ योग अथवा रूढि यांनीं सिद्ध झालेले नसून त्यांच्या सिद्धीला दोहोंचीही[1] अपेक्षा आहे. याप्रमाणेंच कृतांत, दशरथ इत्यादि शब्द मिश्र आहेत असें समजावें.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधायां शब्दसिद्धिप्रताने द्वितीयतरौ यौगिकमिश्राख्यः प्रथमस्तबकः समाप्तः ॥

---

१ योग म्हणजे शास्त्र अथवा त्याचे नियम, त्यावरून सिद्ध होतात ते यौगिक; असा यौगिक शब्दांचा अर्थ इतर अनेक ठिकाणीं केल्याचें आढळतें. पण मूळ ग्रंथाचा टीकाकार अमर याणें 'योगात् अन्वयात्' असें म्हटलें आहे. अन्वय शब्दानें शास्त्राचेंही ग्रहण करतां येतें.

२ उदाहरणार्थ गीर्वाण शब्दच घ्या. गीर्वाण हें रूप व्याकरणशास्त्रानें सिद्ध झालें आहे व हा शब्द देवांचाच वाचक होण्याला कारण रूढि आहे.

## यौगिकनाममालास्तवक २.

### आतां योगार्ह नांवें सांगतों.

यौगिक शब्द जे संक्षेप आणि विस्तार यांला हेतु होतात, त्यांचा योग होण्याला योग्य अर्थात् योगार्ह अशीं कित्येक नांवें सांगतों.[1] जसें,—

स्वर्गविपर्यी—सुर+गेहानि=सुरगेहानि. ए०व० सुरगेहम्.
देवविपर्यी—द्यु+सदः= द्युसदः ,, द्युसद्.
आदिशब्दावरून—त्रिदश+गेहानि=त्रिदशगेहानि" एकवचन त्रिदशगेहम्.
नाक+सदः=नाकसदः एकवचन नाकसद्.
स्वाहा+सुधा=स्वाहासुधा.
स्वधा+सुधा=स्वधासुधा.

---

१ येथें मुळांत ग्रंथकारानें दोन श्लोकांत नियम सांगितले आहेत, पण त्याचा उपयोग मूळ ग्रंथ लावणारासच होणार असून आम्हीं त्यांत सांगितल्याप्रमाणें उदाहरणें वर दिलीं असल्यामुळें त्यांस त्यांचा कांहीं उपयोग नाहीं, म्हणून वर त्यांचें भाषांतर दिलें नाहीं. तथापि त्यांचा येथें संग्रह करितों. उद्देश सांगणारा शब्द सप्तम्यंत असून, तो येथें पूर्वी योजला आहे. पहिलें पद षष्ठ्यंत व दुसरें पद प्रथमांत योजिलें आहे. दोन्ही मिळून एकच शब्द आहे असें समजावें. एकवचन लावलें तर एकवचनी होईल, बहुवचन लावलें तर बहुवचनी होतील. 'मुख्य आणि आदि' या शब्दावरून त्याच्यासारखे दुसरे शब्द घ्यावे. उदाहरणार्थ (मुळांतलें वाक्य) "स्वर्गे सुरेभ्यो गेहानि देवे द्युभ्य सदांस्य" यांत 'स्वर्गे' हा उद्देशवाचक शब्द असून तो सप्तम्यंत आहे. 'सुरेभ्यो' हें प्रथमपद असून षष्ठ्यंत आहे. 'गेहानि' हें उत्तरपद असून प्रथमांत आहे. 'देवे' हा सप्तम्यंत उद्देशवाचक शब्द आहे. 'द्युभ्य' हें प्रथमपद षष्ठ्यंत आहे. 'सदः' हें उत्तरपद बहुवचनांत असून पुढें 'आदि' हा शब्द आहे. आतां यावरून सुरगेहानि व द्युसद असे शब्द सिद्ध होतात. हे बहुवचनांत आहेत. हेच एकवचनी पाहिजे असले, तर सुरगेहं व द्युसद् असें होईल. आदिशब्दानें अमरगेहं अथवा दिविसद् वगैरे शब्द घेतां येतील असें समजावें.

निशा + मणि = निशामणिः अथवा

निशा + कर = निशाकरः

इंद्राविषयीं—सहस्र + नेत्र = सहस्रनेत्रः

शत + क्रतु = शतक्रतुः

वज्र + पाणि = वज्रपाणिः. प्रमुखशब्दानें वज्रधरः इत्यादि.

केशव + अग्रज = केशवाग्रजः

त्रिदिव + ईश = त्रिदिवेशः

स्वःपुरी + पति = स्वःपुरीपतिः

सुधर्मा + पति = सुधर्मापतिः

सुर + पति = सुरपतिः

पौलोमी + पति = पौलोमीपतिः

पूर्वदिश् + पति = पूर्वदिक्पतिः

अप्सरसः + पति = अप्सरसः पतिः

(यांतील पतिशब्दाबद्दल त्यासारखे दुसरे शब्द लावले तरी चालतात. व याच प्रकारचे यज्ञपति इत्यादि दुसरे शब्दही घ्यावे.)

जंभ + अराति = जंभारातिः

पाक + शासन = पाकशासनः

बल + भिद् = बलभित्.

वृत्र + अरि = वृत्रारिः

पुलोमन् + घ्न = पुलोमघ्नः

नमुचि + हन् = नमुचिहा

अद्रि + शासन = अद्रिशासनः

जयंत + जनक = जयंतजनकः किंवा जयंतपिता इत्यादि.

अग्नीविपर्यी—धूम+ध्वज=धूमध्वजः

हव्य+भुज्=हव्यभुक्

हविस्+भुज्=हविर्भुक्

हुत+भुज्=हुतभुक्. आदिशब्दानें यज्ञ+भुज्=यज्ञ-भुक् इत्यादि.

सप्त+ज्वाला=सप्तज्वालः

सप्त+अर्चिस्=सप्तार्चिः

मंत्र+जिव्हा=मंत्रजिव्हः इत्यादि.

स्व+वल्लभः=स्ववल्लभः

और्व (वडवानळ) याविपर्यी—वडवा+वन्हि=वडवावन्हिः अथवा वडवाग्नि.

यमाविपर्यी—दंड+अस्त्र=दंडास्त्रः दंड+आयुध=दंडायुधः इत्यादि.

महिष+ध्वज=महिषध्वजः.आदि शब्दानें महिष+वाहन=महिषवाहनः इ०.

कालिंदी+सोदर=कालिंदीसोदरः

धूमोर्णा+प्रिय=धूमोर्णाप्रियः

दक्षिणाशा+पति=दक्षिणाशापतिः

प्रेत+पति=प्रेतपतिः

पितृ+पति=पितृपतिः

सूर्य+अंगज=सूर्यांगजः

राक्षसाविपर्यी—रजनी+चर=रजनीचरः

निकषा+सुत=निकषासुतः

क्रव्य+भुज्=क्रव्यभुक् अथवा क्रव्यादः

वरुणाविपर्यी—यादस्+पति=यादःपतिः

जल+पति=जलपतिः

पाश+अस्त्र=पाशास्त्रः, अथवा पाशायुधः इत्यादि.

वायूविपर्यी-नित्य+गति=नित्यगतिः अथव सदा+गति= सदागतिः

आशु+ग=आशुगः

आशु+गति=आशुगतिः

कुबेराविपर्यी—शर्व+सख=शर्वसखः, शर्वमित्रः इ०.

नलकूबर+जनक+नलकूबरजनकः अ०नलकूबरपिता.

निधान+स्वामिन्=निधानस्वामी

यक्ष+राज=यक्षराट्

किन्नर=अधीश=किन्नराधीशः

धन+पति=धनपतिः

अलका+पति=अलकापतिः

चैत्ररथ+पति=चैत्ररथपतिः

पुष्पक+पति=पुष्पकपतिः

शिवाविपर्यी—त्रि+नेत्र=त्रिनेत्रः

एक+अक्षि—एकाक्षः

भाल+दृश्=भालदृक्

वृष+ध्वज=वृषध्वजः

'कोक' (चक्रवाक) वाचक शब्द व पद्मवाचक शब्द यांहून मित्रवाचक शब्द योजले जातात. जसें—

'कोकमित्रम्' यांत कोकाचा मित्र पक्षीं कोकमित्र ह्मणजे सूर्य 'पद्मबन्धुः' यांत पद्माचा बंधु व पक्षीं पद्मबन्धु ह्मणजे सूर्य असा अर्थ घ्यावा.

गरुडवाचक शब्दाहून बान्धव वाचक शब्द योजले जातात. जसें—

'गरुडबान्धवः' यांत गरुडाचा बांधवरूप व पक्षीं गरुडबांधव ह्मणजे अरुण असा अर्थ घेतां येतो.

भूरि शब्दाहून व जातरूप शब्दाहून आणि सुवर्ण शब्दाहून कमलवाचक शब्द योजले जातात. जसें—

'भूरिपङ्कजम्' यांत सुवर्णकमल व पक्षीं भूरि ह्मणजे पुष्कळ कमळें ज्यांत आहेत तें असा अर्थ घेतां येतो.

'जातरूपाम्बुजम्' यांत जातरूप ह्मणजे सुवर्ण याचें अम्बुज ह्मणजे कमल; पक्षीं जात ह्मणजे उत्पन्न झालें आहे रूप ज्याला असें कमल असे दोन अर्थ होतात.

'सुवर्णाम्भोजननम्' यांत सोन्याचें कमल व रक्तवर्णपक्षीं उत्तम वर्णाचें ह्मणजे रंगाचें अम्बुज ह्मणजे कमल असा अर्थ घ्यावा.

'नवीनतपनीयश्रीः' ह्मणजे नव्या सुवर्णासारखी आहे शोभा ज्याची. पक्षीं तपन ह्मणजे सूर्य त्याची ही श्री असा अर्थ करावा.

'सदाधातुभियं वहन्' यांत धातु ह्मणजे पर्वतसंबंधी धातु व पक्षीं धातु ह्मणजे ब्रह्मदेवाची शोभा धारण करणारा असा अर्थ करावा.

'विनतासुतलक्ष्मीवान्' यांत विनतासुत ह्मणजे एकदा गरुड व एकदा अरुण घेऊन त्याच्याशीं लक्ष्मीवान् याचा समास करावा.

याच रीतीनें अन्य शब्दहि आपल्या बुद्धीनें कल्पना करावे.

## भिन्नवर्ण शब्द.

ज्याचा रंग निराळा, आकार निराळा, क्रिया निराळी अशा उचित

१ चक्रवाक पक्ष्याच्या जोडप्याचा सूर्यास्त होण्याबरोबर वियोग होतो असा कविसमय असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे सूर्याचा उदय होताच त्या स्त्रीपुरुषाच्या भेटी होतात म्हणून सूर्याला त्याचा बंधु म्हणजे हितकर्ता किंवा आप्त असें म्हटलें आहे.

वस्तूंचा अभेद वर्णन करतां यावा अशी इच्छा असतां कोणते शब्द योजावे ते सांगतों.

परम, विशद, स्व, दृश, अयोग्य, अन्तर,–हृद्य, रुच्य, हार्य, या अर्थाचे व दुसरे पिनद्ध, तत्र, सन्न, व्याप्त, अनून, किञ्चन, समान, ननु, समशुभ, सम्पन्न, वपुषामहसः, अङ्केन, देहे व यांच्यांशीं समान देहे सदा इत्यादि शब्द व विराजते आणि दृश्यते इत्यादि शब्द योजावे.

वर सांगितलेल्या परम इत्यादि शब्दांच्या पुढें वर्ण, आकार, क्रिया इत्यादि शब्द यथोचित योजावे. जसें—

'परमस्थूलतायुता:' यांत एका पक्षीं परमा ह्मणजे प्रकृष्ट स्थूलतेनें युक्त असा व दुसऱ्या पक्षीं परम ह्मणजे अतिशयेंकरून अस्थूलता म्हणजे कृशत्व याणें युक्त असा अर्थ करावा.

'विशदश्वेततशाली' यांत एक पक्षीं विशदा म्हणजे निर्मल अशी श्वेतता म्हणजे पांढरेपणा त्यानें शोभणारा असा व दुसऱ्या पक्षीं विशत् म्हणजे भांन हिरणारी जी अश्वेतता म्हणजे काळेपणा तिणें शोभणारा असा अर्थ करावा.

. 'स्वचलताशाली' यांत एका पक्षीं स्वकीया ह्मणजे आपली जी चलता म्हणजे चपलपणा दुसऱ्या पक्षीं सु ( सुष्टु ( म्हणजे चांगली जी अचलता (स्थिरता) तिणें शोभणारा याप्रमाणें पुढें शुभसम्पन्न या शब्दांपर्यंत सर्व शब्दांना अर्थ जाणावा. यांत सुरुचिर, श्रीमधुर, शोभामधुर इत्यादि उदाहरणें जाणावीं. व वपुर् इत्यादि पकारान्त शब्द तृतीयेच्या एकवचनांतीं आहेत. तसेंच 'अङ्केन' इत्यादि अकारान्त शब्दही तृतीयेच्या एकवचनान्त आहेत. 'देहे' इत्यादि शब्द अकारान्त असून सप्तमीच्या एकवचनांत आहेत. 'सदा, सर्वदा इत्यादि; राजते इत्यादिही आत्मनेपदी क्रियापदापर्यंत क्रियावाचक शब्द आहेत असें जाणावें.

" स्वकामादिमगुणतां स्वगुणत्वादृते तनौ ।
वहन्नाहितगुणतां गुणालास्पटुनो भृशम् ॥"

## रक्तवर्ण शब्द.

गव, भास्वत्, सुखोद्योत, नालीक, अशोक, मंगल, विभा, प्रभा, भज, रंग, सज्ज, पावन, आणि पायक.

## आतां पीतवर्ण शब्द सांगतों.

जातरूप, सदापीन, कल्याण, मधुर, उचित, बहुशोभानुवृत्तिश्रीः भास्वत् आणि प्रद्योतन.

## आतां आधार शब्द सांगतों.

'अहो सुरचितच्छायः,' स्वकामरचितस्थितिः, स्पष्टाम्बरश्रियं बिभ्रत्, तारापथकृतस्थितिः, स्फुरन्नवनिबद्धश्रीः, सदाभूतलसद्द्युतिः, सदाहिविश्ववल्गुश्रीः, विलसद्विभवान्वितः, सदासज्जलसल्लक्ष्मीः, परमोदकवैभवः, कान्तारचितसंस्थानः, सदा रामश्रियं वहन्.

## आतां आकार शब्द सांगतों.

वृत्तलक्ष्मी, मनोहारी, निस्तुलश्री, मनोरमा, अहो गौरवसल्लक्ष्मीः, अलं वरचितस्थितिः, विश्वविस्तीर्णलक्ष्मीकः, सकलाभोगभासुरः, समञ्जुलवसल्लक्ष्मीः, ऊर्मिमद्वैभवान्वितः.

## आतां क्रियावाचक शब्द सांगतों.

उच्चैस्तरलसल्लक्ष्मीः, सुपीवरवसद्द्युतिः, संपन्नव्यामलक्ष्मीकः, परकोटिश्रिया युतः, याप्रमाणें धाम, भाव, प्रभाव, आणि विभाव यथायोग्य वर्णांच्या वाचक शब्दांहून बुद्धिमानांनीं यथायोग्य योजावे. जसें— स्थूलधाममनोहारी, गुरुभावचितस्थितिः, स्थूलप्रभावबद्धश्रीः, उच्चैर्विभवरोचितः इत्यादि उदाहरणांत दोन दोन अर्थ घ्यावे. 'धाम' शब्दानें देह व तेज घ्यावें. असेंच पुढेंही जाणावें.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधायां श्लेषसिद्धिप्रतानें तृतीये उद्दिष्टवर्णनं नाम तृतीयः स्तबकः समाप्तः ॥ ३ ॥

## अद्भुतस्तवक ॥ ४ ॥

जेथें लिङ्ग आणि विभक्ति यांचा मोठा भेद असतांहि शब्दाचें सादृश्य असतें त्याला अद्भुत ह्मणतात. णिन् प्रत्ययान्त असून स्त्रीलिंगीं केलेले असे जे शब्द त्यांहून व नपुंसकलिंगीं अप्रत्ययान्त, स्त्रीलिंगीं सि प्रत्ययान्त, स्त्रीलिंग कर्मांत शस् प्रत्ययान्त, होतात, तेच रेफ ज्यांच्या आधीं आहे अशा शब्दांच्या पूर्वी असले ह्मणजे स्त्रीकर्माची बहुता होते.

णिन् प्रत्यय ज्याच्या अंतीं झाला आहे असे शब्द राजिन्, भ्राजिन्, शाकिन् इत्यादि ते "स्त्रीलिंगीं नद्यंत होतात" या सूत्रानें 'ईप्, ई' प्रत्ययांत केले जातात.

त्याच्यापुढें, रेफ ज्यांच्या आदि आहे असे शब्द अर्थात् राग, रत्न इत्यादि शब्द योजावे. याप्रमाणेंच नपुंसकलिंगीं 'अ' प्रत्ययान्त व स्त्रीलिंगीं 'सि' प्रत्ययांत तसेंच स्त्रीलिंग कर्मांत 'शस्' प्रत्ययांत भिन्न शब्द होतात. जसें—

प्रभावराजानीरागोल्लासप्रध्वंसिनी स्यात् ।
गीर्जिनस्य पदाब्जे च कुरुतां सुखसम्पदः ॥

यांत गीः (वाणी) यानें, विशेषण करायानें असतां स्त्रीलिंगीं सि प्रत्यय होतो. पदाब्ज विशेषण करायानें असतां पुन्नपुंसक शब्द होतो. सुखसंपद् विशेषण करायानें असतां कर्मणि स्त्रीलिंगीं शस् प्रत्यय होतो.

विशेषणानें परिच्छिन्न असे अग्न्यन्त (ऋकारान्त आणि उकारान्त) जे शब्द रेफादि शब्दांच्या पूर्वी असलेले द्विस्थ द्विपस्थमी कर्म स्त्रीलिंगीं बहुत्व विवक्षित असतां अद्भुताद्भुत होतें.

अन्त्यंत ह्मणजे ऋकारान्त आणि उकारांत अर्थात् स्थिति, पटु इत्यादि शब्दासारखे विशेषणांनी व्यापार करणारे पूर्वी असून त्यांच्या पुढें रेफादि अर्थात्—राग, रस, रव, रय, इत्यादि शब्द पुढें असतां अद्भुताद्भुत काव्य होतें. परंतु त्यांत विशेष एवढाच आहे कीं द्विस्थ अर्थात् उभयपदीं धातूच्या पुढें द्विपंचमी ह्मणजे पंचमीहून परस्मैपद द्विवचनांत व आत्मनेपदीं एकवचनांत अर्थात् कुरुतां तनुतां इत्यादि, या प्रकारच्या किंवा यासारख्या दुसऱ्या क्रियापदाच्या कर्मांत स्त्रीलिंगीं बहुत्वयुक्त विशेषण केलें जातें. जसें—

भवभेदपटूरागध्वान्तभानुस्थितीरयात् ।
प्रभोर्वचश्चयोऽङ्घ्रीच कुरुतां वः शिवं श्रियः ॥

यांत 'वचश्चयः' याचें विशेषण करावयाचें असता पटुशब्दाला व स्थिति शब्दाच्या पुढें पुल्लिंगीं सि प्रत्यय होतो, अंघ्रीचें विशेषण करावयाचें असतां पुंल्लिंगीं औसि प्रत्यय होतो, व श्रियः यांप्रमाणें स्त्रीलिंगीं कर्म विशेषण कर्तव्य असतां शस् प्रत्यय होतो.

"तमस्तोमभिदाचारुरविचन्द्राविवाङ्गिनाम् ।
स्वतुल्यो जिनवाक्पूरस्तनुतां सुखसम्पदम् ॥"
स्मेरपुष्कररोचिष्णुराजन्यकृतशेखरः ।
कृपाणस्तव हस्तौ च कीर्तिं वितनुतां श्रियः ॥"

याप्रमाणेंच अन्य ही यासारखेच शब्द लिहितों. जसें—शुचि, स्थिति, रुचि, मञ्जु, साधु, वल्गु, चारु, पटु इत्यादि. अन्त्यंत रेफादि शब्द रवि, रश्मि, रक्षा, रक्ष, रसा, रजः(स्), रहः(स्), रज्जु, रस, रत, रमणीय, रचित, रहित, रिपुरिक्त. रुचि, रुजा, रुचिर, रोचित, रेखा, रव, राजीव, राजा, रोम, रूप, राग, रामा, राजि, रय, रीति, रूप, रथी, रेवा, रोग, राम.

ः जे विषय सनान्त, स्वर, ति, स्वर, तृ प्रत्ययान्त लीला शब्दयुक्त धातु चतुर्थीचे एकवचनाच्या पुढें असलेले नमल यांनीं युक्त होतात. त्यांणीं अद्भुत लौकर होतें.

जे शब्द उकारांत व इकारांत प्रथमेच्या बहुवचनीं वकारान्त यकारांत होत्साते अर्थाशीं मिळतात त्या शब्दांनीं एकत्व आणि बहुत्व यांचें साम्य होतें.

उकारांत शब्द सांगतों. जसें—तरु, पुरु, भीरु, विभु, प्रभु, इत्यादि. शुचि, रुचि, राजि, नाभि, सुरभि इत्यादि हे जस् प्रत्ययीं निष्पन्न झाल्याचें उदाहरण जसें शोभितरवो वनप्रदेशा इव गायनः.

आतां या प्रकारचे शब्द सांगतों. सदाङ्कुरवः, अधिकविभवः, विप्रभवः, लोलपशवः, सदालम्बारवः, बहुशचिरसाधवः, अधिकदम्वः.

आतां इकारांत शब्द सांगतों. अनेकपशुचयो भूपाला इव देशाः, लोभितरुचयः, उग्रक्रोधराजयः, ज्ञातवेदनाभयः, सदासुरभयः, परमतिमयः, अभिभूमयः, परमरानयः, अयोनयः, अधिभूरयः, भोगिरयः, स्वच्छत्रपालयः, तारकलयः, शुभकेशवलयः, तारकेलयः, इत्यादि शब्द जाणावे.

आतां जे शब्द सनान्त म्हणजे सकारान्त व नकारान्त, तेच स आणि न याहींही न केले असतां अकारांत होऊन अर्थात् मिळतात. त्यांच्या पुढें प्रथमेच्या एकवचनानें एकत्व आणि बहुत्व यांचें साम्य होतें. जसें महस् इत्यादि शब्द सकारान्त व सद्मन् इत्यादि शब्द नकारान्त यांत सकार काढलेला मह शब्द व नकारहीन झालेला सद्म शब्द अर्थ देतो. सद्म या शब्दाचा सती मा लक्ष्मी यस्य सः सद्मः म्हणजे ज्याची लक्ष्मी चांगली आहे. त्याचा वाचक सद्म शब्द होतो. तसेंच परमहः ज्याचें तेज मोठें आहे असे सूर्यासारखे सत्पुरुष थोर होत असा मह शब्दाचा अर्थ होतो. 'परमशराः देश इव धनुर्धरः' म्हणजे धनुर्धारी पुरुष देशाप्रमाणें परमशरा आहेत. यांतला शर शब्द धनुर्धरपक्षी बाणांना न देशपक्षीं लव्हाळ्यांना वाचक आहे असें समजावें.

महनुमाः निबिडतमाः, पुरोगमनाः, बिलसदनाः, बहुधावदनाः, पुरो-

गच्छदनाः; कृतकादनाः, बहुश्रीमदनाः, बहुस्वस्थानाः, कृतवहुधानाः, परमध्वानाः, रम्यानेकपानाः, विशदध्वनदनाः, परमानाः, बहुधनदानाः, असमानाः, शोभितानाः, सम्पन्नयानाः, कलितस्वानाः, अधिकवचाः, कलशमनाः, बहुदमनाः, सम्पन्नमनाः, सम्पन्नयमनाः, सदयाः, सदाम्भाः, स्मैरदुर्धैरम्भाः, चरदुर्धैरजाः, बहुस्वर्णाः, प्रगुणितवेधाः, इत्यादि व यासारखे दुसरेही शब्द जाणावे.

आतां नान्त शब्द सांगतों. 'बिलसद्मा नागवर्ग इव पुण्यपुरुषाः' यांत बिलसद्मा या शब्दांत बिळांत राहणारे नागवर्ग, पक्षीं व पुण्यपुरुष बिल ह्मणजे पाताल इत्यादि बिलस्वर्ग यांत राहणारे असा अर्थ करावा. अथवा व आणि ब यांचा अभेद मानून विलसन्ति मा (लक्ष्मी) येषां असाही अर्थ करतां येईल. 'अनुल्लंघितसीमा जलधिरिव सत्पुरुषाः' यांत सीमन् शब्द नान्त आहे. परंतु ह्या नान्त शब्दाच्या पुढें विसर्गांचा लोप होण्याकरितां घोषवान्[१] स्वर योजावे. ह्या सकारान्त व नकारान्त शब्दांच्या पुढें जे वकार आदि असलेले शब्द तेच वकारहीन करून स्वरादिक (स्वर ज्यांच्या आदि आहेत असे) करावे. जसें-'विशिष्ट' या शब्दांतला वकार काढून अशिष्ट 'वर्ग' यांतला वकार काढून अर्गयेला, वार्ता, अशिष्ट, आर्त इत्यादि अर्थात् मिळतात ते शब्द योजावे. पुलिंगांत एकत्व आणि बहुत्व यांत साम्य होतें. जसें-'परमहाविशिष्टेन राघवा इव सप्त ऋषिगणः'

आतां वकारादि शब्द सांगतों-वनमाली, विनायक, वनगाहि, वर्द्धमान, वक, वारण, वार, वक्रमोदित, वासना, वीरण, विचकिल, विलाभोग, वर्षवधस्थान, वंश, वर्जन, वालि, वीजन, वरुण, वदन, वाम, वालानोदित, वम्नन, वन्ध, वार्य, वाल, विरूप, विभा, भोग, वध, वन, वृषभ, वात, वरोचित, वस्त्र वद्धि, वर, वल, वासर, वरण, वाटी, वाह, वाच, वक्षस्, वेधाः वंधनाश, वलिवेश इत्यादि.

जे शब्द स्वरसहित व स्वररहित होतात त्यांच्याशीं प्रथमेचें

---

१ वर्ण उच्चार करतांना अक्षरा प्रकारचा जो बाह्य प्रयत्न आहे त्यांतील 'घोष' हा एक प्रयत्न आहे. जे वर्ण कंठापासून उत्पन्न होतात ते घोष संज्ञक होतात.

एकत्व आणि बहुत्व यांचें साम्य होतें. जसें—द्वार्, रज्, भास्, पङ्केरुह्, क्षितिरुह्, ईदृश्, कीदृश् इत्यादि.

आतां यावरून रचलेल्या काव्याचें उदाहरण सांगतों. जसें.—

लोकालोकलसद्विचारविदुरो विस्पष्टनिःश्रेयस
द्वारः सारगुणालयस्त्रिभुवनस्तुत्याऽङ्घ्रिपङ्केरुहः।
शश्वद्विश्वजनीनधर्मविभवो विस्तीर्णकल्याणभा
आद्योन्येऽपि मुदं जनस्य ददतां श्रीतीर्थराजःसदा॥

नान्त शब्दांच्या पुढें विशेषणत्वानें प्रथमा विभक्तीचें एकवचन आणि बहुवचन यांचें साम्य होतें. जसें विलसद्धामाः कायस्थामानः इत्यादि.

आतां सान्त शब्दही अर्थात् मिळतात त्यांचीं उदाहरणें. जसें—यज्ञाभितसरसः, सुकविप्रबंध इव भीष्मपान्थाः.

तृन् आणि तृन् प्रत्ययान्त शब्दांच्या पुढें प्रथमेचें एकत्व आणि बहुत्व यांचें साम्य होतें. 'सुसम्पन्न योद्धारः सैन्यनिवेशा इव देशाधिपतिः' सम्पन्नयोद्धारः, सर्वदातारः, बहुधातारः, सज्जपातारः, मृगयातारः इत्यादि.

धातूच्या पुढें चतुर्थी मागें असतां विभक्तीला एकवचन होतें, त्याच्या पुढें नकार मकार अथवा लकार आदि असलेले शब्द योजले जातात. हे शब्द एकत्व आणि बहुत्व यांच्या क्रिया होतात. जसें—अभवच्चिन्तान्तम्, अराजन्, महान्, ध्यनरशीलया इत्यादि.

न्युपसर्ग शब्द मागें असलेल्या, राजि किंवा याच्या सारख्या दुसऱ्या विशेषणांनां क्षिप्त असें, व अंतीं क्रियाविशेषण सारभूत शब्दांनां, काव्य महाद्भुत होतें.

'न्युपसर्ग' म्हणजे नि हा उपसर्ग ज्याला लागला आहे असे अर्थात् निहित, निमग्न, निरुद्ध इत्यादि शब्द; त्यांच्यामागें असलेले राजिराजि, धूलिधूली, पालिपाली इत्यादि जे शब्द त्यांहीं अंतीं निकामम्, नितान्तम्, इत्यादि क्रियाविशेषणाचे सारभूत शब्दांहीं, स्त्रीलिङ्गांत प्रथमेच्या

एकवचनानें, व पुल्लिंगांत प्रथमेच्या द्विवचनानें, आणि नपुंसकलिंगानें प्रथमेच्या बहुवचनानें योजलें असतां महाद्भुत काव्य होतें. जसें—

"छिन्नाघवल्लीनिहताङ्गजन्मभल्लीनिबद्धोरुरुचीनिकामम्।
श्रीनैशलेयस्यजिनेश्वरस्याशिवायमूर्तिश्चरणौवचांसि॥"

आतां शब्द सांगतों. जसें—नाभी, पाली, भल्ली, भ्रुकुटी, वल्लरी, धूलि, व्रतति, वीचि, जाति, राजि, रुचि, सूचि, कुटि, कोटि, त्रोटि, वल्ली, मञ्जरी, वल्लरी, भेरी, गोणी, चुल्ली, उपधि, झल्लरी, प्रतोली, कदली, श्रेणी, आवलि, आणि आलि हे सर्वही इकारान्त आणि ईकारान्त आहेत. याप्रमाणें दुसरेही जाणावे.

आतां वर सांगितलेल्या शब्दांच्या पुढें योजावयाचे शब्द सांगतों. जसें—निहित, निबद्ध, नितान्त, निकुञ्ज, निचित, निरुद्ध, निमग्न, निश्चित, निशित, निवासित, नियुत, नियोग इत्यादि.

याविषयीं उदाहरणें, जसें—

" अदुरितराजीनिदलितकर्मश्रेणीनिरुद्धरागभरम् ।
मूर्तिक्रमौ वचांसि च जिनस्य लोके सुखं गाताम् ॥
स्फुरतिसुभाषितपालीनिहतप्रत्यूहसंशयं श्राद्धया ।
मूर्तिक्रमौ महांसि प्रभवतमुदितं वरं दातुम् ॥ "

यांत एकत्व विवक्षित असतां 'प्रभव' हा यांत क्रियासमभिहार होतो. द्वित्वाचा आणि बहुत्वाचा, आणि पर्शी कर्त्याचें संबोधन होतें.

रुचिराव, सुप्रभाव, दाव, पाव, विभाव, हाव, मंजुलाव, इत्यादि वकारान्त शब्दांच्या पुढें अनिबद्ध इत्यादि शब्दांनीं महाद्भुत काव्य होतें. जसें—

"सुप्रभावानिबद्धोद्यत्पुण्यभावानियोगतः ।
मूर्तिक्रमौ वचांसि श्रीजिनेन्द्रोर्जनतुप्रये ॥ "

इकार आणि उकारान्त शब्दांच्या पुढें ईरण उरसिकोपी उरूप भोग इत्यादि शब्दांनीं महाद्भुत काव्य होतें. जसें—

"वदनं पादौ वाचस्तव जिनसुरुचीरणाय दुरितानाम् ।
विमलतनूरसकोपि स्मरति मृदुरूपभोगार्थम् ॥"

इकार आणि उकार ज्यांची उपधा आहे असे सकारान्त व इकार (इकारान्त) शब्द जे दोन्ही अर्थात् लागले जातात त्यांच्या पुढें रेफ ज्यांच्या आर्धी आहे असे शब्द योजून रचना केली असतां महाद्भुत काव्य होतें. जसें—

"निहतजटासुरक्षस्कन्धौ विद्याश्च तर्जयस्वमपि ।
अयमायातो रामः प्रभवत मुदितं रणं कर्तुम् ॥"

यांतला 'जटायु' शब्द सकारान्त व उकारान्तही आहे. राक्षसाचें विशेषण करावयाचें असतां नपुंसकलिंगी प्रथमेचें एकवचन; स्कंधाचें विशेषण करावयाचें असतां पुल्लिंगी द्वितीयेचें द्विवचन, आणि स्त्रीलिंगी विद्यांचें विशेषण करावयाचें असतां द्वितीयेचें बहुवचन होतें.

यंचित इत्यादि शब्दांच्या मागें आकारान्त शब्द योजले असतां महाद्भुत काव्य होतें. जसें—

"मुखाम्भोजं कुचौ क्रीडा समभावञ्चितश्रिया ।
राधायायमुनतीरे विष्णोः सुखसमृद्धये ॥"

यांत 'मुखाम्भोजं, समभाव, व 'कुचौ समभो असें लावावें व पुढें 'यञ्चितश्रियः क्रिडा सभभाः इत्यादि रीतीनें योजना करावी.

रुचिरावञ्चितश्रियः यद्वर्यशयञ्चना व ऊ साधित राजित इत्यादि समपादाच्या शेवटीं असलेले अवमुख शब्द यांहीं तृतीया विभक्ति स्पष्टार्थ अशा शब्दांनीं अद्भुत काव्य होतें. जसें—ऊ साधित, राजित इत्यादि पदांच्या पुढें असलेले वेणी, विनकिल, वत्सादि, अवमुख तृतीया विभक्ति ज्याच्या शेवटीं आहे अशा शब्दांनीं स्त्रीलिंगी प्रथमेच्या एकवचनांत पुल्लिंगी प्रथमेच्या द्विवचनानें अद्भुत काव्य होतें. जसें—

'हृद्यां बालविलासेन मध्यश्रीरिव योषितः ।
कपोलाविव नागस्य श्रियं गाते भवद्भुजौ ॥

गाङ् व शैङ् हे दोन धातु गत्यर्थक आहेत. जसें-वनप्रदेशाविवशोभिता वेणी. विलासानें स्त्री; यांत वनपक्षीं 'शोभितौ' आणि 'एणी' असें करावें व स्त्रीपक्षीं 'शोभिता' आणि 'वेणी' असा शब्द घ्यावा. प्रावृण्मासाविव शोभिता विचकिलमलया स्त्री, राजप्रवेशे हट्टश्रेणीव शोभिता वस्त्रीमालाभिर्मरौ.

शोभित, राजित, मंडित, द्योतित इत्यादि. या शब्दांच्या पुढें वनमाली, विनायक, वदन इत्यादि शब्द पूर्वी लिहिलेले योजावे. स्त्रीलिंगी ईकारांत शब्दांनीं प्रथमेच्या बहुवचनानें साधित असून अर्थ मिळत असतां एकत्व आणि बहुत्व यांचें साम्य होतें. जसें-पाल्य, कल्य, मालिन्य, राज्य, सुशोभनार्य, सुशोभनबाल्य, अधिकवर्यः, सख्यः, मत्यः, सत्यः, विदितवेद्यः, विशदवलभ्यः, वार्यः, सदर्यः, दास्यः, सम्पन्नवाण्य इत्यादि.

तसेंच 'वनमिवोल्लासितश्रीकवयोनृपसभाप्रदेशाः' यांत नपुंसक एकवचन व पुल्लिंगी बहुवचन होतें. वैश्वानरा इव तेजोनुगतरुचिरे गात्रम्, अश्वकुलमिव यः शोभिततरः, प्रबलतमाः सेनाः प्रदोषवत्, शोभित इत्यादि शब्दांच्या पुढें निपात, निदाघ, निकेतन, निचित इत्यादि शब्द योजावे. स्त्रीलिंगी एकवचनानें आणि स्त्रीपुन्नपुंसकलिंगी बहुवचनानें साम्य होतें. 'शोभितानिखिलविभवेन', 'मण्डितानिचितदानेन' 'राजितानिकेतनैः,' इत्यादि.

शोभिता, राजिता, खण्डिता, मण्डिता, द्योतिता इत्यादि शब्दांच्या पुढें योजण्याला योग्य असे शब्द सांगतों. जसें-निखिल, निधन, निरय, निदान, निधान, निपात, निदाघ, नियति, निकुञ्ज, निलय, निःश्रेणी, निवसन, निचित, निशान्त इत्यादि.

'ई' कार आणि 'उ' कार आहे उपधा ज्यांची असे नकारान्त पीन, हीन इत्यादि. गान, मान इत्यादि शब्द इकारान्त केले जातात. नपुंसकलिंगी एकत्व आणि बहुत्व यांचें साम्य होतें. जसें-अधिकपीनि पनानीव कुलम्, विशदहीनि विलानीव कुलम्. परमहासमीनि वनानीव

समुद्रजलम्, तसेंच परमखगानि वनानीव विप्रकुलम्, स्वच्छगानि बहु-वर्णनागानि पुरोगानि परमध्यानि, सुसम्पन्नदानि परमदानि बहुधा नादानि मञ्जुलयानि. तसेंच पीन, हीन, मीन, पाठीन, शालीन, अध्वनीन, ईशान, प्रस्थान, इत्यादि शब्द घ्यावे. तसेंच वाजा, दाना, भारा, लाहाक्षा यांचा अकारान्तादि शब्दांच्या पुढें तृतीयेच्या एकवचनानें श्लेष होतो. सदालम्बयान्वितः, सदारुजयान्वितः, पुरोमदयान्वितः, बहुधानयान्वितः, सदादेपयान्वितः, सदारम्भयान्वितः, बहुधारयान्वितः, स्फुटमहेलयान्वितः, अथवाहयाद्याः, यांत 'बाहा' शब्द भुजांचा वाचक आहे; व तो आकारान्त आहे. सत्वरक्षयान्वितः इत्यादि.

सकारान्त व नकारान्त शब्द सि प्रत्ययानें साधलेले पुल्लिंगी योजलेले त्यांच्यापुढें क्रियाविशेषण करण्याकरितां अवमुख शब्द योजला असतां अद्भुत काव्य होतें.

महस् इत्यादि सकारान्त शब्दांनीं व सद्मन् इत्यादि नकारान्त शब्दांनीं पुढें असलेल्या क्रियाविशेषणांत वर, चरु, वाहित इत्यादि अवमुख या पदाशीं युक्त शब्दांनीं पुल्लिंगीं तीनही वचनांनीं अद्भुत होतें. जसें—'परमहावरम्,' 'विलसद्मवाहितमसरम्' (या दोन्ही उदाहरणांचा अर्थ पूर्वी दिला आहे.)

दीर्घ ज्यांच्या आदि आहे अशा नकारान्त शब्दांनीं स्त्रीलिंगी द्वितीयेच्या एकवचनाची रचना करून अर्थ मिळत असतां सकारान्त षष्ठीच्या बहुवचनान्त शब्दांनीं अद्भुत काव्य होतें.

दीर्घाहून पुढें असणारे नकारान्त शब्द यांहीं स्त्रीलिंगीं द्वितीयेच्या एकवचनानें साधलेले अभतः, स्थिर्ति, बिभ्रत् याप्रमाणें असणारे त्यांचें षष्ठीच्या बहुवचनाशीं साम्य होऊन अद्भुत काव्य होतें. असें—'मृदुना स्थिर्ति बिभ्रत्' इत्यादि. तसेंच सकारान्त शब्दांनीं व व्यञ्जन ज्यांच्या अंतीं आहे अशा अकारान्त शब्दांनीं द्वितीयेचें एकवचन व षष्ठीचें बहुवचन यांचें साम्य होतें. जसें,—'सरसां स्थिर्ति, परमहसां स्थिर्ति बिभ्राणः'.

तसेंच श्लेषविशेषानें पुल्लिंगीं आणि स्त्रीलिंगींही व्यञ्जनान्त शब्दाच्या पुढें विभक्तीचे प्रत्यय जस्, शस्, ङसि, आणि ङस् यांचें साम्य होतें. रेफनिमित्त असतां ऊ आणि स यांचेंही साम्य होतें. जसें,-गुणभृतो रयात्.

जस् आणि शस् सोडून नपुंसकलिंगींही साम्य होतें. जसें,-शुभावाचो रसात्, तसेंच धृत्, भृत्, वृत् यासारखे अकारान्त व व्यंजनान्त शब्द त्यांच्या पुढें सि प्रत्ययाचेंही साम्य होतें, जसें-गुणभृतोरयात्, येथें आकारान्त पक्षीं सिप्रत्यय श्लेषाचें विशेषण करावयाचें असतां स्त्रीलिंगीं आकारान्त शब्दाहून घोषप्रयत्नवान् निमित्त असतां सि, जस् आणि शस् यांना पुल्लिंगीं आकारान्ताहून सि, जस् आणि शस् यांना पुल्लिंगीं अकारान्ताहून जसाशीं साम्य होतें. जसें 'सोमपाजगति' यांत पुल्लिंगपक्षीं आकारान्त व अकारान्तही जस् शब्दाचा विषय होतो. अकारान्त विशेषणाहून पुल्लिंगीं स्त्रीलिंगांत जस् व स्त्रीलिंगांत शस् तसेंच घोषवत् निमित्त असतां स्त्रीलिंगीं सि यांचेंही साम्य होतें. जसें-धृतगुणाजगती.

पुल्लिंगीं अकारान्त शब्दाहून आकार ज्याच्या आधीं असा शब्द आला असतां सि आणि ङि यांचें साम्य होतें. जसें—वक्ष आस्ते.

तसेंच मृत्, भृत् आणि रूप शब्दांहून पुल्लिंगीं अकारान्ताहून सि आणि ङि यांचें व पुल्लिंगस्त्रीलिंगांत व्यंजनांत शब्दाहून जस्, शस्, ङसि, आणि ङस् यांचें नपुंसकलिंगीं ङसि आणि ङस् यांचें, आकार इत्यादि स्वर पुढें असतां साम्य होतें. जसें—गुणभृतआदरात्.

अकारान्त विशेषणाहून पुढें असलेल्या न्युपसर्ग शब्दांत निचित, निभृत इत्यादिकांसारखे ते असले तर पुल्लिंगीं जस् यांचें व स्त्रीलिंगीं सि, जस्, आणि शस् यांचें, नपुंसकलिंगीं जस् व शस् यांचें साम्य होतें, जसें—बहुगुणानिकामस्.

१. जस् हा प्रथमेच्या बहुवचनाचा प्रत्यय. शस् हा द्वितीयेच्या बहुवचनाचा प्रत्यय. ङसि हा पंचमीच्या एकवचनाचा प्रत्यय आणि ङस् हा षष्ठीच्या एकवचनाचा प्रत्यय असें समजावें.

२. हा तृतीयेच्या एकवचनाचा प्रत्यय आहे असें समजावें.

३. हा सप्तमी विभक्तीच्या एकवचनाचा प्रत्यय.

अकारान्त विशेषणाहून पुल्लिंगी औ[1] आणि जस् स्त्रीलिंगी जस् आणि शस् यांचें प आणि व यांचा लोप होणारा स्वर असतां साम्य होतें, जसें—बहुगुणा इह कामम्.

वृत आणि भृत यासारख्या शब्दांहून स्त्रीलिंगी सि आणि टा वचन (तृतीयेचें एकवचन) यांचें साम्य होतें. जसें— गुणभृतः तथा भूतेयं यासारख्या उदाहरणांत चतुर्थी आणि सप्तमी यांचेंही साम्य होतें. या-प्रमाणें दुसरेही पुष्कळ प्रकार संभवतात ते स्वतःच जाणावें.

कुरुताम् इत्यादि उदाहरणांत एकत्व आणि द्वित्व यांचा अराजन्म-लेपु येथें एकत्व आणि बहुत्व यांचा व्यतिभाते इत्यादिकांत द्वित्व आणि बहुत्व यांचें साम्य आहे.

## आतां स्वरांचा परस्पर श्लेप होण्याचा उपाय सांगतों.

त्यांत प्रथम अकाराचा इतर स्वरांशीं मग क्रमानें अन्य स्वरांना श्लेप कसा होतो तो सांगतों.

**ओस्, आम्, जस्, भ्याम् यांचे ठायीं स्वरांत गौणत्वानें अ आणि आ यांचा श्लेप होतो.**

जे शब्द अकारान्त व आकारान्त असून ज्यांचा अर्थ निरनिराळा आहे ते औस् इत्यादिकांशीं श्लिष्ट होतात. जसें—रामयोः रामाणां रामाः रामाभ्याम्, रामाय गृहनम्, इत्यादि रामाश्लेषः रामेच्छा, रामेप्सा, रामौयोतः, रामोढाः, रामैजनम्, रामैहिकः, रामौजः, रामौरसः, रामाम्बनम्, रामेङ्गितम्, उल्लासितरामो लक्ष्मण इव वसन्तः या उदाहरणांत समासानें गौणत्व येतें अशा प्रकारचे शब्द सांगतों. जसें—राम, लक्ष्मण, पद्म, कमल, बाल, शाल, आधान, काल, कच्छ, तारक, भालक, मालिक, जालिक, जप, जय, मुक्त, कान्त, प्रिय, सित, दक्षिण, दोप, अञ्जन, सून, वासन, रसन, प्रवाल, प्रकार, प्रमद, प्रवीण, प्रसभ, शिव, जीव, वत्स, धर, गोत्र, रस, दूल,

---

१. हा प्रथमेचा द्विवचनाचा प्रत्यय आहे असें समजावें.

२. हा षष्ठीच्या द्विवचनाचा व आम् हा बहुवचनाचा प्रत्यय. भ्याम् हा तृतीया, चतुर्थी आणि पञ्चमी यांच्या द्विवचनाचा प्रत्यय आहे असें समजावें.

क्षम, अनन्त, धिषण, परवश, आर्द्र, बहुल, तार, कील, सदा, रम्भ, काष्ठ, विनत, निकष, ग्रह, करण, घट, कक्ष, उच्छृंखल, हाल, विदेह, आर, निर्वीर, विधव, निष्कल, आणि श्रवण इत्यादि.

**अकार आणि इकार पुढें असलेल्या रेफानें व इन् याच्या पुढें असलेल्या समासानें श्लेष होतो.**

अकार आणि इकार सप्तमीच्या एकवचनीं पुढें असलेल्या रेफादि शब्दानें तसेंच इन याच्या पुढें असलेल्या समासानें तसेंच च्विप्रत्ययानें श्लिष्ट होतात. जसें—

सुबुद्धे रचितस्थितिः-येथें अकारान्तपक्षीं 'सप्तमी व इकारान्तपक्षीं पंचमी अथवा षष्ठी घ्यावी. 'शुद्धबुद्धिशोभितः' या उदाहरणांत अकारांत पक्षीं शुद्धश्चासौ बुद्धश्च शुद्धबुद्धः अस्यास्तीति शुद्धबुद्धि हा येथवर्ती इन् प्रत्यय झाला आहे. याप्रमाणें अनेक स्वरादिक शब्द जाणावे.

"सर्वादि शब्दाहून नेहमीं इन् प्रत्यय होतो. द्वंद्व, निंदित आणि रोग यांहूनही होतो." या नियमानें इन् प्रत्ययाची प्राप्ति होते असें जाणावें. जसें-शुद्धबुद्धी, भूतभीः आतां शब्द सांगतों. जसें—

शुद्ध, सिद्ध, प्रयत, विनय, मत, बद्ध, मग्न, रत, सुगत, जात, कान्त, नत, प्रस्तुत, शान्त, उन्नत, आयत, दुर्गत, सुरत, नवनीत, अवध, कृत, ज्ञात, अवन, अटन, निनद, प्रकृत, अभिजात, हर, अर, अदान, भूत, नाळ, बल, धन्य, प्रबोध, अनेक, पक्षतः, आढ, सदा, पद्धत, कादा, सुर, दुर्विध, वीत, दिष्ट, गुरुतर, वार, कर, कट, शाल, मुद, श्रुत, वर्धक, इत्यादि.

**अ इ च्वि प्रत्ययाहून गौण होतात.**

अकार आणि इकार च्वि प्रत्ययानें गौण श्लिष्ट होतात. जसें-गरीकृतश्रीः, गौरीभूतस्थितिः, यांत अकारान्त पक्षीं पंचमी किंवा षष्ठी होऊन च्वि प्रत्यय झाला आहे असें समजावें. आतां शब्द सांगतों. जसें-

मद, गौरव, रसा, गौ, पत्ना, मस्तक, मस्तक, पांसुल, नाल, नाद,

दर, गुरुतम, वसुतम, तन्त्र, नन्द, वदे, वाप, सरस, अवन, बहुतर, काल, ताल, हरिताल, कवल, ओष्ठ, बिम्ब, मागध, माधव, कर्कट, करीर, अर्जुन, कुट, कुम्भ, वर्धन, भारतर, चार, सन्नगर, नील, बाण, चण्डाभ, सदानिभ, ऐरावत, शृंग, निष्कुट, शम, कुश, कर्कर, मन्थन, सदा, संमुख कुण्ड, तुण्ड, परतन्त्र, सुमुखकूवर, सदामन्नधोरण, वैजयन्त, तीर, एकावल, असुर, आढक, सदातुवर, पिप्पल इत्यादि.

रेफानें पाहिलेल्या सि प्रत्ययानें अ आणि उ यांचा श्लेप होतो.

अकार आणि उकार प्रथमेच्या एकवचनाच्या शेवटीं असलेल्या रेफादि शब्दांनीं श्लिष्ट होतात. जसें—वटो रम्यः, यांत उकारांत पक्षीं पंचमी किंवा पष्ठी घ्यावी. आतां शब्द सांगतों; जसें—

पट, कट, रङ्क, काक, सशङ्क, वर, चार, केत, कन्द, उन्नय, दार, तर्क, वाह, शुम्भ, मय, बट्ट, भर, सदा, उड्ड, गोमया, भूरिमाय, उत, सदाकार, सक्त, पर, मद्य, स्तन, प्रभ, जराय, अवट, अश्व, ताल, इत्यादि.

अ आणि ऊ उकाराप्रमाणें होतात. नपुंसक विशेपण केल्यानें तर दीर्घ ऊच श्लिष्ट होतो.

जसें अकारांत उकारांत तसेंच ऊकारांत पूर्वी नपुंसक विशेषणत्वानें उकारांत केले जातात. नंतर उकारविधीनें श्लेप केला जातो. जसें—'अतिवधो रम्यतरः प्रकारः, क्रूरान्तरारिषु स्वसमानो मुनिमण्डलस्य, यांत उकारांत पक्षीं अतिक्रान्ता वधूः येन (मुनिमण्डलेन) तत् अतिवधु तस्य अतिवधोः असा विग्रह करावा. आतां शब्द सांगतों, जसें—

आगम, आलाव, यत्राग, परमन्द, अधिभ, प्रतिभ, पूनर्भ इत्यादि.

अ आणि ए सप्तमीच्या एकवचनीं श्लिष्ट होतात.

एकारान्त शब्द फारसे नाहींत ह्मणून अकारसहित पूर्वाक्षर शब्द अर्थात् मिळत असतील ते घ्यावे. जसें अधिकेवल संस्थितिः परेहरम्य-सदल्क्ष्मीः इत्यादि. यांत भकारांतपक्षीं सप्तमी घ्यावी. आतां शब्द सांगतों. जसें—

भेक, केवली, केलि, केतु, केश, केदार, केसर, क्रमेल इत्यादि.

ज्याणें रेफ पाहिला आहे अशा भिस् प्रत्ययाशीं गौणत्वानें अ आणि ए यांचा श्लेष होतो.

अकार आणि एकार तृतीयेच्या बहुवचनानें पुढें असलेला समस्यंत रेफादि शब्दांनीं श्लिष्ट होतात. जसें—'सदासन्नैरेरम्यः' ऐकारान्त शब्दही फारसे मिळत नाहींत. यास्तव ऐकारसहित पूर्वाक्षर व ऐकाराच्या पुढें असलेले रेफ यांचे अर्थ मिळत असतां ग्रहण करावें. जसें कैरव, भैरव इत्यादि. यांत सि प्रत्ययानें पाहिलेल्या व घोषवान् स्वर आधीं असलेल्या अक्षरांनीं संधि होत नाहीं. मुळीं संहितेचाच अभाव असल्यामुळें विरामाची विवक्षा असल्याकारणानें विसर्गच होतो.

अ आणि ऊ हे श्लिष्ट होतात.

अकार आणि उकार प्रथमेच्या एकवचनाच्या पुढें असलेल्या घोषप्रयत्नवान् ज्याचें पूर्वाक्षर आहे अशा धर्य इत्यादि शब्दांनीं श्लिष्ट होतात. जसें— 'नगोवर्यश्रीः' येथें अकारान्तपक्षीं सि प्रत्यय आहे असें समजावें.

उकारांत शब्दही फारसे नाहींत म्हणून ओकारसहित ज्याचें पूर्वाक्षर आहे अशा उकाराच्या पुढें अकार व घोषवान् स्वर अक्षरांशीं युक्त झालेल्या शब्दांचें ग्रहण करावें. जसें— कोरक, गोलक, मोलक, नयोधस्थितिः इत्यादि शब्दांत उकाराच्या पुढें अकार आहे.

कोयष्टिः, कोदण्डः, कोद्रवः, उग्रक्रोधवनूस्थितिः, कोलसल्लक्ष्मीः, पोगण्ड, गोधन इत्यादि शब्दांत उकाराच्या पुढें घोषवान् आहे. पुरोधोत: अधिकोपगतः इत्यादि शब्दांत सि प्रत्यय होत नाहीं. दोन्ही पक्षीं उद्योत इत्यादिकांशीं समास होतो.

उद्दीलयः अ आणि उ श्लिष्ट होतात.

अकारान्त शब्द जेव्हां उकारांत होतात तेव्हां त्यांच्या पूर्वीं दीर्घ

१. भिस् हा तृतीयेच्या बहुवचनाचा प्रत्यय आहे असें जाणावें.

२. [illegible]

विशेषणत्वानें उकारांत शब्द योजले जातात, नंतर उकारविधीनें श्लेष होतो. जसें— 'अत्यासन्नोऽसचिरः, स्वतुल्यः, कुलस्योदयः' यांत पक्षीं अतिक्रांता आ समस्तत्वानें सन्नोः येन कुलेन तत् अत्यासन्नु तस्य अत्यासन्नोः असा अर्थ करावा. याचप्रमाणें द्यौः शब्द अन्य शब्दही अशाच रीतीनें जाणावे.

गौणत्व असतां आकार अकाराप्रमाणें श्लिष्ट होतो.

आकारांत शब्द प्रथम अन्य विशेषणत्वानें आकारान्त करून नंतर अकाराच्या विधानानें सर्व स्वरांशीं त्यांचा श्लेष होतो. इकाराशीं श्लिष्ट झाल्याचें उदाहरण, जसें—'पुरे प्रचुरशाले रम्यता शरत्केदारस्येव' यांत शाला पक्षीं सप्तमी व शालि (भात) पक्षीं पंचमी किंवा षष्ठी जाणावी. आतां शब्द सांगतों, जसें—

शाला, सन्धा, विनता, प्रहेला, हेला, बहुलाला, परमहाला, महाशीला, मुक्ता, कांता, कला इत्यादि.

इकारानें श्लेष कसा होतो तें सांगतों. जसें—घटा, बहुलाला परमहाला, सुरुचिज्वाला, महाशाला इत्यादि. बहुलालीभूतः हें उदाहरण.

उकारानें श्लेष कसा होतो तो सांगतों. जसें—मन्या, सूना, कम्बा, वला, त्रपा, अम्बा, मृगया इत्यादि. 'धृतत्रपोरम्यः' हें यांचें उदाहरण.

ऊकारानें श्लेष होतो ते शब्द सांगतों. जसें—भा, प्रतिभा, अधिभा, पुनर्भा, कच्छादयः इत्यादि. 'अतिभोरम्यः प्रचारः' हें उदाहरण. आपल्या वृत्तीहून अधिक समुदायाविषयीं हें उदाहरण लावावें.

च्वि प्रत्ययानें आम् आणि उस् यांच्यांशीं पुढें स्वर असतां इई यांचा श्लेष होतो.

इकार आणि ईकार हे च्वि प्रत्ययानें तसेंच आम् आणि उस् या विभक्तींनें आणि स्वरांशीं श्लिष्ट होतात. जसें—सदावालिभूतः सदावलीनाम् सदा वल्योः सदावल्यनुगतादयः इत्यादि. आतां शब्द सांगतों. जसें–अवि, महाशालि, अधिकालि, प्रचुरालि, नन्दि, आलि, मलि, मलि इत्यादि.

इ आणि उ हे सप्तमीच्या एकवचनानें श्लिष्ट होतात.

जसें विधी प्रीतिः आतां शब्द सांगतों. जसें—अणिहेति, कटितारि, सदारि, शरारि, उधारि, सदाद्रि इत्यादि.

नपुंसकलिंगवृत्तित्व असतां इ आणि ऊ उकार विधीनें श्लिष्ट होतात.

इकार आणि ऊकार जेव्हां नपुंसकलिंगी असतात तेव्हां ऊकारांत असतात. ते क्लीब विशेषणत्वानें उकारांत केले जातात. नंतर उकाराच्या विधानानें श्लेष होतो. उदाहरण द्वेषापि, विशदयशोकुले.

इ, ए, ङसि आणि ङस् यांशीं रेफ असतां श्लिष्ट होतात.

इकार आणि एकार पंचमी आणि षष्ठीच्या एकवचनानें पुढें असलेल्या रेफादि रम्य इत्यादि शब्दानें श्लिष्ट होतात. जसें—सदासेरम्यः, एकारांत शब्दांचा अभाव असल्यामुळें येथें 'से' हा शब्द कल्पना केला आहे. त्याचा अर्थ—इना सह वर्तते इति सेः अर्थात् सकाम सदासेरभसाटोपः इत्यादि दुसरींही उदाहरणें जाणावीं.

सप्तमीच्या एकवचनांत य आणि वचा लोप करणारा स्वर असतां इ आणि ए हे श्लिष्ट होतात.

जसें सदारा आटोपा अरिरैः इत्यादि.

संबोधनांतल्या सि प्रत्ययाच्या योगानें य व चा लोप करणारा स्वर असतां इ आणि ऊ श्लिष्ट होतात.

इकार आणि उकार संबोधनाच्या प्रथमेच्या एकवचनानें यकाराचा आणि वकाराचा लोप करणारा स्वर असतां श्लिष्ट होतात. जसें कट, इह, कटि, कटु इत्यादि.

इकार आणि ओकार ङी विभक्तीत श्लिष्ट होतात.

इकार आणि ओकार सप्तमीच्या एकवचनानें यकार आणि वकार यांचा लोप करणारा स्वर असतां श्लिष्ट होतात, जसें-सदाशनीरतः

नपुंसकवृत्तित्व असतां ई इकाराप्रमाणें श्लिष्ट होतो.

ईकारान्त शब्द क्लीब विशेषणत्वानें इकारांत करून नंतर इकाराप्रमाणें सर्व स्वरांशीं त्याचा श्लेष होतो. इकार आणि उकार यांशीं श्लेष कसा होतो त्याचें उदाहरण. 'स्वीकृतपटी मित्रे प्रीत. आतां शब्द सांगतों, जसें —तनी, अपटी, कटी, लदावटी, तरी, चरी, करी, नारी, वारी, दारी, उकारानें श्लिष्ट झालेले—तमी, ननूभिः, भूः इत्यादि.

इकाराच्या वृद्धीनें इ आणि ऊ श्लिष्ट होतात.

क्लीब विशेषणत्वानें ऊकारांत शब्द उकारांत करून नंतर उकाराचें विधान केल्यानें सर्व स्वरांशीं त्याचा श्लेष होतो. उकारांत व अकारांत हे च्वि प्रत्ययानेंही श्लिष्ट होतात. तन्दु, कटु इत्यादि शब्द याचें उदाहरणभूत होत.

अं याच्या प्रयोगानें अनुस्वार श्लिष्ट होतो.

द्वितीयेच्या एकवचनाचा प्रत्यय जो अं त्यानें अनुस्वराचा श्लेष होतो. जसें—परागश्रीमहस्थितिः.

स्यादि अर्थात् विभक्तीचे प्रत्यय व त्यादि तिप् इत्यादि क्रियापदांचे प्रत्यय यांचा श्लेष होतो. तसेंच भाषेचा व शब्दांच्या प्रकृतीचाही श्लेष होतो. तो पूर्वी सांगितलेल्या भंगश्लेषाच्या उपायानें जाणावा. आतां विभक्तिश्लेष सांगतों. जसें—'भवतिरोहितः' यांत भवति हें क्रियापद निराळें करावयाचें असतां भवति आणि रोहितः अशीं पदें तोडावीं. व पक्षीं भव म्हणजे शिव अथवा संसार यानें तिरोहितः म्हणजे झांकलेला. स्यादि सि इत्यादि विभक्तिप्रत्यय ; पक्षीं विभक्तीचा लोप होत नाहीं किंवा समासानें त्यांचा लोपही केला जातो. जसें— भवतः स्यादिपक्षीं तव शिवत्तो या म्हणजे तुझ्यापासून अथवा भव म्हणजे शिव त्यापासून याप्रमाणेंच सर्वत्र जाणावें. उदाहरण भवन्ति रोहिताः भवासिततश्रीः भवासिततश्रीः भवायस्थिरया राजति रोहितः इत्यादि दुसरीं उदाहरणें जाणावीं.

आतां भाषाश्लेष सांगतों. जसें— किम्पि केवलम् पुरवञ्चन, कलि आनाधो कथम् यांत अर्थाचें ऐक्य असून भाषाश्लेष करावयाचा असतां समान असे संस्कृत व प्राकृत इत्यादि भाषांतले शब्द प्राकृत लक्षणानें जाणावे. जसें—गुरुभय, हरिण, नर कुल इत्यादि.

आतां प्रकृतिश्लेष सांगतों. महास्थितिः हें त्याचें उदाहरण होय. याप्रमाणें दुसरींही जाणावीं.

याप्रमाणें आठ प्रकारचाही श्लेष विस्तारपूर्वक सांगितला.

## आतां श्लेपाचा भेद सांगतों.

जसें—वर्ण, भाषा, लिंग, पद, प्रकृति आणि प्रत्यय यांहीं आणि विभक्ती आणि वचनांनीं आठ प्रकारचा श्लेष होतो. कल्पवर्थ यांत अकार आणि इकार या वर्णांचा भंग झाला आहे ह्मणून याला वर्णश्लेष ह्मणतात. स्वर्गलाभविभाशोभि, यांत पदाचा भंग होऊन श्लेप झाला आहे. लिंगश्लेपांत तनुर्नेत्रे वाह्याः कैरवराजिनी हें उदाहरण होय. हर उमे सुरमणो हा संस्कृत आणि प्राकृत भापांचा श्लेप होय. 'दारिद्र्यकृद्रिपौमित्रे' यांत कृ आणि कृत् यांच्या प्रकृतीचा भंग झाला आहे ह्मणून हा प्रकृतिश्लेष होय. 'गौरीभूत गुणोपेत' यांत ई च्वि या प्रत्ययाच्या भङ्गानें झाला आहे म्हणून हा प्रकृतिश्लेप होय. 'त्वमत्रारचयश्चक्रे' यांत त्यादि व स्यादि विभक्तीचा श्लेप झाला आहे. म्हणून हा विभक्तिश्लेप होय. विलसद्मानः यांत बहुवचन आणि एकवचन यापासून श्लेप झाला आहे ह्मणून हा वचनश्लेप होय. वर्णादिकांचा भंग न झाला तर राजा मृदुकरास्थितिः संसारसारम् इत्यादि स्थलीं अर्थाच्या ऐक्यानें संस्कृत आणि प्राकृत यांपासून श्लेप उत्पन्न होतो.

## आतां यमकाचा उपाय सांगतों.

समान असे स्वर, वर्ण, अनुप्रास तसाच श्लेप, वर्ण, पदें, आणि श्लोकाचे चरण यांच्या आवृत्तीनें यमक लौकर होतें.

अनुप्रास आणि श्लेष यांचे उपाय पूर्वी सांगितलेच आहेत. आतां उदाहरण सांगतों.

"हेलाविडम्बितहिरण्मयरत्नशृङ्गाः
शृङ्गारभासुररुचः सहचारिकान्ताः ।
कान्तारभूवसतयोऽत्र चरन्ति सारं
सारङ्गचञ्चलदृशो मरुतां महेलाः ॥
भवति वृद्धिकृते कमलागमो
जिनमतो नमतो नमतो मम ।
नरतिदाऽमरभूरुहकामधुक्
सुरमणी रमणी रमणीयता ॥
वनस्यान्तर्लसत्यत्र रतिभूतरुचारुणः ।
सुरौघः स्त्रीसखो रत्नैरतिभूतरुचारुणः ॥"

वक्रोक्ति, विरोधाभास, प्रश्नोत्तर, पुनरुक्ताभास इत्यादि अलंकारही श्लेषानें साध्य होतात; जसें—

"तरणिं पश्य सुश्रोणि नाथ कुत्रास्ति नौरिह ।
सवितारं प्रिये वच्मि प्रिय दूरे ऽधुना पिता ॥

या उदाहरणांतील पूर्वार्धांत तरणि शब्दांत व उत्तरार्धांत सवितारं यांत श्लेष आहे. 'तरणिं पश्य सुश्रोणि' कोणी पुरुष आपल्या मापुकाला ह्मणतो, हे सुश्रोणि तरणिं ह्मणजे सूर्याला पहा. यावर ती स्त्री तरणि ह्मणजे नौका असा अर्थ घेऊन त्याला विचारानें 'नाथ कुत्रास्ति नौरिह' नाथा येथें नौका कोठें आहे ? याप्रमाणें तरणि शब्दांत तिणें श्लेषानें विपरीत अर्थ केला आहे; ह्मणून तो सूर्याचें दुसरें नांव घेऊन तिला ह्मणतो 'सवितारं प्रिये वच्मि' प्रिये मी सवित्याला पहा ह्मणतों,

यावर सविता शब्दाचाही विपरीत अर्थ करून ती. ह्मणते 'प्रिय दूरे ऽधुना पिता ' हे प्रिया सविता अर्थात् जन्म देणारा बाप तो सांप्रत दूर आहे; हा वक्रोक्ति नांवाचा अलंकार असून श्लेषानें येथें साधला आहे.

आतां विरोधाभासाचें उदाहरण.

"भात्येष मेरुरुचिरोऽपि नमेरुशोभी
कृत्स्नामिलामपि वहन्नलिनाभिरामः ।
सव्यालवालमपि चन्दनपादपानाम्
नव्यालवालमभितो वहते समूहम् ॥"

यांत मेरुरुचिर ह्मणजे मेरुसारखा शोभणारा आणि याच्या विरुद्ध नमेरुशोभि नमेरु वृक्षासारखा शोभणारा तसेंच इला आणि नलिन सव्यालवाल आणि नव्यालवाल हे परस्पर विरुद्ध दिसतात, तथापि यांत त्यांचा खरोखरीचा विरोध नसून विरोधाचा केवळ आभास आहे, ह्मणून याला विरोधाभास अलंकार असें ह्मणतात. तो येथें केवळ श्लेषानें साधला आहे.

आतां प्रश्नोत्तर अलंकाराचें उदाहरण.

"मूर्ध्ना वहन्ति के कुम्भौ मुग्धा श्लिष्टा ब्रवीति किम् ।
क्रियते कुञ्जरास्यस्य किमु संबोधनं बुधैः ॥"

कुंभ मस्तकावर कोण धारण करितात; मुग्ध स्त्री आलिंगित असतां काय बोलते? हत्तीसारखें ज्याचें मुख आहे त्याला ज्ञाते पुरुष कोणतें संबोधन देतात? असे यांत तीन प्रश्न आहेत तिहींचेंही उत्तर 'गजानन' एवढ्यांतच आहे. पहिल्याचें उत्तर गज आणि गजानन; दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर आनन, आणि तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर गजाननपुत्र.

पुनरुक्त भासाचें उदाहरण.

" प्रद्योतनोऽम्बुजानां सविता महसां विकर्तनस्तमसाम् ।
निखिलजगच्चक्षुरसावम्बररत्नं रविर्जयति ॥

यांत प्रद्योतन, सविता, विकर्तन, जगच्चक्षु, आणि रवि हीं सर्व एकार्थीन अर्थात् सूर्याचीं नांवें असून यांतील सूक्ष्म अर्थावर दृष्टि देऊन एका श्लोकांत याचा पुन्हा पुन्हा प्रयोग केला आहे. यांत खरोखरी पुनरुक्ति होत नाहीं, परंतु तिचा आभास होतो ह्मणून याला पुनरुक्ताभास अलंकार ह्मणतात, तो येथें श्लेषानें साधला आहे.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृत्तौ काव्यकल्पलतामञ्जर्यभिधायाः श्लेषसिद्धिप्रताने तृतीये अद्भुतविधिनामकश्चतुर्थः स्तबकः समाप्तः ॥ ४ ॥

---

होतो. काकुक यांत काकु शब्दानें ध्वनिविशेष घ्यावयाचा. काकुङ्कम् करोतीति काकुकः असा विग्रह करायाचा "अन्यतोऽपि" या नियमानें येथें शेवटीं ड प्रत्यय झाला आहे.

## आतां एकाक्षरादि शब्द ककारादिकांच्या नियमानें लिहितों.

जसें—कु, ककुप्, काकु, क, कि, केका, कः, एकाकी, किम्, कः, कौ, के, कान्, क, का, कें, काः, काम्, के, काः, किम्, के, किम्, के इत्यादि आतां अकम् पापादिकांविषयीं, काकम् कावळ्यांच्या समुदायाविषयीं क ब्रह्म इत्यादिकाविषयीं, कम् मस्तकादिकाविषयीं, काका कावळा, आणि मांडी इत्यादिकाविषयीं, अङ्कः भूषणादिकाविषयीं, एकाः संख्यादिकाविषयीं, कङ्कः, यमादिकाविषयीं, काकः द्विजादिकाविषयीं, कोकः चक्रवाकादिकाविषयीं, ककुद् राजचिन्हादिकाविषयीं.

खम् इंद्रियादिकाविषयीं; खः सूर्यादिकाविषयीं; आखुः म्हणजे उंदीर, गम् गंधर्वादिकाविषयीं, गम् गायनाविषयीं, गौः स्वर्गादिकाविषयीं, आगः वृक्षादिकाविषयीं, अङ्गम् शरीरादिकाविषयीं, इंगम् इंगितादिकाविषयीं, आगः मंत्रादिकाविषयीं, आपः प्रतिज्ञेविषयीं, गङ्गा गौः गाम् आणि अङ्ग इत्यादि दुसरेही शब्द पहावे.

घ घंटीशाविषयीं, घः लहान घाट इत्यादिकाविषयीं, अघम् दुःखादिकाविषयीं, ओघः प्रवाहादिकाविषयीं.

चः चंद्रादिकाविषयीं, चञ्चुः तोंडण्याविषयीं, चञ्चुः चंचू प्रमाणेंच यांत चञ्चुप् हा प्रत्यय असून चित् व उकार आहे. चोचं म्हणजे वल्कल.

जः जैत्रादिकाविषयीं, जुः आकाशवाणी इत्यादिकाविषयीं, अजः ब्रह्मदेव इत्यादिकाविषयीं, आजिः युद्धादिकाविषयीं, ओजः बलादिकाविषयीं, अजूः अजाः इत्यादि.

टः आणि खेटम् पृथ्वीवि०, अट्टःबाजार इत्यादिकावि०, याप्रमाणेंच आटिः, अट, आरट, आटीन् इत्यादि शब्द जाणावे.

डः शिवादिकावि०, इडा बुधाची स्त्री इत्यादिकावि०, ईड स्तुतीवि०.

ईषा अणकुचीसारखा गाडीच्या आंसाला खिळा घालतात तो व त्याच्यासारखे दुसरे.

णः निष्फल इत्यादि०, अणुः भात इत्या०, एेण चोर इत्या०.

ता, लक्ष्मी, अन्तः काठ इत्यादि०, ईतिः रात्रिः इत्या०, उतिः रक्षणादि०, एतः आगमादि०, ततम् वीणादिवाद्यावि०, ततः व्याप्ति इत्यादि०, ततः बाप इत्यादि०, तृट् तहान इत्या०, तन्तु, तुक्, अपत्यम्, आतिः, तन्तुः हा शब्द उदकांत राहणाऱ्या एका प्रकारच्या प्राण्याविषयीं, अन्तर आणि उतः हे ओवलें ह्याविषयीं, ऊतः उकललेल्याविषयीं, तत्, तौ, तम्, तौ, ते, तान्, तैः, ताः, ताम्, ते, ताः तत्, ते, उतु, अति, अतः एतिः, नतिः, तान्तः, इति, एतौ, एते, एतम्, एतौ, एतान्, एतैः एते, एताः, एताम्, एते, एताः, एतत्, एते, उत् इत्यादि.

थः पर्वतादिकाविषयीं, अथः अथो इत्यादि.

दम् स्त्रीविषयीं, दा दानादिकाविषयीं, दृक् नेत्रादिकाविषयीं, अन्दु बेडी इत्यादिकाविषयीं, दिव् इन्दुः वसुदेवाविषयीं, दौः ह्मणजे आदि, इदं, अदः, अदात्, ददे, ददौ इत्यादि.

धा कुबेरादिकाविषयीं, धुः भारादिकाविषयीं, अंधः आंधळा इत्या०, आधिः मनोगतपीडा इत्या०, अन्धस्, धीः, उधः, अन्धु, एधस्, एधः, धुर, धुरी, गाडीच्या धुरी इत्या०, अधः, आधि, धिक्, इत्यादि.

नो बन्धनादिकावि०, निः नायकावि०, नुः, स्तुतीविषयीं, नौः तरीविषयीं, अन्नम् भातादिकाविषयीं, इनः धनी इत्यादिकाविषयीं, उन्नः, नपुंसकादि०, ना, नो, आनन, अन्तः, नुन, नाना, ननु, न, नो, नूनम्, अनु, ऊनः, एनम्, एनाम्, अनेन, एनः इत्यादि.

पः पवनादिकाविषयीं पुः नगरादि० पूपः, अपूपः, आपम्, पापम्, पपिः ह्मणजे सूर्य. अपि, अप, पंपा, उपः, आपार आणि उपः आपत्कालाविषयीं, आणि उपाः ह्मणजे मध्यान्हरात्र इत्या०.

वः वरुणादिकाविषयीं, विः पक्ष्यादिकांविषयीं बिम्बम् प्रतिबिम्बादि०, अम्बा अम्बु बिम्बि (व आणि ब यांचें ऐक्य असल्यामुळें दोहोंचें मिश्रण केलें आहे.) व स्त्रियादिकाविषयीं, अविः मेषादिकाविषयीं,

याह् गमनादि०, विवाद, अन, एव, इय, या, ये, आयाम्, व, विश, अयाह् यिन्, आयि: आणि यि: इत्यादिक.

भ: शुक्रादिकावि०, भास् कांति इत्या०, भम्, भा, भुः, भुम्, भीः, भम्, भा, भोः उभा, आभा, अभि, भुक्, इभ, भिन्, भाक्, भो, भिः, आभिः, प्रभिः प्रभान, अभाः इत्यादि.

मः शिवादि०, मा लक्ष्म्यादि०, माम मासादि०, मुः बंधनादि०, आमः कर्म इत्या०, उमा गौरी इ०, मुन् हर्षादि०, इमौ, इमे, इमं, इमौ, इमाम्, इमे, इमाः, अमु, अमो, अमुम्, अमून्, अमूः, अमा मह या अर्थादि०, मा निवारणार्थावि०, माम्, मे, मम, अमात्; इत्यादि.

यः यायु इत्यादिकाविषयीं, यम् पशुवि०, याः यान (वाहन) इत्यादिका० ययुः घोडा इत्या०, युध अयस्, आयुः, अये, अयम् अयि, आयाः यः, यौ, ये, यम्, यौ यान्, यैः, ययोः, या, ये, याः, याम्, ये, याः, यया यत्, ये, अयान्, अयाम्, ययोः, ययुः, इयाय, ईयुः इत्यादि.

रः मदनादिकावि०, री भ्रांतीवि०, रुः सूर्यादि०, रैः धनादि०, अरः ह्मणजे अठरावा जैनांतला तीर्थंकर, अरम् ह्मणजे चाकाचें अंग इत्या०, आरः मंगळ इ०, आरा ह्मणजे (चांभाराची) आरी, इरा, जलादि० ररुः देव्यादि०, रुक् शोभादि०, अरर आणि अररि दोन्ही कवाडावि-षयीं, रिरि आणि रीरी हे दोन्ही तांब्याविषयीं, रुज्, रोरः उरु, अरुः, ईर, उर, उरस्, रुष्, राज्, अरि, अर, अरे, रे, आरत्, आरात्, अराः रौ, रुरुः, ररे, आर, आणि आरुः इत्यादि.

लः इंद्रादि०, लुः लाव्याविषयीं. ली, शेषादिकाविषयीं, आलिः भ्रमरादिका०, आलि ओळ इत्या०, आलु कन्द इत्या० इला भूमि इ०, लीला विलासादिका०, लोल चंचलादिकावि०, लोला जीभ इत्यादि०, इलीं शस्त्र धारण करणारा, उलूलः आणि आलुः करपत्रिकेविषयीं, अलम् हरताळ व निरर्थक यावि०, लाला अग्नि, अल, हे विंचवाच्या नांगी-विषयीं, तुलन, ललन, पेला, अण्डल आणि आल हे प्रत्यय होत. एड, आली, लाली, एल, अलात, अलु, ललौ; ललुः, लले, इत्यादि. ड आणि ल यांचें ऐक्य असल्यामुळें यांत डकारही होतो असें जाणावें.

शम्, शुभादिवि० श्रा साक्षेविपर्यी, शो, निजण्यावि० चंद्रात्रि ० अंशु किरणादिकावि०, आशा दिशादि०, आशः भात इत्या०, ईशः शिवा-दिकावि०, शशः, शशी, वंश, हे प्रसिद्धच आहेत. आशीः मंगलकारक वाक्यादिकावि०, शुक् शिशुः, ईशा नांगराच्या दांडा वि०, आशु हें प्रसिद्धच आहे.

षः श्रेष्ठाविपर्यी, पू गर्भमोक्षणावि०, उषा रात्रिइत्यादिकावि० उषः प्रातःकालची संधी इ०, इषा इत्यादि.

सः अप्रत्यक्षाविपर्यी, सा लक्ष्मीवि०; सत्, अंसः, असृज्, सीसम्, सत्, असु, असिः, स, साम्, असौ, आसन्, आसीत्, आसे इत्यादि.

हः हस्तादिकावि०, अहिः सर्पादि० ईहा इच्छादि, अहः, हाहः, हूह, ऊह, हद्, अंह, इह, हे, हैं, अहो, हम्, हो, ही, अहह, ह, हाहा, अह, आणि आहुः इत्यादि याप्रमाणें दुसरेही शब्द जाणावे.

अः विष्णु, आ ब्रह्मदेव, इः काम, ईः लक्ष्मी, उ शिव, ऊ रक्षणा-विपर्यी, ऋ देवमाता ( अदिति ), ॠ दानवमाता ( दनु व दिति ), ऌ अदिति, ॡ वाराही (देवी ), ए विष्णु, ऐ शिव, ओः ब्रह्मा, औः शेष, ओम् परब्रह्म, अः शिव.

कः—ब्रह्मा, आत्मा, प्रकाश, सूर्य, मोर, वायु, यम आणि अग्नि.

कम्—मस्तक, उदक, आणि सुख.

कुः—भूमि आणि आवाज.

किम्—तिरस्कार, निंदा, प्रश्न आणि संशय.

खम्—इंद्रिय, स्वर्गलोक, आकाश, राजा, शून्य, सुख आणि संवित् ( ज्ञान ).

खः—सूर्य.

गः—गाणारा आणि गंधर्व.

गम्—गायन.

गौः—विनायक, स्वर्गलोक, दिशा, पशु, किरण, गाय, भूमा ( व्यापक ), शिव.

गिरिः—उदक आणि डोळे.

घः—घंटीचा.

घा—लहान घाट, वध आणि ध्वनि.

ङः—भैरव, विषय आणि इच्छा.

चः—चंद्र आणि चोर.

छः—सूर्य व छेदक.

छम्—निर्मल.

जः—जिंकणारा आणि विगत.

झः—आकाश, पिशाचि आणि वेगानें धांवणारा.

ञो—नाश पावलेला, गायन, सुंदर वाक्य अथवा भाषण आणि घरघर शब्द.

टम्—पृथ्वी आणि करंक.

ठो—ध्वनि आणि महेश्वर, शून्य गृह (मोठें) मेघ आणि चंद्रमंडल.

डम्—शिव, ध्वनि आणि जाप.

ढा—निर्गुण, शब्द आणि ढक्का नांवाचें वाद्य.

णः—निष्फल आणि ज्ञात.

तः—चोर आणि डुकराचें शेंपुट.

ता—लक्ष्मी.

थो—भयापासून रक्षण करणें आणि पर्वत.

दम्—पत्नी.

दा—दाता व घन, छेद आणि वंद.

धा—गुह्यकांचा स्वामी (कुबेर) आणि धाता.

धीः—बुद्धी.

धुः—भार, कांपरें आणि चिंता.

नः—बंध आणि बुद्ध (ज्ञाता).

निः—नेता (नायक).

नुः—स्तुती.

नौः—नाव.

पः—पालन करणारा, वायु आणि जलपान.

फः—झंझावात आणि फेंस.

फुः—फुत्कार व निष्फल भाषण.
वः—वरुण आणि कलश.
वीः—ख (आकाश) आणि पक्षी.
भः—मुंड, भो, भ्रमर आणि शुक्र.
भा—कांति.
भूः—भूमि व स्थान.
भीः—भय.
मः—शिव आणि चंद्र.
मा—चंद्र, मस्तक, मान, लक्ष्मी, माता आणि वारुण यांतल्या शेवटच्या चहूंचा वाचक असतां 'मा' हें अव्यय होतें.
मुः—बंधन.
यः—वायु.
यम्—पशु.
याः—भावजया, खाट, यान आणि लक्ष्मी.
रः—ध्वनि, तीक्ष्ण, वैश्वानल (अग्नि), काम.
राः—सुवर्ण, मेघ आणि धन.
रीः—भ्रम.
रूः—भय आणि सूर्य.
लः—इंद्र आणि चलन.
लू—लव्हाळा.
ली—शेप आणि कांकण.
वः—महेश्वर वरुण आणि वायु.
वाः—हें औपम्याविषयीं होतें, पण तेव्हां अव्यय असतें.
शम्—शुभ.
शा—गाईच्या गव्यांतली पोळी.
शीः—निर्मळ.
शुः—चंद्र.
शाः—भेद.
शूः—गर्भविमोक्षण.

सः—परोक्ष.

मा—लक्ष्मी.

शी—पतंग, हात, लांकूट आणि शिव.

क्षः—क्षेत्र आणि राक्षस.

याप्रमाणें नाममाला प्राचीन विद्वानांला मान्य अशी सांगितली. त्यांत एकार्थ आणि नानार्थ अक्षरांनीं नांवें आहेत.

## आतां दुसरे शब्द सांगतों.

रुक्—शोभा किरण आणि इच्छा.

वाक्—सरस्वती आणि बोलणें.

सत्—विद्यमान व सत्य. प्रशस्त, पूजित आणि साधु.

ककुत्—राजचिन्ह व बैलाचें प्रधान अंग अर्थात् वशिंड.

धूः—गाड्याचें तोंड, भार.

पूः—शरीर आणि नगर.

दृक्—द्रष्टा, दर्शन, नेत्र (दृष्टी).

विट्—प्रवेश, मनुष्य आणि वैश्य.

तृट्—लिप्सा, तहान.

भा—प्रभाव आणि तेज.

मः—महिना आणि चंद्र.

हे शब्द श्लोकांतल्या युग्मपादाच्या म्हणजे दुसरा आणि चवथा चरण यांच्या शेवटीं योजण्याला उपयोगीं पडतात.

अकम्—दुःख आणि आप.

अङ्कः—भूषण, रूपक आणि चिन्ह. हे चित्रादिकानें ठायीं नाटकादिकांच्या भागाच्या ठायीं व स्थान, मांडी आणि जवळ येणें यांच्या ठायीं चालतो.

एकः—अन्य केवल श्रेष्ठ आणि संख्यावाचकही होतो.

कङ्कः—यम आणि लोह पृष्ठ (सुतार) नांवाचा पक्षी, तसेंच ब्राह्मण नसून ब्राह्मणाचें चिन्ह धारण करणारा.

काकः—पायांनें चालणारा, डोकें धुणें व द्विक, द्वीप, प्रमाण आणि एक प्रकारचा वृक्ष.

काकम्—कावळ्यांचा समुदाय व स्त्रियांच्या रतिक्रीडेंतलें एक आसन.

काका—काकजङ्घिका, काकोदुम्बरिका, काकमाचिका, रक्तिका, काकोली, आणि काकनासा.

कोक—चक्र आणि लांडगा, खजुरीचें झाड, बेडूक.

अग—वृक्ष, पर्वत, सर्प, आणि सूर्य.

अङ्गम्—जवळ, अंग, हाच शब्द विशेषणीभूत झाला असेल तर तरवार, उपाय आणि प्रतिक यांचा वाचक होतो.

अङ्गानि—वृद्धि शेष.

इङ्ग—इंगित, अद्भुत, ज्ञान आणि जंगम.

अघ—दुःख, व्यसन आणि पाप.

ओघ—प्रवाह, सङ्घात, अङ्कतांची परंपरा आणि उपदेश.

चञ्चु—त्रोटि, आणि पञ्चाङ्गुल.

अज—बकरा, हर, विष्णु, रघुराजाचा मुलगा, ब्रह्मदेव आणि मदन.

आजिः—क्षण, सपाट जमीन आणि युद्ध.

अट्टाः—अट्टाळी ( घरावरची गच्ची. ) जलद, नौक आणि भात व बाजार.

इडा—इला आणि बुधाची स्त्री, गाय, वाणी, स्वर्गांतली भूमि आणि नाडी.

अणि, आणि—चाकाचा खिळा, अश्रु, सीमा.

अणुः—भात आणि अल्प.

अन्त—जवळचा प्रदेश, बाजूचा भाग, स्वरूप, निश्चय, नाश आणि अवयव.

ईतिः—युद्ध आणि प्रवास.

ऊतिः—विणकर आणि रक्षा.

एतः—कबरा रंग आणि आलेला.

ततम्—वीणादि वाद्य.

तनः—व्याप्त; वायु आणि गोडा..

तातः—ज्याच्यावर दया करावयाची असेल तो आणि बाप.
अन्दूः—बेडी आणि भूषण.
अन्धः—अंधकार व ज्याला डोळे नाहींत तो.
आधिः—बंधन, प्रकाश, मानसिक पीडा संकट आणि अधिष्ठान.
अन्नम्—काळे आणि भात.
इनः—धनी व सूर्य.
उन्नम्—भिजलेले आणि दयाळू.
बिम्बम्—प्रतिबिम्ब, मण्डळ आणि बिंबलीचें फळ.
आमः—कच्चें, एक प्रकारचा रोग आणि प्रेम.
उमा—शिवाची पत्नी, हळद, कीर्ति, कांति व जवस.
ययुः—यज्ञांतला घोडा, सामान्य घोडा.
अरः—अठरावा तीर्थंकर (जैनांतला).
अरम्—हंस, शीघ्र, व शीघ्र जाणारा.
आराः—शनि.
रीरी—मंगळ.
आरा—चामडें कापावयाचें हत्यार.
इरा—उदक, वाणी, सुरा आणि भूमि.
रुरु—दैत्य आणि मृग.
अलिः—सुरा आणि भ्रमर.
आलम्—हरितालक, निरर्थक, श्रेय.
आलिः—ज्याचें अंतःकरण शुद्ध आहे तो, अनर्थ, सखि, ओळ अथवा पंक्ति, सेना, वालुका आणि गळती.
अलुः—कन्द आणि भेलुक.
लः—याचक गाईची वाणी आणि बुधाची स्त्री.
लीला—क्रीडा, विलास आणि शृंगारभाव व्यक्त करणारा व्यापार.
लोलः—चंचल व आशाभूत.
लोला—जीन व लक्ष्मी.

अविः—मेंढा, सूर्य, पर्वत, उंदीर आणि कांवळें.

अंशुः—सुताचा सूक्ष्म अंश, किरण आणि सूर्य.

आशा—दिशा आणि तृष्णा.

आशु—भात आणि लवकर.

ईशः—स्वामी आणि रुद्र.

ईशा—नांगराचा दांडा.

उषा—बाणासुराची मुलगी आणि रात्र.

आगः—पातक आणि निंद्य (अवद्य) अपराध.

आशिः—हितचिंतन करणें आणि सर्पाची दाढा.

उशाः—संध्याकाल आणि प्रभातकाल.

उरः—श्रति आणि मुख्य.

ओजः—कांति आणि प्रकाश, अर्डावणें, बल, धातु आणि तेज

ओकः—घर.

ऊकः—आश्रम.

आहिः—सर्प, वृत्र व तटवंदी.

ईहा—उद्योग आणि स्पृहा.

हे दोन स्वरांचे व एक अक्षरांचे शब्द सांगितले.

## आतां अव्ययें सांगतों.

तींही पूर्वीप्रमाणेंच स्वरांच्या क्रमानें सांगतों.

अः—स्वार्थी.

अपिः—अस्वभावाविषयीं.

आ—स्मरण आणि वाक्य.

आङ्—थोडा या अर्थी.

व्याप्तिः—क्रिया, योग व अवधी.

आ—अवधृति व स्मृति.

आः—संताप आणि राग.

इः—खेद आणि अत्यंत क्रोध.

ई—राग व दुःखाची भावना. प्रत्यक्ष, सन्निध गोड शब्दानें बोलविणें व अर्थ.

उः—प्राधान्य, प्रकाश, प्राबल्य, अस्वास्थ्य, शक्ति, विभाग बंधन, मोक्ष, भाव, लोभ आणि ऊर्ध्व कर्म.

ऊं—प्रश्न, अङ्गीकार आणि रोष.

ऊ—प्रश्न आणि रोषवाचक.

ऋ—निंदा आणि वाक्य.

ए ऐ—हीं हे दे शब्दाप्रमाणें जाणावीं.

ओम्—आमंत्रण, बोलाविणें, प्रणव, आणि अंगीकार.

उ ऊ—हे दोन्ही हो हो याप्रमाणें आव्हान व संबोधन याविषयीं.

कः—पापिष्ट, निंदा ईषत् (थोडें) या अर्थी आणि निवारण याविषयीं.

कम्—सुख, उदक आणि मस्तक.

किम्—प्रश्न आणि निंदा.

चः—अन्योन्य अर्थाचा समाहार व अन्वाचय आणि समुचय हेतु दुसरा पक्ष, तुल्ययोगिता, विनियोग आणि अवधृति.

तु—अविशेष आणि अवधारण, समुच्चय व पादपूरण.

धिक्—निर्भत्सना आणि निंदा.

नि—फेकणें, जलद या अर्थी, नित्य या अर्थी दान कर्माचे ठायीं, सन्निधान व उपरम, संश्रय, आश्रय, राशि, मोक्ष, अन्तर्भाव, अधो भाव, बंधन आणि कौशल्य.

नु—प्रश्न, अनुनय, अतीतार्थ, विकल्प, वितर्क.

नञ्—ईषत् या अर्थी, सादृश्य, तद्विरुद्ध, तदन्य, व्यतिक्रम स्वरूपात, निषेध आणि अभाव.

वा—समुच्चय, हान या अर्थी, उपमा आणि विकल्प.

वि—शिष्ट, अतीत आणि नानार्थ.

वै—हेतु व पादपूरण.

शं—कल्याण, सुख, संप्रकृष्टार्थ, आणि संगमार्थ, शोभनार्थ, आणि समासार्थ.

ह—संबोधन व पादपूरण.

हा—शोक, दुःख आणि विषाद.

हि—हेतु, अवधारण, विशेष आणि पादपूरण.

ही—विस्मय, विषाद आणि दुःखाचा हेतु.

हं—रागाचें भाषण, समाधान.

हुं—तर्क आणि प्रश्न.

अंग—पुनरर्थीं, संबोधन आणि आनन.

अति—प्रोक्त प्रकाशार्थ, लंघनार्थ, भृषार्थ स्तुति आणि असंप्रतिक्षेप.

आरात्—दूर आणि समीप.

इति—स्वरूप, सान्निध्य, विवक्षानियम, मान्य, हेतु, प्रकार, प्रत्यक्ष, प्रकाश, अवधारण, एवं या अर्थीं व समाप्ति.

उत—प्रश्न, वितर्क, समुच्चय आणि विकल्प.

अथो आणि अथ—समुच्चय, मंगल, संशय, आरंभ, अधिकार, अनंतर, अन्वादेश, प्रतिज्ञा, प्रश्न, आणि साकल्य.

अनु—लक्षण, वीप्सा, इत्थंभूत, भाग, सांनिधि, सादृश्य, आयाम, हीन, पश्चादर्थ आणि सहार्थ.

ननु—आक्षेप, परिप्रश्न, प्रत्युक्ति, अवधारण, वाक्यारम्भ, अनुनय, आमंत्रण आणि अनुज्ञा.

नाना आणि विना—उभय, अनेकार्थ, अपि, अस्तेय, हर्ष, अपकृष्ट, वर्जन, विपर्यय, वियोग, निर्देशार्थ, विकृत्यर्थ इत्यादिकांचे ठायीं ज्ञाते त्यांची योजना करतात.

अपि—संभावना, शंका, गर्हणा, समुच्चय, प्रश्न, युक्त पदार्थ, कामचारक्रिया.

उप—आसन्न, अधिक, हीन, सादृश्य, प्रतियत्न, उद्योग, व्याप्ति, पूजा, शक्ति, आरंभ, दान, दाक्षिण्य, आचार्यकरण, दोषाख्यान आणि अत्यय.

## भेद्यरूपक सांगतें.

जसें—'कोपपावकपर्जन्यः' सोप्यरूपक सांगतें; जसें—'विवेकाम्भोजभास्करः'. आधाररूपक सांगतें; जसें—'गुणरत्नपयोराशिः'. आधेयरूपक सांगतें; जसें—'गुणाम्बरनिशाकरः'. नपुंसकलिंग आणि पुल्लिंग शब्द शौर्य, शम इत्यादि, स्त्रीलिंग रोप्याहे होतात; जसें—

"शौर्यलक्ष्मीलताभेद्यः शमश्रीकौमुदी विधुः ।
महः शोभाब्जिनी सूर्यो दानस्थितिसुधाम्बुधिः ॥"

स्त्रीलिंग शब्द संधा, अहंकृति इत्यादि; पुढें असलेल्या प्रपंच, विस्तार, प्रसर हे व यांच्या सारखे दुसरे शब्द यांहीं करून नपुंसकलिंग रोप्यार्ह होतात; जसें—

"सन्धाविस्तारपाथोधिविधुरेप क्ष्मापतिः ।
विद्याप्रसरवृक्षाब्दः प्रज्ञोत्कर्षनभोरविः ॥"

## द्विपंक्तिरूपक.

पूर्वी चार प्रकारचीं जीं रूपकें सांगितलीं त्या प्रत्येकाचेंही द्विपंक्तिरूपक होतें.

## द्विपंक्तिभेद्य रूपक.

जसें—

'प्रतिज्ञावाहिनीपूरपरिमुक्तारिपुद्गमः' ।

हेंही रूपक वैपरीत्यानें होतें; जसें—

'द्विपित्रृक्षपरिसावित्रतिज्ञावाहिनीरयः' ।

प्रतिज्ञाचन्द्रिकापूरम्लानवैरिमुखाम्बुजः ॥

द्विषवक्त्राम्बुजम्लानि प्रतिज्ञाचन्द्रिकान्वयः ॥

शौर्यदावानलप्लुष्टद्वेषिकीर्तिलतादवः ।
द्वेषिकीर्तिलताद्रोही शौर्यदावहुताशनः ॥
धैर्यसूर्यपरिम्लानवैरिकैरवकाननः ।
वैरिकैरवकान्तारग्लानिकृद्धैर्यभास्करः ॥
शमस्रोतस्विनीपूरशान्तक्रोधहुताशनः ।
क्रोधदावानलच्छेदिशमस्रोतस्विनीरयः ॥
कलाकादम्बिनीशांतद्विपत्तेजोहुताशनः ।
द्विपत्तेजोदवच्छेदिकलाकादम्बिनीभरः ॥
विद्यास्रोतस्विनीवाहभिन्नवादीमहोरुहः ।
वादिभूरुहविद्रोहिविद्याकूलङ्कषारयः ॥

आतां द्विपंक्तिस्तोच्य रूपक सांगतों.

जसें—

कलाकमलिनीबोधशमवासरनायकः ।

हेंही वैपरीत्यानें होतें; जसें—

शमभास्करविस्मेरकलाकमलिनीवनः ।
कलाकादम्बिनीलीलानृत्यर्जुनमनःशिखी ॥
जनस्वान्तशिखिक्रीडाकलाकादम्बिनीभरः ।
उल्लासितसत्यजीमूतगीतिविष्टपचातकः ॥
लोलचातकसंप्रीतिकरसत्यपयोधरः ।
विवेकरजनीनाथसंवर्धितशमाम्बुधिः ॥
शमसागरविस्तारविवेकरजनीकरः ॥

## भेद्यरूपक सांगतों.

जसें --'कोपपावकपर्जन्यः' तोप्यरूपक सांगतों; जसें-'विवेका-म्भोजभास्करः'. आधाररूपक सांगतों; जसें-'गुणरत्नपयोराशिः'. अभेय-रूपक सांगतों; जसें- 'गुणाम्बरनिशाकरः'. नपुंसकलिंग आणि पुल्लिंग शब्द शौर्य, शम इत्यादि, स्त्रीलिंग रोप्याई होतात; जसें-

"शौर्यलक्ष्मीलताभेद्यः शमश्रीकौमुदी विधुः ।
महः शोभाङ्गिनी सूर्यो दानस्थितिसुधाम्बुधिः ॥"

स्त्रीलिंग शब्द संधा, अहंकृति इत्यादि; पुढें असलेल्या प्रपंच, विस्तार, प्रसर हे व यांच्या सारखे दुसरे शब्द यांहीं करून नपुंसकलिंग रोप्याई होतात; जसें-.

"सन्धाविस्तारपाथोधिविधुरेप क्षमापतिः ।
विद्याप्रसरवृक्षाब्दः प्रज्ञोत्कर्षनभोरविः ॥"

## द्विपंक्तिरूपक.

पूर्वी चार प्रकारचीं जीं रूपकें सांगितलीं त्या प्रत्येकानेंही द्विपंक्ति-रूपक होतें.

## द्विपंक्तिभेद्य रूपक.

जसें----

'प्रतिज्ञात्राहिनीपूरपरिप्लुतरिपुद्रुमः' ।

हेंही रूपक वैपरीत्यानें होतें; जसें-

'द्विपिवृक्षपरिप्लाविप्रतिज्ञावाहिनीरयः' ।

प्रतिज्ञाचन्द्रिकापूरम्लानवैरिमुखाम्बुजः ॥

द्विषिवक्त्राम्बुजम्लानिप्रतिज्ञाचन्द्रिकारयः ॥

विवेकाम्बुधिविक्रीडद्गुणमुक्तासमुच्चयः ।
धैर्यशैलपरिक्रीडत्कीर्तिगङ्गारयो नृपः ॥"

## आतां द्विपंक्तिमिश्ररूपक सांगतों.

जसें—

'सन्धासिन्धुयशोऽम्भोजक्रीडद्गुणसितच्छदः' ।

हेंच वैपरीत्यानें—

गुणहंसो मनोहारि सन्धासिन्धुयशोऽम्बुजः ।
शौर्यशैलमहादावदग्धवैरिमहीरुहः ।
वैरिभूरुहविद्रोहिशौर्यशैलमहानलः ।
कलावल्लीयशःपुष्पक्रीडद्गुणमधुव्रतः ।
गुणद्विरेफरोचिष्णुकलावल्लीयशःशमः ॥
शमसिन्धुयशोनीरक्रीडद्गुणसरोरुहः ।
गुणपङ्केरुहभ्राजिशमसिन्धुयशोजलः ॥
सदौचितीलताकीर्तिः पुष्पोद्यद्गुणषट्पदः ।
गुणभृङ्गभृतौचित्यवृक्षकीर्तिप्रसूनकः ॥

## आतां रूपकनिर्वाहविधि सांगतों.

जसें—

"प्रतिज्ञाचन्द्रिकानन्द्रः शोभते भूमिवल्लभः ।
यदालोकनमात्रेण म्लानं वैरिमुखाम्बुजैः ॥
मानमातङ्गविन्ध्याद्रिरेष क्ष्मापालपुङ्गवः ।
कीर्तिर्विजृम्भते यस्य नर्मदाशर्मदायिनी ॥
औचित्यद्रुमकान्तारं भूमिपालो विराजते ।
शौर्यसिंहपरिक्रीडाध्वस्तवैरिमतङ्गजः ॥

धैर्यदन्तावलक्रीडाविन्ध्यविश्वम्भराधरः।
सत्कीर्तिनर्मदापूरप्लुतक्षोणीतलो नृपः
कलाकल्लोलिनीशैलः सैष राजा विराजते ।
महोमशैपधिज्वालाजालजीर्णा द्विषत्तमाः ॥

## आतां भिन्नरूपक विधि सांगतों.

जसें—

"यद्दानकासारसमुद्भवानि भृशं यशःकैरवमण्डलानि।
गुणावलीकेसरभासुराणि श्रितान्यहो याचकचञ्चरीकैः।
छद्मापराधेनिधिसम्भवेन भवद्यशःकैरविणीधवेन।
लीलापरिस्मेरितदिङ्मुखेन म्लानानि विद्वेषिमुखाम्बुजानि॥"

बाकी राहिलेले अलंकार मीं (अमरचंद्रानें) केलेल्या अलंकारप्रबोधनामक ग्रंथावरून जाणून घेऊन त्यांचा अभ्यास करावा.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधायाः अर्थसिद्धिप्रताने चतुर्थे अलंकाराभ्यासो नाम प्रथमःस्तबकः समाप्तः ॥

---

## वर्ण्यस्तबक दुसरा.

यानंतर अर्थोत्पत्तीचे प्रकार प्रकाशित करतों.

वर्ण, आकार, क्रिया, आधार, आधेय, संबंधी, बंधु, संपर्की, द्वेषी, मित्र, पति, पत्नी, ईश, सेवक, इंद्रियानंदप्रद, भूतिप्रद, त्यांचा अपहार करणारे यांचेही अरि आणि मित्र इत्यादि वर्ण्य काव्यांत अर्थबीजक होतें.

सर्वही वस्तूंला वर सांगितलेले, वर्ण, आकार इत्यादि भाव एक दोन किंवा तीन निश्चित असतातच. वर्ण ह्मणजे शुक्ल इत्यादि प्रकारचा रंग, आकार ह्मणजे चौकोनी, वाटोळा इत्यादि प्रकारची आकृति, क्रिया ह्मणजे चलनवलनादिक, आधार ह्मणजे वृक्षादिकांचा पृथिवी इत्यादि, आधेय ह्मणजे पृथ्वी इत्यादिकांचे वृक्षादिक, संबंधी ह्मणजे पिता, पुत्र इत्यादि, बंधु ह्मणजे भ्राता इत्यादि, संपर्की ह्मणजे जवळ असलेले, द्वेषी ह्म० शत्रु, मित्र ह्मणजे सुहृत्, पति ह्म० विधिपूर्वक वरणारा, पत्नी ह्म० विधिपूर्वक वरलेली, ईश ह्म० धनी, सेवक ह्म० त्याची आराधना करणारे किंवा नोकरी करणारे, इंद्रियानंदप्रद ह्म० एकच नेत्रांनी इंद्रियांला किंवा सर्व इंद्रियांला प्रीति देणारे, भूत्यादिप्रद ह्म० लक्ष्मी, वस्त्र, स्थान, तेज इत्यादि देणारे, तदपहारी ह्म० इंद्रियानंद आणि भूति यांचा अपहार करणारे.

वर सांगितलेल्या ह्या वर्णादिकांनेही यथासंभव जे रिपु, मित्र इत्यादि, तेही जसे वर्ण, आकार, क्रिया यांच्या सादृश्यानेंच दुसऱ्या वस्तु द्वेषी आणि मित्र होतात; तसेंच आधार, आधेय, संबंधी, बंधु, संपर्की, द्वेषी, पति, पत्नी, स्वामी, सेवक, इंद्रियानंददायी, भूत्यादिदायी, इंद्रियानंदापहारी, भूत्याद्यपहारी, यांने द्वेषी आणि मित्र होतात. आधारादिकांचेही सादृश्यावरून दुसऱ्या वस्तूशीं शत्रुत्व आणि मित्रत्व कल्पना करावें. मुळांत इत्यादि शब्द आहेत त्यावरून वर्ण्य, वर्णादि, द्वेषी आणि मित्र यांचे द्वेषी व मित्र इत्यादिकांचें ग्रहण करावें.

*तसेंच वर्ण्यांचें शिशिरत्व, उष्णत्व, मधुरत्व, कटुत्व, सुगंधत्व,* सुरूपत्व, दुर्गंधत्व, कुरूपत्व, मधुरध्वनित्व, कठोरध्वनित्व, सूक्ष्मत्व, इत्यादिक व अन्यही भाव वर्ण्यवस्तूंचे ठायीं अनेक प्रकारच्या अर्थांची उत्पत्ति होण्याला बीजरूप होतात. जसें-उदाहरणार्थ-सूर्य याला वर्ण्यविषय घेतला असतां त्याचा पिंवळा रंग, आकार वाटोळा, क्रिया प्रकाशन रूप इत्यादि आकार. आकाश, आधेय, हस्तकमल इत्यादि, संबंधी-ब्रह्मा कश्यप, शनि, यमुना इत्यादि, बांधव-दुसरे आदित्य, संपर्की-रथ, मार्ग, अरुण, वालखिल्य इत्यादि, द्वेषी-राहु, शुक्र, शनि, अंधकार आणि दैत्य, मित्र-चंद्र, मंगळ आणि गुरु अथवा कमल, चक्रवाक इत्यादि, प्रभा आणि

कमलिनी यांचा सूर्य हाच पति होय, पत्नी—प्रभा, कमलिनी, रत्नादेवी इत्यादि, त्याचा ईश—आजा पितामह असल्यामुळें ब्रह्मदेव, सेवक—भानु, इंद्रियानंदप्रद—मित्र इत्यादि, शोभाप्रद—दिवस इत्यादि, इंद्रियानंतर—शत्रु इत्यादि, तेजोहर—राहु, दिवसाचा शेवट इत्यादि होते.

याप्रमाणेंच वरवर्ण्यरवें करून घेतलेला जो रवि याच्या वर्णाचे द्वेषी आणि मित्र—त्यांचप्रसारखा ज्यांचा वर्ण असेल ते त्याच्या वर्णाचे द्वेषी आणि मित्र, त्याच्यासारखा ज्यांचा आकार असेल ते त्याच्या आकारानें द्वेषी आणि मित्र, त्याचा मित्र अर्थात् कमल त्याचे द्वेषी चंद्र इत्यादि, त्याच्या वर्णाचे मित्र चक्रादि, संपर्की हंसादिक, आधार जल, आधेय—भृङ्ग इत्यादि, याप्रमाणें परस्पर एकेका वस्तूच्या यथासंभव दुसऱ्या वस्तु द्वेषी, मित्र इत्यादि पाहून घ्याव्या. तसेंच वर सांगितलेल्या रीतीनें कमलाचे मित्र व द्वेषी जे चंद्रादि त्यांनींही वर्ण, आकार क्रियादि पाहून घ्यावीं.

वर्ण्य वस्तूच्या आकारादिकांतून एक किंवा दोन तीन अथवा अधिक घेऊन बुद्धिमानानें वर्ण्य वस्तूंचे ठायीं औचित्याला अनुसरून अर्थ उत्पन्न करावा.

वर्ण्य वस्तूचे वर्ण, आकार क्रिया इत्यादिकांतून कोणता तरी एक दोन तीन चार अथवा पांच मात्र घेऊन अर्थ पूर्णतेला न्यावा.

वर्ण आकार क्रिया इत्यादिकांहीं सदृश अशा वस्तू तसल्या दुसऱ्या वस्तूंच्या ठायीं उचित असेल त्याप्रमाणें उपमारूपक इत्यादिकांहीं योजाव्या.

जसें—वर्ण्यवस्तु शुभ्र असेल तर त्याच्या ठिकाणीं शुभ्रानी मोकोनी असेल तर मोकोनी, कांपणें याच्या ठिकाणीं नर्तनादि, इत्यादि सारखे भाग उपमेनें अथवा रूपकानें किंवा दुसऱ्या कोणत्याही अलंकारानें योजावे.

वर्ण इत्यादिकांनीं उपमान केलेल्या वस्तूचे ठायीं असलेले मख्यात वर्ण इत्यादि जे मुख्य गुण ते उपमेयाचे ठायीं सादृश्यानें, श्लेषानें व औचित्यानें योजावे.

जसें–पांढऱ्याला पांढरें, चौकोन्याला चौकोनी, चलाला अचल, आधार परिवार इत्यादिकांला आधार परिवार इत्यादि औचित्यानें उपमान केले जातात. उपमान केलेल्या वस्तूंचे वर्णादि गुण सादृश्यानें अथवा श्लेषानें उपमेयाचे ठायीं आरोपित केले जातात. उपमान केलेल्या वस्तूचे वर्णादि गुण सादृश्यानें अथवा श्लेषानें उपमेयाचे ठायीं आरोपित केले जातात.

आतां प्रथम वर्णापासून त्यांतही शुक्लवर्णापासून अर्थोत्पत्तीकरतां शुक्लपदार्थाचा संग्रह सांगतों. जसें––

शुभ्र वर्णाचे पदार्थ––भारती, धर्म, शेष, शिव, वरुण, इन्दु, चंद्रप्रभ, आणि सुविध्य नांवांचे जैन, बल, नारद, ब्राह्मणांचा वर्ण आणि धर्म, पितर, कृतयुगांतला विष्णु, सत्त्वगुण, कृतयुग, शांत, हास्य, आणि वीर हे रस-तसेंच शुक्लध्यान, शुक्ललेश्या, पुण्य, सिद्धि, शिला, उशना, चंद्र, उच्चैःश्रवा, ऐरावती, चंद्र, प्रकाश, शरदृतूंतले मेघ, देवालय, राजवंगला, कैलास, मंदार, वृक्ष, हिमाचल, केळीचा गाभा, पारिजात, लोध, व कंकोल वृक्ष, कापूस, लव्हाळ्याचीं फुलें, कापूर, केळ, रुपें, यश, सर्पाची कांत, समुद्राचा फेंस, चंदन, हास्य, बर्फ, दहीं, प्रक्षण, चूर्ण, अस्थि, फटकी, स्फटिक, अभ्रक, केतकी, आणि खजूरी यांचे रज, कटाक्ष, वस्त्र, भस्म, कमलाचा देंठ, गांस, मेघ, धारा, चंद्र, किरण, चंत्ररी, हार, ऊर्णनाभितंतु, लाटा, खरदंड, हत्तीचे दांत, गुण, सेराह, शर्करा, साळीचे तांदूळ, दूध, गंगा, अमृ-

तजल, पाण्याचा प्रवाह, पारा, हंस, बगळे, चंद्रविकासि कमल, शंख, लताग्रह, पुंडरीक, कपाल, पांढरी, घागर, छत्र, सिंह, ध्वज, पांढऱ्या गुंजा, शिंपा, कवड्या, मोतीं, फुलें, नक्षत्र, दांत, घामाचे बिंदु, सूर्यकांत, चंद्रकांत, गारा, सिकताकण, दंवाचे बिंदु, मोगरीचें फूल, जुईचें फूल, कुंद, जाईचें फूल, आणि कुडयाचें फूल इत्यादि हे पदार्थ श्वेत रंगाचे असें मानलें आहे.

वर सांगितलेले भारती इत्यादि पदार्थ व दुसरेही श्वेत पदार्थ परस्पर त्यांचें औचित्य पाहून उपमान केले जातात. उपमान केलेल्या पदार्थांचे रंग इत्यादि गुण उपमेयाचे ठिकाणीं आरोपित करण्यांत येतात जसें–आपल्याला भारती (सरस्वती)चें वर्णन करावयाचें असतांना तिचें उपमान गंगा घेतली. गंगेचा रंग पांढरा आहे. तिचा परिवार–हंस, कमलें इत्यादि, आधार–शंकराचें मस्तक, तिची क्रिया –पापहारित्व आहे त्यावरून भारतीचें–'कुंदेन्दुसुन्दरद्युतिः, पद्मभिया हंसै सेविता शिवोत्तमाङ्गललिता गङ्गेव सेवकपापहारिणी जयति' असें वर्णन करावें.

आतां तारका (नक्षत्रें) हीं वर्ण्य घेतलीं त्यांचें उपमान मोतीं त्याचा आधार समुद्र, त्यावरून–'नभोऽम्भोधिमध्ये तारामुक्ता इव' असें वर्णन करतां येईल.

तसेंच वर्ण्य काश (मोहोळाचीं फुलें) त्याचें उपमान हास्य व तें हास्य प्रियसंगत होतें त्यावरून–नवहंससमागमे शरद्वध्वा हासप्रकाशा इव काशाः' असें वर्णन करतां येईल.

याप्रमाणेंच वर्ण्य हास्य घेतलें असतां त्याचें उपमान ज्योत्स्ना तिचा आधार चंद्र, त्यावरून–'शुक्लचंद्रस्य ज्योत्स्नेव हास्यश्रीः' असें वर्णन करतां येईल.

वर्ण्य यश घेतलें असतां त्याचें उपमान हास्य, हास्याचा आधार हर्ष, त्यावरून–'रिपुजयहृष्टस्य नृपखड्गस्य हास्यमिव यशः' असें वर्णन करतां येईल.

तसेंच वर्ण्य यश त्याचें उपमान कापूर त्याचा आधार समुद्गक (संपुटक अथवा हेलगार्ति) परिवार अङ्गार, त्यावरून–'त्रैलोक्योदर-समुद्गके यशःकर्पूर इव तन्मध्ये नभोऽङ्गारलेशः'

तसेंच वर्ण्य तारा त्यांचें उपमान पुष्पें त्यांचा आधार लता. त्यावरून–'तमोवल्ल्याः पुष्पाणीव तारा' असें वर्णन करतां येईल.

वर्ण्य पुष्पें त्यांचें उपमान स्वेदबिंदु ते सात्विक भाव धर्म यापासून होतात त्यावरून–'दक्षिणानिलस्य स्पर्शाद् भृङ्गस्पर्शात्' किंवा 'वसंत स्पर्शाद्वा वल्लीनां स्वेदबिंदव इव पुष्पाणि' किंवा 'परस्परसंघट्ट-घर्मादिव' अथवा 'रवितापघर्मादिव आत्मवशभृङ्गं परवल्लीगतं दृष्ट्वा कोपादिव वल्लीनां स्वेदबिन्दव इव पुष्पाणि.'

अथवा पुष्पांचें उपमान तारका, तारकांचा आधार आकाश त्यावरून–'वनाकाशे पुष्पाणि तारका इव'.

अथवा 'रवितापस्तथा शीतलवनोपान्तमाश्रितास्तारा इव पुष्पाणि' अथवा 'स्वोपस्कारकरांधकारभीत्या श्यामलवनमुपाश्रितास्तारा इव पुष्पाणि'.

वर्ण्य प्रासाद (देऊळ अथवा राजवंगला) त्याचें उपमान हिमाचल त्याचा परिवार गंगा त्यावरून–'प्रासादो हिमाचलः तत्र गंगेव पताका' असें वर्णन करतां येईल.

वर्ण्य प्रासाद त्याचें उपमान धर्म, त्यावरून–'प्रासादो धर्मो लोक-पातकवैरिणो जित्वा पताकाच्छलात् मौलेरुपरि पटीं चालयति'.

## कृष्णवर्ण शब्द.

यानंतर कृष्ण वर्णापासून अर्थोत्पत्ति होण्याकरितां कृष्ण पदार्थांचा संग्रह करतों, जसें–

कृष्णपदार्थ–केशव, बलरामाचीं वस्त्रें, चंद्राचा कलंक, राहु,

विन्ध्यपर्वत, अंजनाद्रि, सुव्रत आणि नेमिनाथ नांवाचे जैनांतले तीर्थंकर, धूमकेतु, महापद्म व अनंतनामक नाग, यम, दैत्य, सर्प, राक्षस, शनि, शिवकंठ, घन, अशनि, काली, कलि, हरि, द्वैपायन, राम, धनंजय, शूद्रांचे-वर्ण, धर्म व पितर, तमोगुण, कालि (भीष्माचार्यांची सावत्र आई 'सत्यवती'), देवी, द्रौपदी, राजपाद, विदूरज, विष, आकाश, अमावास्येची रात्र, शस्त्र, अगरुचंदन, पाप, अंधकार, रात्र, धूर, काजळ, कस्तूरी, चिखल, कृष्णपक्ष, आभाळ आलेला दिवस, शाई, मद, सुरा, समुद्र, यमुना, अंजनयुक्त अश्रु, मूग, उडीद, तीळ, मोथा, मिरीं, अरण्य, वृक्ष, गवत, ताड, तापिच्छदल, इंदीवर, वल्ली, नळि, जांभळाचें फळ, गुंजेचें मुख, कोळसे, दुष्ट मनुष्य, चर्म, महामारी, दुर्वचन, खोटें भाषण, खल, कृत्या, अपकीर्ति, मारण, ध्यान, दुर्ध्यान, कृष्णलेश्या, विपत्ति, व्यथा, कूर्म, वराह, खट्वांग, महेश, पिक, षट्पद, गोलांगुलाचें मुख (माकडाचें तोंड), हत्ती, चटक आणि मोर यांचा कंठ, कावळा, मुंगी, दुर्गापति, खण्डन, कण्डिका, मकर, कृष्णसार, भिल्ल, छाया, गोमय, स्त्रियेची-रोमावली, नेत्र, पापण्या, भोंवया, रोम आणि केश, अद्भुत आणि शृंगार हे रस, कटाक्ष आणि डोळ्यांतल्या बाहुल्या.

हे व दुसरेही कृष्ण पदार्थ परस्पर औचित्यानें उपमान केले जातात. उपमान केलेल्या पदार्थाचे वर्ण इत्यादि गुण उपमेयाचे ठायीं आरोपित करण्यांत येतात. जसें-वर्ण्य स्त्रीची वेणी तिचें उपमान कृपाण (तरवार) त्याचा आधार वीरपुरुष, त्यावरून-'मदनवीरेण भवनिष्कलीकृतपंचशरेण सौवेणीमिषात् कृपाणदण्ड इव प्रगुणीकृतः'. असें वर्णन करतां येईल.

वर्ण्य तम त्याचें उपमान धूर, त्याचा आधार अग्नि, त्यावरून-संध्यावह्निधूमैरिव तमोभिर्व्याप्ता दिशः' असें वर्णन करतां येईल.

वर्ण्य तम त्याचें उपमान कज्जल, त्याचा आधार दीप, त्याचें उपमान धूम, धूमाचा आधार अग्नि, त्यावरून 'सन्ध्यावन्हेराधारो दीपः ततः-औषधीदीपसमुद्भूतैः कज्जलैरिव तमोभिर्मलिना दिशः' अथवा 'रविवियोगार्तानां दिग्वधूनां साञ्जनाश्रुसलिलानीव तमांसि.'

तसेंच वर्ण्य इन्दुकलंक, त्याचें उपमान नीलपद्म, त्याचा आधार सरोवर, त्यावरून-नभोऽरण्ये सुधासरः तत्र लाञ्छनच्छलात् उत्तमसो नीलोत्पलम्' असें अथवा 'यामिनीकामिन्या मुखमिव चन्द्रः तल्लांछनच्छलात् उत्तमसो नीलोत्पलम्.'

अथवा लांच्छनाचें उपमान पाप, पापाची उत्पत्ति दुष्कर्मापासून, त्यावरून-रविवियोगार्तपद्मिनीनां लक्ष्मीहरणपातकादिव चंद्रस्य लांछच्छलात् मुहूर्त पातकमिव दृश्यते'.

तसेंच इन्दुकलंकाचें उपमान कस्तूरिका, तिचा आधार रुप्याचें कचोलक (पंचपाळें) त्यावरून-यामिनीकामिनी स्वमण्डनार्थं चंद्रस्य कचोलके लांच्छनव्याजात् कस्तूरिकापंकमिव प्रगुणीचकार.'

आतां इन्दुलांछनाचें विष हें उपमान घेतलें असतां त्यावरून-आस्मानं क्रूरस्वभावेन निर्विर्ण्ण भ्रातृस्वभावस्वीकरणाय लाञ्छनच्छलात् कालकूटं चंद्रमिव सेवते' अथवा 'यामिन्या स्वपतेश्चंद्रस्य चक्षुर्दोषापनयनार्थं लाञ्छनव्याजात् कज्जलांकः कृत इव.'

वर्ण्य नीलोत्पल, त्याचें उपमान (चंद्राचें) लाञ्छन त्यावरून-कामिनीचंद्रे नीलोत्पलम् लाञ्छनमिव.

वर्ण्य धम्मिल, त्याचें उपमान राहु त्यावरून-कालवशादिव गतवैरैः सुमुखीमुखपार्श्वे चंद्रभ्रमात् धम्मिलच्छलेन राहुरिव समागतः'.

वर्ण्य शिवाच्या कंठाची कांति तिचें उपमान तम, त्यावरून-त्व. हे प्रभो सर्वेषामपि सामान्यप्रभुः, ततः किमस्मद्वैरिणं चंद्रं शिरसा धत्से. इति 'विज्ञप्ये अंधकारमिव कंठध्वनिच्छलादीश्वरमाश्रितं' अथवा

'कंठकांति निजसुतललाटेन्दुमिलनाय जलधिरिव समागतः' अथवा 'कंठकान्तिच्छलात् गंगास्पर्धयेव यमुना ईश्वरं समागता' इत्यादि प्रकारें वर्णन करतां येईल.

## नीलवर्ण शब्द.

नीलवर्णापासून अर्थोत्पत्ति होण्याकरतां नील पदार्थांचा संग्रह सांगतों जसें–

नीलवर्ण–बुध, कार्कोट, मल्लि आणि पार्श्व नांवाचे जैन तीर्थंकर, बीभत्सरस, वायु, नीलिका, नीलवानर, शुक, नीलोत्पल, दूर्वा, प्रियङ्गुदल, शेवल, वंशांकुर, मरकत, इंद्रनील, सूर्याचे घोडे, कांच, मुग, नीललेश्या आणि बालतृण इत्यादि.

हे व दुसरेही नीलपदार्थ परस्पर औचित्यानें उपमान केले जातात. उपमान केलेल्या पदार्थांचे वर्ण इत्यादि गुण उपमेयाचे ठायीं आरोपित करण्यांत येतात. जसें–पार्श्व नांवांचा जैन हा वर्ण्य घेतला असतां त्यांचें उपमान नीलोत्पल, त्याचा आधार सरोवर, त्यावरून–'यस्य मनस्सरसि श्रीः पार्श्वे नीलोत्पलीभवति तस्य लक्ष्मीर्न दूरे तु'.

वर्ण्य शुकावलि तिचें उपमान इंद्रनीलमण्यांची माळ, त्यावरून–'शरदि नभोलक्ष्म्या इंद्रनीलमणिमालेव शुकावलिः.'

## रक्तवर्ण शब्द.

रक्तवर्णापासून अर्थोत्पत्ति करण्याकरितां रक्तवर्ण पदार्थांचा संग्रह सांगतों. जसें–

रक्तवर्ण–मंगळ, भीम, अश्व, शंख, तक्षक, पन्नग, पद्मप्रभा, वास्तु आणि पूज नांवाचे जिनेंद्र, बालसूर्य, त्रेतायुग, त्रेतायुगांतला विष्णु, क्षत्रियांचा वर्ण, धर्म आणि पितर, सन्ध्याकाल, उल्का, वन्हि, विद्युल्लता, ताम्रें, विद्रुम, कुंकुम, पद्मराग, सुरा, रक्तचंदन, आळता, डोळ्यांच्या कोरा, अधर,

जिव्हा, रक्त, मांस, शेंदुर, धातु, हिंगुल, मधु, रत्नें, स्फुलिंग, हस्ति, बिन्दु, नख, इंद्रगोप नांवाचे किडे, खद्योत, कोंबड्याचें डोकें, चकोर, सारस, पारावत आणि कोकिल यांच्या दृष्टि, कियाह, हंसाची चोंच आणि पाय, कीर आणि माकड यांचें मुख, कुसुंबा–किंशुक–अशोक–जास्वनी–दुपारी आणि पाडली यांचीं फुलें आणि कोमल पल्लव, डाळिंबीचें फूल, बिंबली आणि किंपाक यांचीं फळें, गुंजा, कोकनद, रौद्ररस, राग, घट, इष्टिका, ताम्बूलराग, मंजिष्ठा, वज्रक्षत, नखक्षत, तेजोलेश्यी, पद्मलेश्यी, क्रोध, क्रुद्ध झालेल्याचें शरीर, मद, वश्य आणि आकर्षण यांचें ध्यान आणि पिकलेलीं फळें.

हे व दुसरेही रक्त पदार्थ परस्पर औचित्यानें उपमान केले जातात व उपमान केलेल्या पदार्थांचे वर्ण्य इत्यादि गुण उपमेयाचे ठायीं आरोपित करतात. जसें–वर्ण्य किंशुक (पळस) त्याचें उपमान कौसुंभवस्त्र (कुसुंब्याचा रंग दिलेलें वस्त्र) त्यावरून–'वसंतप्रियसमागमे वनस्थनिरंतरस्मेरितकिंशुककुसुमभंगिमिषेण करैः कौसुम्भवासांसि परिहितानि.'

वर्ण्य कंकेली तिचें उपमान अनुराग, त्यावरून 'वसन्तानुरक्तया वनलक्ष्म्या कंकेलीच्छलेन मूर्तोऽनुराग इव प्रकटीचक्रे' अथवा 'वनप्रियाः मुखमण्डनं कुंकुमस्तबक इव कंकेलि'

वर्ण्य सन्ध्या तिचें उपमान अग्नि. त्यावरून–'प्राणनाथे अस्तंगते रवौ दिग्वधूभिरनुरागमयीभिः संध्याच्छलेन प्रगुणीकृतो वन्हिरिव' अथवा चक्रवाकहृदयेभ्यो विरहाग्निज्वालाकलाप इव सन्ध्याच्छलेन नभोऽभिव्यापाबभूव.'

वर्ण्य जपा (जास्वंदी) तिचें उपमान रत्नें, त्यावरून–'शरत्कालवनलक्ष्म्या जपाकुसुमच्छलेन रत्नानीव प्रदत्तानि.'

वर्ण्य बालार्क त्याचें उपमान कुक्कुटशिखा, त्यावरून-'प्रातः किरणावृतमूर्तिः नानावर्णघनपक्षतेरुदयगिरिकुकुटस्य शिरःस्थितो रविः शिखाशोभां लभते.'

## पीतवर्ण शब्द.

पीतवर्णापासून अर्थोत्पत्ति होण्याकरतां पीतवर्ण शब्द सांगतों. जसें-

पीत-ब्रह्मा, सूर्य, इंद्र, गरुड, शिवाची दृष्टी आणि जटा, पद्मनाभ, गुरु, विष्णूचें चक्र, वीर, रजोगुण, गिरिजा, अग्नि, इंद्राचे घोडे, द्वापरयुग, द्वापरांतला विष्णु, भयानक रस, वैश्यांचे वर्ण, धर्म आणि पितर, ऋषभ इत्यादि जैनांचे सोळा तीर्थंकर, दिवस, देवांचा पर्वत (मेरु), सोनें, कांसें, रीति, किंजल्क, वल्कल, परिव्राजकांचीं वस्त्रें, हरताल, मनशिला, हरिद्रा, गोरोचना, हीर, गंधक, दीप, चंपक, कर्णिकार, सुवर्ण, अब्ज, रंभा, केतक, शालि, हरी, रथांगनामा, वानर, सारिका आणि क्रम.

हे व दुसरेही पीतपदार्थ परस्पर औचित्यानें उपमान केले जाऊन उपमान केलेल्या पदार्थांचे वर्णादि गुण उपमेयावर आरोपित केले जातात. जसें-वर्ण्य रवि, त्याचें उपमान कोक, त्याचा आधार सरोवर, त्यावरून-नभः सरोवरे रविश्चक्रवाक इव.

वर्ण्य कोक त्याचें उपमान पराग, त्यावरून-'सरसिस्मेरसरसिजपरागस्तबका इव चक्रवाकः'

वर्ण्य पराग त्याचें उपमान कुंकुम, त्याचा आधार स्त्रीचें शरीर, त्यावरून-'काननलक्ष्म्या वसंतप्रियागमे परागप्रसरपरिष्वंगमिषेण कुंकुमलेप इव चक्रे.'

वर्ण्य रवि त्याचें उपमान गरुड, त्याची क्रिया सर्पवध, त्यावरून-तिमिरसर्पाणां गरुड इव रविः असें वर्णन करतां येतें.

## धूसरादि शब्द.

आतां धूसर इत्यादि वर्णापासून अर्थोत्पत्ति होण्याकरतां धूसरादि पदार्थांचा संग्रह सांगतों. जसें–

धूसर–रेणु, मंडूक, करभ, गृहगोधिका, गर्दभ, मूषक, दुर्गा, कावळ्याचा कंठ, कपोत, कुलक, अहि, मोराच्या पिसाऱ्याचा खालचा भाग, करुणरस, कपोललेखा, ऊर्णनाभ, शकुन, कबरी इत्यादि.

वर्ण्य मण्डूक, त्यांचें उपमान करुणरस, त्याचा आधार दुःखित झालेले प्राणी, त्यावरून–'वर्षाकालेबलमण्डूकावलिच्छलेन विरहार्तानां हृदयेभ्य उद्भ्रान्तः करुणो रस इव.'

## बहुवर्ण शब्द.

बहुवर्ण–मोराचें पिच्छ, इंद्रधनुष्य, श्रींद आणि चित्रक.
वर्ण्य इंद्रधनुष्य, त्याचें उपमान शिखीपिच्छ, त्याचा आधार गोपवर्ण त्यावरून–'कृष्णमेघस्य गोपालानां प्रपन्नस्य शिखिपिच्छाभरणमिव इन्द्रधनुः' असें वर्णन करतां येईल.

## वर्णन करण्याचा विशेष प्रकार.

उपमेयाचा उत्कर्ष परिकल्पित करण्याकारितां बुद्धिमानानें उपमानाला अनेक विशेषणें देऊन त्याचा परिष्कार करावा.
उपमेयाचा शोभातिशय प्रसिद्ध करण्याकारितां कोणत्याही युक्तीनें उपमान विशेषणांनीं अलंकृत करावें. जसें–

### श्वेतवर्ण.

" सुरनिकरकराग्रव्यग्रमन्थानशैल
क्षुभिततरलदुग्धाऽम्भोधिकल्लोलकान्तिः ।

हिमकिरणमरीचिव्यूहविभ्राजमाना
क्षितिधरपतिचूडाजाह्नवीकल्पकान्तिः ॥
तुहिनगिरितनूजानम्रभूतेशचूडा
गलितगगनगङ्गाधौतबालेन्दुगौरः ।
गिरिशमुकुटचन्द्रज्योतिरुद्योतमान-
स्फटिकशिखरचूडास्पर्धमानाङ्गकान्तिः ॥

हीं श्वेतवर्ण उपमेयाच्या शोभातिशय वर्णनाकरितां श्वेतवर्ण विशेषणांनीं विशिष्ट अशा उपमानांचीं उदाहरणें दिलीं.

## कृष्णवर्ण.

" मुकुटगलितगङ्गानीरकल्लोलमाला
स्नपितगिरिशकण्ठस्पर्धदेहयष्टिः ।
अभिनवजलवाहव्यूहधाराविशुद्धा-
ञ्जनशिखरिगरीयःशृङ्गचङ्गाङ्गलक्ष्मीः ॥
दिनपरिवृढपुत्रीगर्भनीलारविन्द
प्रसृमरमधुपालीपक्षतिप्रख्यकान्तिः ।
जलशयनशरीरस्फाररोचिः प्रपञ्च-
च्छुरित सलिलराशिभ्राजमानाङ्गयष्टिः ॥ "

वर श्वेतवर्ण सांगितला, त्याप्रमाणेंच या उदाहरणांत कृष्णवर्ण उपमेयाचा शोभातिशय वर्णन करण्याकरितां अनेक विशेषणांनी उपमान अलंकृत करून दाखविलें आहे.

### रक्तवर्ण.

" मसृणघुसृणपङ्काभ्यङ्गचञ्चच्चलाक्षी
कुचकलशपिधानोद्दामकौसुम्भकान्तिः ।
तरुणतरणिकान्तिभ्रान्तसंसर्गरङ्ग-
त्कमलदलकदम्बप्रायकायप्रभोर्मिः ॥
अभिनवरविरश्मिद्योतितप्राच्यभूभृ-
च्छिखरलसदशोकस्मेरपुष्पोपमानः ।
पतिकुपितमृगाक्षीलोचनप्रान्तरोचि-
श्छुरितकमलकर्णोत्तंससङ्काशकान्तिः ॥ "

वरच्याप्रमाणेंच या उदाहरणांत रक्तवर्ण उपमेयाची विशेष प्रकारची शोभा त्याच वर्णाच्या उपमानाला अनेक विशेषणें देऊन वर्णन करून दाखविली आहे.

### पीतवर्ण.

" मुररिपुपदनिर्यज्जान्हवीनीरपूर-
स्नपितगरुडपक्षप्रख्यसंलक्ष्यलक्ष्मीः ।
तरुणकिरणमालिस्फूर्जदंशुप्ररोहः
स्मितकनकसरोजव्यूहतुल्याङ्गकान्तिः ॥
जलधरनिकुरम्बोद्दामधारानिपात-
स्नपितकनकशैलस्पार्द्धरोचिष्णुकान्तिः ।

तरुणतरमृगाक्षीगण्डरोचिः प्रपञ्च-
च्छुरितकनककर्णोत्तंससद्वर्ण्यवर्णः ॥ ”

याप्रमाणेंच पीतवर्णे उपमेयाच्या तत्सदृश उपमानाला युक्तीनें अनेक विशेषणें देऊन उपमेयाचा शोभातिशय वर्णन करून दाखविला आहे. याप्रमाणेंच दुसरेंही जाणावें.

सदृश सद्वस्तूनें उपमित करावें जसें—

“ अमरनिकरयाञ्चाविस्फुरत्कामधेनु-
स्तनगलितपयोवद्भारती यस्य रेजे ।
हिमकिरणमयूखप्रान्तभिन्नेन्दुकान्त
प्रसरदमृततुल्या यस्य वाचो विभान्ति ॥
दनुतनुजविपक्षक्षुब्धदुग्धाब्धिगर्भोल्ल-
सदमृतसमानारेजिरे यस्य वाचः ।
मदनमथनचूडाचन्द्ररोचिष्णुगङ्गा
लहरिभरसमाना शोभते यस्य वाणी ॥ ”

याप्रमाणेंच दुसरेंही जाणावें.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामञ्जर्यभिधाया अर्थसिद्धिप्रताने चतुर्थे द्वितीयः वर्ण्यस्तबकः समाप्तः ॥ २ ॥

## आकारस्तबकः ॥ २ ॥

आतां आकारापासून अर्थोत्पत्ति सांगतों; त्यांतही प्रथम चतुरस्र (चौकोनी) आकारापासून अर्थोत्पत्ति सांगण्याकरितां ज्यांचा आकार चतुरस्र आहे अशा वस्तूंच्या नांवांचा संग्रह करतों.

### चतुरस्र आकार शब्द.

जसें—चतुरस्र—व्यजन, कुम्भिका, पताकिका, चातुरी, मञ्चिका (चौरंग), सिंहासन आणि पार्थिव मण्डल.

हे व दुसरेही चतुरस्र पदार्थ परस्परांच्या औचित्यावरून उपमान केले जाऊन उपमान केलेल्या पदार्थांचे वर्णादि गुण उपमेयाचे ठायीं आरोपित केले जातात. जसें—वर्ण्य पार्थिवमण्डल त्याचें उपमान सिंहासन त्याचें आधेय राजा, त्यावरून—'सर्वकार्यकरणक्षमस्य मंत्राधिराजस्य सिंहासनमिव पार्थिवमण्डलं.' असें वर्णन करतां येईल.

### लम्ब चतुरस्र.

आतां लम्ब चतुरस्र पदार्थवाचक शब्दाहून अर्थनिष्पत्ति होण्याकरतां तशा प्रकारच्या शब्दांचा संग्रह करितों. जसें

प्रलम्ब चतुरस्र—खट्वा, स्थंडिल, तूलिका, कपाट, पट्टिका, पेटा, पट्ट, फालक, पुस्तक, इष्टका, तिलक, केतू, पट, पसरलेला हात, प्रशस्ति, पट्टिका, शय्या, पट्ट, शकट, मंचक, गवाक्ष, सारफलक, कटद्वार, कट, द्वारपट इत्यादि.

हे व दुसरेही याच्यासारखे शब्द वर सांगितल्याप्रमाणें उपमान करून उपमानाचे गुण उपमेयावर आरोपित केले जातात. जसें—वर्ण्य पुस्तक, त्याचें उपमान मंजूषा (पेटी) तीही रत्नांचें स्थान, त्यावरून—'धनकाव्यरत्नामञ्जूषेव पुस्तिका' असें वर्णन करतां येईल.

वर्ण्य तिलक त्याचें उपमान तूलिका, त्यावरून- ' मदननृपतेर्वेला-शरीरसौधोपरि क्रीडार्थं चतुरस्रमुक्तातिलकच्छलेन विशदप्रभाच्छलोत्तरच्छदानूलिकेव प्रगुणीकृता.'

वर्ण्य तूलिका, तिचें उपमान चतुरस्रतिलक, त्यावरून-गृहलक्ष्म्याः चन्दनं तिलकमिव तूलिका.

वर्ण्य ललाटफलक, त्याचें उपमान प्रशस्तिपट्टिका, त्यावरून-'कंदर्पदेवतायतने बालाशरीरे कस्तूरिकापत्रवल्लीमिषादक्षरमालिकाप्रशस्तिपट्टिकेव ललाटफलकम्' असें वर्णन करावें.

## वृत्त (वाटोळें) पदार्थसंग्रह.

आतां वृत्तपदार्थसंग्रह सांगतों जसें.

संपूर्णगर्भवृत्तें—मुख, पद्म, इन्दु, दर्पण, कपोल, कुंडलें, ताल, सूर्य, भाजन, नग, आब्दिक, झल्लरी, कमठ, पुंड्र, लतागृह , दल, स्फुर, छत्र, व्यजन, चाळणी, मृदंग, पुट, पूणक, घरट्ट, मंडक, कन्दु, आलवाल, सरोवर, पृथ्वी, द्वीप, श्राव, कंसाल, करिश्रवण, कौशिक, कुलालचक्र, रथचक्र, कृष्णाचें चक्र, सहाण, यंत्रक, कुलाल, वेलाज्य, कैवर्तजाल, आवर्त, आरघट्टक.

हे व दुसरे वर्तुलपदार्थवाचक शब्द परस्पर औचित्यावरून उपमान केले जाऊन उपमानाचे गुण उपमेयाचे ठिकाणीं आरोपित केले जातात. जसें—वर्ण्य सूर्य त्याचें उपमान आरसा, तो स्त्रीजवळ असतो, त्यावरून-'पूर्वदिङ्नार्या आदर्श इव प्राभातिको रविः' अथवा 'रवीचें उपमान पुंड्र (कुंकवाचा टिळा) तोही स्त्रीच्या मुखावर असतो' त्यावरून 'पूर्वदिगङ्गनामुखे पद्मरागपुंड्रमिव रविः' 'असें वर्णन करतां येईल.

वर्ण्य चंद्र, त्याचें उपमान छत्र, तेंही राजाला असतें, त्यावरून 'मदनभूपतेः छत्रमिव चंद्रः' अथवा चंद्राचें उपमान स्फुरा (ढाल) तीही उत्तम

योद्धाजवळ असते, त्यावरून 'मदनसुभटस्य स्फुरामण्डलमिव चंद्रः' असें वर्णन करावें.

## गंभीरमध्यवृत्त शब्द.

गंभीरमध्यवृत्तें—नाभि, स्थालि, गुहा, नद, कुण्ड, वापि, श्रुति (कान), कूप, मुख, गर्भक, घोलक, कमण्डलु, घटग्रीवा, चक्रनाभि, उलूखल, कटाह, माणिक, कुंडी, कम्बू, कुतप, पंकज, चषक, कुम्भ, भृङ्गार, श्रीभाजनाप्यमण्डल, हारका, सैनिका, पङ्कि, करंडी, धुमारती, कपाल, खर्पर, तुम्बा, समुद्र, करका, दृति, घंटा, शिरस्क आणि धत्तूर-सुमन, भेरी, काहल, नाल, प्रणाल, नलिका, शरधि, भमनी, घटी, गर्तापिधान, चंगेरि, कुम्पिका, लीकनालि, तिल आणि ऊस गाळण्याचें यंत्र (घाणा), पालक आणि द्यूतगर्तिका.

हे व दुसरेही धरच्याप्रमाणें उपमान होऊन आपले गुण उपमेयावर आरोपित करतात. जसें-वर्ण्य नाभि, तिचें उपमान कूप, त्यावरून- 'स्तनारघट्टोपरि लुलितरोमालिमालालावण्यजलपूर्णः भृङ्गारवनसेचनाय मदनारामिकेण नाभिरूपः कूप इवं प्रगुणीकृतः'

वर्ण्य पद्में त्यांचें उपमान चषकें, त्यावरून—जलदेवता मधुपूर्णानि चषकानीव पद्मानि.

## पिण्डीकृताकृतिवृत्त (गोल) शब्द.

पिण्डीकृताकृतीवृत्तें-गोल, स्तवक, कन्दुक, कन्द, इभकुम्भ, धम्मिल्ल, नितंब, स्तन, मौलि, दूष्य, घंटिका, मुष्टि, अंस, करोटि, ककुत, अंडक, राङ्कु, प्रक्षण, पिंड, कपिशीर्ष, घट, फल, गुल्म, फाल, त्रय, सार, रथाङ्ग, हंस, उ्याह्रक,

मोदक, कलश, तुंबा, कमंडलू, समुद्क, नारिंग, चूत, करुण, बिल्व, जम्बीर, दाडिम, बीजपूरी, नारिकेली इत्यादि वृक्षांचीं फळें.

हे व दुसरेही शब्द औचित्यानें उपमानोपमेय करून उपमानाचे धर्म उपमेयावर आरोपित केले जातात. जसें वर्ण्य स्तन, त्यांचें उपमान कुंभ, त्यांवरून 'शृंगाररसपूर्णौ तटस्थनिष्पंदलेखाकृतिरोमावलिरम्यौ मुखस्थितचूचुकच्छलेन इंद्रनीलपिधानौ नार्याः कुंभाविव कुचौ' याप्रमाणें वर्णन करतां येईल.

वर्ण्य वप्र (तटबंध अथवा गांवकुसूं) त्याचें उपमान वलय (कांकण अथवा कडें) त्याचा आधार बाहु, त्यावरून, 'वसुधावध्वाः अंतरोलसित-नृपसोधबाहुभासितं वलयमिव वप्रः'.

'नार्याः शृंगारवल्ल्याः चूचुकच्छलेनिलीनभृङ्गौ कुसुमस्तबकाविव कुचौ' अथवा 'रतिप्रीतिभ्यां कामदेवस्य त्रिभुवनराज्याभिषेकाय चूचुकच्छलस्थिताश्वत्थपल्लवौ कनककुंभाविव कुचौ'.

वर्ण्य चंद्र, त्याचें उपमान हंस, त्यावरून-'नभःकासारे ज्योत्स्नाजलसंभृते लांछनच्छलेन कलितशैवलवल्लरीपल्लवो हंस इव चंद्रः.'

## गर्भप्रकाशवृत्त शब्द.

गर्भप्रकाशवृत्तें—यष्टि, मुकुट, कंठिका, ताडपत्र, कटक, अंगद, कंकण, ऊर्मिका, हस्तसूत्र, नूपुर, दृग्रक्षा (चष्मा), रक्षारथकंडक, पुष्पमाला, मेखला, हार, रुंडमाला, कपर्दक, कमरेचा सूत्रगुण, मौंजी, जपमाला, घरघरमालिका, परिवेष, कुंडलनाभ, तटबंदीच्या भोंवतीचा खंदक, कर्णपाश, बाहुपाश, पाली, आलवालि, वागुरा, पटकंड, आकृष्टचाप, कपाल, व्योममंडल, दिव्यार्थमंडल, श्रोणी, कुंडलीभूतकुंडली, पर्यंकिका, योगपट्ट, वल्गा, उपवीत आणि रश्मि.

हे व दुसरेही शब्द पूर्वी सांगितल्याप्रमाणें होतात, 'जसें-वर्ण्य वप्र, त्याचें उपमान कपर्द, त्याचा आधार शिव, त्यावरून 'भुवः शिवमूर्तेः कपिशीर्षमुण्डमालान्वितः कपर्द इव वप्रः' अथवा वर्ण्य वप्र, त्याचें उपमान वलय, त्याचा आधार राहु, त्यावरून-वसुधावध्वा अन्तरोल्लसितनृपसौधबाहुभासितं वलयमिव वप्रः' असें वर्णन करावें.

वर्ण्य कर्णपाश, त्याचें उपमान ओढलेलें धनुष्य, त्यावरून-'मदनयौवनाभ्यां जननयनमनोमृगवेधाय सनिहितकटाक्षबाणैः कर्णद्वयमिषेण धनुषी इव कुंडलिते.

## सूक्ष्मश्वेतवृत्तशब्द.

सूक्ष्मश्वेतवृत्तें--मोतीं, आमलक, तारका, दाडिमी फळांतलीं बीजें, दंत, बिन्दु, वराटक, करट, अक्षि, पयोबिंदु, बुद्बुदबिंदु, स्वेदबिंदु, प्रसून, पिटक, पीलुफल, जातीफल आणि कण.

हे व दुसरेही पूर्वी सांगितल्याप्रमाणें होतात. जसें-वर्ण्य तारा, त्याचें उपमान मुक्ता, त्या तर समुद्रांत शिंपीपासून उत्पन्न होतात, त्यावरून-ज्योत्स्नाम्भःसंभृतनभो ऽम्भोधौ लांछनच्छलस्फुटितमुखचंद्रशुक्तिकुहरनिःसृताः मुक्ता इव तारा' अथवा तारांचें उपमान जलबिंदु ते जलाशयादिकांचे ठायीं असण्याचा संभव आहे, त्यावरून-'अनवरतभ्रांतिभ्रांतस्य रवेः पश्चिमाचलशिखरात् प्रदत्तझंपावशेन तोयनिधेरुच्छलिता नभसि जलबिंदव इव ताराः' याप्रमाणें वर्णन करतां येईल.

## सूक्ष्मरक्तवृत्तशब्द.

सूक्ष्मरक्तवृत्तें-नखरत्न, इभबिंदु, गुंजा, इंद्रगोप, खद्योत, स्फुलिंग, रागावलेल्याचे डोळे, पुग, शोणाश्म, बंधूक, बदरी आणि वट यांचीं फळें.

हे व दुसरेही पूर्वी सांगितल्याप्रमाणें होतात. जसें-वर्ण्य मणि, त्यांचें उपमान रत्नें, त्यावरून-'जलधरैः जलधेः पीनस्फुलिंगा इव मणयः'

वर्ण्य इंद्रगोप, त्याचें उपमान, रत्नें, त्यावरून जलधरैः जलधेः पीतसरलजलैर्गलैः समं वृष्टै रत्नैरिव इंद्रगोपैर्भूर्व्याप्ता.'

वर्ण्य खद्योत, त्याचें उपमान वन्हिस्फुलिंग, त्यावरून—'घनघटासंघट्टशतखंडितविद्युदभैः खंडलया इव खद्योताः'.

वर्ण्य बंधुजीव पुष्पें, त्याचें उपमान शोणरत्नें, त्यावरून—'वनलक्ष्म्याः शरत्कालेन कृतानि माणिक्याभरणानीव बंधुजीवकुसुमानि,' इत्यादि प्रकारें वर्णन करतां येईल.

## सूक्ष्मश्यामवृत्तशब्द.

सूक्ष्मश्यामवृत्तें—जम्बू, भृङ्ग, कनीनिका, साञ्जनचुचुक, इंद्रनील, गुंजकुसुम, अतसीकुसुम.

हे व दुसरेही पूर्वी सांगितल्याप्रमाणें होतात. जसें वर्ण्य जम्बूफलें, त्यांचें उपमान साञ्जनाश्रुबिंदु ते दुःखानें खीच्या डोळ्यांतून निघतात, त्यावरून—'परवल्लीः स्पृशन्तं मारुतकामुकं दृष्ट्वा जम्बूलतया साञ्जनाश्रूणीव मुक्तानि जम्बूफलानि.'

वर्ण्य भ्रमरी, तिचें उपमान कनीनिका ती नेत्रांचे ठायीं होते, यावरून—'वसन्तनायकं पश्यन्त्या माधवीलतया विस्मेरकुसुमनेत्रान्तरभ्रमरीकनीनिकेव निश्चला.'

वर्ण्य चूचुक, त्याचें उपमान भृङ्ग, तेही कमलाश्रित असतात, त्यावरून—'रतिप्रीतिक्रीडाकमलयोः कुचयोः कृतास्पदौ भृङ्गाविव चूचुकौ' इत्यादि प्रकारें वर्णन करतां येईल.

## त्रिकोणपदार्थवाचक शब्द.

त्रिकोण—दम्भोलि, शूल, शिवाची दृष्टि, हल, संध्यक्षर, आद्यशृंगार, कामाक्षि, वन्हिमंडल, करपत्र, निरंग, अद्रितल, श्रोणिस्थ पाणि, क्षुरप्र, शृंग, गोक्षुर, रोहिणीशकट.

हे व दुसरेही पूर्वी सांगितल्याप्रमाणें होतात. जसें—वर्ण्य त्रिकोणतिलक, त्याचें उपमान रोहिणी, त्यावरून 'नायिकामुखे त्रिकोणमुक्तातिलकच्छलेन निजपतिभ्रमेण रोहिणीव समागता' अथवा 'स्मरभटेन शिवपराभवात् अनादृतपुष्पबाणेन बालाया भ्रूधनुः सज्जीकृत्य त्रिकोणातिलकच्छलेन क्षुरप्रायुधमिव प्रगुणीकृतम्' अथवा 'निरंतरं जनमनोवेधकारी शरपरंपराक्षेपश्रमार्तेरपनयनायान्तरान्तरा नीरपानमिव कर्तुं नायिकात्रिकोणमुक्तातिलकच्छलात् मदनेन कान्ति जलपूर्णं करपत्रमिव सीमंतदण्डे लम्बितम्.'

## दीर्घपदार्थवाचकशब्द.

दीर्घ—वेणी, सीमंत, नासिका, बाहु, अंगुली, रोमावली, पृष्ठवंश, ऊरू, जंघा, अंत्रनलिका, शिरा, मौर्वी, धनुष्य, शर, प्रास, कृपाण, लकुट, अर्गला, आपादमुशल, अरित्र, यष्टि, मंथानक, ध्वज, वंशधूप, तुला, पट्ट, तालद्रुम, स्तंभ, मेढि, स्तूप, कूप, यज्ञस्तंभ, इंद्रध्वज, अर्हतुरोध्वज, स्वर्दंड, छत्रदंड, ऊर्मि, निर्मोक, अध्वा, अहि, निम्नगा, मृणाल, हार, शेष, स्रक्, जटा, वल्ली, द्रुम, इक्षु, कुशि, राजनक, बाहुयुग, नेत्र, कशा, झष, हस्तिहस्त, हस्तिरद, पुच्छ, नाडी, शृङ्खला, कीलक, दाम, शैलूक, शूल, करभ, नकुल, जलूका, वास, कुष्माण्ड, मृदङ्ग, वायुमण्डल, वर्तन, लेखनी, काष्ठकरण, नखभेदनी, केतकीदल आणि मंजरी, नाराज, अर्क आणि इंदु यांचे किरण.

हे व दुसरेही पूर्वी सांगितल्याप्रमाणें होतात. जसें—वर्ण्य वेणी, तिचें उपमान सर्प तोही सुधाकुंडांत होतो. त्यावरून—त्रीनेत्रानलदग्धकुसुमायुधसंजीवनवाक्सुधाकुंडस्य वदनस्य रक्षाभुजङ्ग इव वेणीदण्डः,

अथवा 'यौवनयज्वना सुघनिहृदयकुंडे सदादीपितस्य मदनानलस्य निर्गता धूमोर्मिरिव वेणीवल्लरी.

वर्ण्य रोमावली, तिचें उपमान मृणाल त्यावरून, शिवममरदग्धधनुषा स्मरस्य कृतेः यौवनेन, बाला रोमावलीव्याजात् सज्जीकृतो मृणालधनुर्दण्डः.

वर्ण्य कृपाणलेखा तिचें उपमान यमुना. त्यावरून,-त्वदभिहतरणसंमुखनृपतिनिकरैर्निरंतरं बिध्यमानो मम पिता रविर्विधुरत्वं गतः सत कियतमपिकालं विलम्बस्वेति विज्ञापनायेव कृपाणच्छलात् यमुना नृपहस्तं गता. इत्यादि प्रकारें वर्णन करतां येईल.

## वक्रपदार्थवाचकशब्दः

वक्र—अलक, भाल, भ्रूनखांक, अंघ्रि, ललाटिका, कटाक्ष, इंद्रधनु, विद्युत्, अर्धचंद्र, हल, अंकुश, कुंचि, मित्रांगुलि, तल्प, दात्र, कंदुक, दण्डक, नडागगालि, कुद्दाल, तोरण, सुखासन, गोपाभसी, रथ, वंश, शाकच्छदक, खेटक, चंदन, माला, बालेन्दु, किंशुक, इभांगुलि आणि रद, श्वपुच्छ, अश्वमुख, शृंग, चंचू, वृश्चिककंटक, करिदंष्ट्रा, मयूरग्रीवा, सिंह आणि कुक्कट-यांचें नख, केसर,-चंद्रक, लग्न, कंकण; फणभृत्फणा, पुरोधःकर,-कौपीन, केकी आणि कुक्कुट यांची मंजरी.

हे व दुसरेही शब्द पूर्वी सांगितल्याप्रमाणें होतात. जसें,—वर्ण्य बालेंदु त्याचें उपमान दात्र (खुरपें), दात्रानें कापण्याची क्रिया केली जाते, त्यावरून–'मानिनीमनोभुमिप्ररूढदृढमूलमानलतावितानलवनाय मनोभुवा प्रगुणीकृतं लवित्रमिव बालशशी'.

वर्ण्य किंशुक, त्याचें उपमान कर्त्तरी, त्या व्याधाजवळ असतात, त्यावरून–मदनव्याधस्य प्रतिकामिनीजनमनोमृगवधादिव रुधिरार्द्राः कर्त्तर्य इव किंशुकाः.

वर्ण्य नखांक, त्याचें उपमान किंशुक पुष्पें, त्यांवरून- 'कुसुमास्त्रस्य कामिनीवक्षस्पर्धिचंद्रबाणाक्रांतिकिंशुककुसुमश्रेणीव पतितानि नखक्षतानि.'

वर्ण्य भुंवया, त्याचें उपमान, मित्रांगुलि, त्यावरून—'बालाया, कामयौवनाभ्यां परस्परमैत्र्याय वक्रीकृतौ मित्र्यांगुल्याविव भ्रुवौ,' इत्यादि प्रकारें वर्णन करतां येईल.

## उच्चपदार्थवर्णन.

उंच—भद्रासन, वप्र, प्रासाद, अट्टालक, आलय, सत्पुरुषांचे मनोरथ, हस्ती, हस्तिशाला, शिलोच्चय.

हे व दुसरेही पूर्वी सांगितल्याप्रमाणें उपमान उपमेय होऊन उपमानाचे गुण उपमेयावर आरोपित केले जातात. जसें—वर्ण्य प्रासाद, त्याचें उपमान हिमालय, त्यावरून— 'प्रासादे हिमाद्रौ गंगेव पताका.'

वर्ण्य भद्रासन, त्याचें उपमान उदयाद्रि, त्यावरून- 'भद्रासनोदयाद्रौ राजा रविरिव शोभते', इत्यादि प्रकारें वर्णन करतां येईल.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधायाश्चतुर्थे अर्थसिद्धिप्रताने आकारस्तवको नाम तृतीयः स्तबकः समाप्तः ॥ ३ ॥

तिचें कारण पूर्वजक्रम, त्यावरून–अस्मत्पूर्वजः कृपाणः वैरिहृदयेषु प्रविष्ट इति कृपाणोद्भव नृपप्रतापोऽपि विग्रहानलच्छलेन वैरिस्त्रीहृदयेषु प्रविष्टः'.

वर्ण्य वैऱ्यांच्या स्तनांचा पांढरेपणा, त्यावर आरोपित केलें राजांचें यश, वैरिस्त्रियांच्या कुचांचा आश्रय करणें ही त्यांची क्रिया, तिचें कारण पूर्वजक्रम, त्यावरून,–मत्पूर्वज. कृपाणो रिपुकुंभिकुंभेषु विललास इति कृपाणोद्भव नृपयशोऽपि कुंभिकुंभसोदरेषु वरस्त्रीकुचेषु पाण्डिमच्छलेन विललास. याप्रमाणे वर्णन करतां येईल.

## कारणकल्पनं.

आरोप्य आणि वर्ण्य वस्तूंच्या क्रियांचे ठायीं सदृश क्रिया कल्पून त्या आरोपित क्रियाचें उत्पत्तिकारण कल्पना करावें.

वर्ण्य वस्तूच्या कंपन (कांपणें) इत्यादि क्रियांचे ठायी नर्तन इत्यादि क्रिया व भ्रमराचे शब्द इत्यादिकाचे ठायी जप, स्तुति करणें, आरडणें, आशीर्वाद देणें इत्यादि क्रिया आरोपित कराव्या. नतर आरोपित केलेल्या ज्या नर्तनादि क्रिया हर्षादिक व जप करणें इत्यादिकांची कल्याणप्राप्ति इत्यादि कारणें कल्पावीं.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधाया अर्थसिद्धिप्रताने चतुर्थे क्रियास्तवको नाम चतुर्थस्तवकः समाप्तः ॥ ४ ॥

## प्रकीर्णस्तबक ॥ ५ ॥

आतां आधार, परिवार इत्यादिकांपासून अर्थोत्पत्ति कशी होते तें सांगतों. जसें—

वन, गिरि, जल, सूर्य, वायु, शीत, अग्नि, लोह, प्रहरण, पर, घट्टाभ्येत, जंतूपकार, सरिदधिगम, मौन, ध्यान, निश्चलत्व, मंत्र, अनशन, अखिलभोग, अयाचित, क्षान्ति आणि तप यांहीं अर्थोत्पत्ति होते.

जी वस्तु वर्ण्य असेल तिणें निर्जित अशा सदृश वस्तूंचा वर सांगितलेल्या मनादि वस्तूंहीं अर्थ समर्थन करावा, जसें:—

'स्त्रीनेत्रजिता मृगा वनं गताः, मध्यजितः सिंहो गिरिगह्वरे प्रविष्टः, मुखजितं कमलं जलदुर्गमगात्, स्थैर्यजिता गिरयो भास्वत्तापवातशीतामिमुखं दुःखानि सहन्ते, भ्रमरः संवर्ह्म नितिक्षते, अभ्येतहसादीनां शरीरखण्डैरप्युपकारं कुरुते, गतिजिता हंसाः शरदधिगमं कुर्वते, दम्भजितो वक सरित्तटे मौनी ध्यानं कुरुते, तुङ्गस्तजितो मेरुलोका ऽदृदये स्थाने निश्चलीबभूव, मुखजितं कमलं भ्रमरा स्वैर्मन्त्रान् जपंति, नखजितानि रत्नानि गिरौ निराहाराणि तस्थुः, अधरजितानि प्रवालानि जलमध्ये जलाहारतया वर्तन्ते, अङ्गसौकुमार्यजितं शिरीषकुसुमं वने ऽयाचितवृत्तिं कुरुते, मुखजितं कमलं भ्रमराङ्घ्रिघातैरपि क्षमां कुरुते.

### लज्जादि निमित्तें.

वर्ण्य पदार्थानें जित पदार्थांचा लज्जा इत्यादि उपायांनीं अर्थ कसा समर्थन करावा तें सांगतों.

लज्जा, कोप, तप, नाश, सेवा, आक्रंद, आस्यकृष्णता, रागानें पांडुरता, शरण, विप, झंपा इत्यादिकांचें योजन.

वर्ण्य वस्तूनें जिंकलेल्या वस्तूचे पराभवापासून उत्पन्न होणारें मुळांत

सांगितलेले लज्जा इत्यादि भाव यथोचित योजावे. जसें-मुखजितपद्मं लज्जयेव वनं गतम्, कोपनतमिव जलाशयं ययौ, नद्यामाकण्ठमग्नं जलाहारतया तपः तनुते अथवा जलदुर्गनष्टं शंभोः-अम्भोमूर्तेर्वा सेवां करोति, भ्रमरा रवैः आक्रन्दं कुरुते, नीलालिभिः कोकनदमनुरक्ततां धत्ते, नेत्रजितं कैरवं दुःखात् पांडुरतां गतम्, भृङ्गभोगिमिषात् उदरे शस्त्रीं क्षिपति, जलान्तः झंपां ददौ अथवा भृङ्गमिषात् वा विषं भक्षयति.

याप्रमाणें जो लाल रंगाचा वर्ण्य पदार्थ असेल, तो त्याच्या सारख्या दुसऱ्या वस्तूनें जिंकला म्हणून लज्जाकोप इत्यादिकानें रक्त (अनुरक्त) झाला असें अथवा दुसऱ्या कोणत्याही युक्तीनें अनुरागयुक्त झाला असें वर्णन करावें. तसेंच जो पांढरा पदार्थ असेल. तो त्याच्या सारख्या दुसऱ्या वस्तूनें जिंकला म्हणून त्या दुःखानेंच कीं काय पांढरा झाला व जो काळा पदार्थ असेल तो पूर्वोक्त दुःखानेंच कीं काय काळा पडला असें वर्णन करावें.

## वृक्ष इत्यादिकांच्या अंगापासून झालेल्या वस्तूंचें वनादिकांनीं सत्पदादिकाचें वर्णन करावें.

कांहीं वस्तू वृक्षांच्या अवयवादिकांच्या असतात, कांहीं मृत्तिकामय असतात, कांहीं धातुमय असतात, कांहीं पाषाणमय असतात, कांहीं चर्ममय असतात व कांहीं कार्पासमय असतात. इत्यादि प्रकारच्या वस्तूंचे वनवास इत्यादि तपाचरणानें-शुभस्थानाचा आश्रय, शुभ आकार, शुभक्रिया, शुभपरिवार इत्यादिकांच्या प्राप्तीची संभावना करावी.

जी वस्तु वृक्षांगादिमय असेल तिचें हें पुढील भावविभावन करावें.

जे पूर्वी वृक्षाच्या जन्मांत सूर्याचा ताप, शीत, वारा इत्यादि सहन करून कष्ट भोगले, अथवा चिर व्रतादिकांनीं जे तप आचरण केलें, तें-मुख्या,

१ यासर्व उदाहरणांतील अरण्यांत जाणें, जलाशयांत जाऊन तप करणें, सेवा करणें, आक्रंद करणें, अनुरक्तता धारण करणें, पांडुरता धारण करणें, शस्त्र पोटांत खुपसणें, जलांत झंपा (उडी) टाकणें अथवा विष खाणें या सर्व क्रिया कर्त्या पद्म इत्यादि होत. या सूत्रांत जे लज्जादि भाव वर्णन केले आहेत त्यावरून येणें प्रमाणें क्रिया त्यांनीं केल्या असें यांत वर्णन करून दाखविलें आहे

साली, पानें, फुलें, फळें आणि छाया इत्यादिकांनीं, सूर्याच्या उन्हानें तापलेले, रोगानें आर्त झालेले, भोगार्थी, मंगलाची इच्छा करणारे, असे जे मनुष्य, भ्रमर, पक्षी आणि चतुष्पाद (गाई, बैल इत्यादि) त्यांच्यावर उपकार केले त्याच्या योगानें वृक्षांगमय वस्तूंला शुभस्थानादिकांची प्राप्ति झाली असें वर्णन करावें.

मृन्मय वस्तूचे ठायीं पुढें लिहिलेले भाव आरोपित करावे-जें पूर्वी-कुदळीचा आघात, पायांचा प्रहार, यंत्रबंध व यंत्रप्रवेश, चाकावर बसणें, चाकाचें भ्रमण, दगडानें ठोकून घेणें, थोपटणें, हात याचा प्रहार, सूर्याचा ताप, शोष, अग्नींत प्रवेश करणें, परीक्षेकरतां डोक्यावर मारून घेणें इत्यादिकांनीं जे कष्ट अनुभवले, व जे लोकांची भूक आणि तहान यांला आधारभूत जो आहार अर्थात् अन्न आणि जल त्यांचें आधारत्व पत्करून जो लोकोपकार केला, त्या पुण्यानें मृन्मय वस्तुला भव्य आधार मिळाला, अशा प्रकारचा त्यांच्यावर आरोप करावा.

धातुमय वस्तूचे ठायीं पुढें लिहिलेले भाव भावना करावे-जे पूर्वी अग्निप्रवेश, हातांचा आघात, घांसून घेणें, दुसऱ्या यंत्रानें ओढून घेणें, ताडण, छेदन व सहन करणें, घणांचे घाय व ठोके वगैरेचे आघात सहन करणें इत्यादि प्रकारच्या कष्टांचा जो अनुभव केला, व जे देवादिकांचा अलंकार होऊन व स्त्रियेच्या भूषणत्वाचा स्वीकार करून तसेंच-लोकांला पुष्टिकारक जें भोजन, उदक इत्यादि त्यांचें आधारत्व स्वीकार करून आणि देव, देवी इत्यादिकांच्या यंत्राला आधारभूत होऊन जो लोकांवर उपकार केला, त्या पुण्यानें धातुमयादि वस्तूंला शुभस्थानादिकांची प्राप्ति झाली अशी संभावना करावी.

पाषाणमय वस्तूच्या ठायीं पुढें लिहिलेले हे भाव भावना करावेत. जे पूर्वी सुरंगानें फोडून घेणें, घणांचे प्रहार सहन करणें, टांकी लावून घेणें, इत्यादि प्रकारच्या कष्टांचा अनुभव केला, व जें धर्मस्थान तसेंच देवतादिकांच्या मूर्ति इत्यादिकांविषयीं उपयोगी पडून परोपकार केला. त्या सुकृतानें पाषाणमय वस्तूंला शुभस्थानादिकांची प्राप्ति झाली अशी संभावना करावी.

चर्ममय वस्तूचे ठायीं हे पुढें लिहिलेले भाव आरोपित करावे—जें पूर्वी कातरीनें कापून घेतलें, खारांत पाडून घेतलें, विकून घेतलें, चांभाराच्या पायानें तुडवून घेतलें, त्याच्या आरीनें कापून घेतलें, सुईनें भोकें पाडून घेतलीं, दोऱ्यानें शिवून घेतलें व नेहमीं लोकांच्या अंगाचा प्रहार सहन करून घेतला इत्यादि जे कष्ट अनुभवले, व जें पादत्राणांच्या रूपानें लोकांच्या पायानें रक्षण केलें, ब्राह्मणादिकांला उपयोगी अशी जी करपत्रिकादिकांनें ( पोथी, घालून हातांत धरण्याचें पुटिपत्र हें कृष्णाजिनाचें असतें.) रूप धारण करून व पुस्तकादिकाला वेष्टनानें रूप धारण करून वगैरे प्रकारांनीं जो परोपकार केला, त्या पुण्यानें चर्ममय वस्तूला शुभस्थानादिकांची प्राप्ति झाली असें वर्णन करावें.

कापसाच्या सुताच्या वस्तूच्या ठायीं हे पुढें लिहिलेले भाव भावना करावे—जे पूर्वी शीत वात इत्यादिक अनुभवून अयाचित व्रत धारण करून केवळ उदकप्राशनावर राहून जिनगराकडून—नखानें तोडून घेणें, विकून घेणें, मागावर टाकून घेणें, लोखंड व दगड यांनीं घांसून घेणें, तराजूंत बसणें, आंतला सार आकर्षण करून घेणें, पिंजून घेणें, पिळून घेणे, चक्रावर चढणें, कुकड्या भोंवतीं फिरणें, आकर्षण करून घेणें, कोष्ट्याच्या हातानें ओढून घेणें, लांकडाचे प्रहार करून घेणें, बाजारांत विकून घेणे, इत्यादिकांच्या योगानें जे कष्ट अनुभवले व जे वातीच्या रूपानें दुसऱ्याला प्रकाश मिळण्याचें साधनत्व स्वीकारलें, वस्त्रांच्या रूपानें लोकांचें गुह्य झांकणें, देवतादिकांच्या नेसण्याच्या उपयोगीं पडण्यानें व लोकांचें थंडी, ऊन इत्यादिकापासून रक्षण केलें इत्यादि कृत्यांनीं जो परोपकार केला त्या पुण्यानें कार्पाससूत्रमय वस्तूला उत्तम स्थानादिकांची प्राप्ति झाली अशी संभावना करावी.

याप्रमाणें निरनिराळ्या अनेक प्रकारच्या वस्तूचें पूर्व जन्मींचें सुकृत, कष्ट अथवा केवळ सुकृत याचा त्यावर आरोप करून उत्तमस्थान आश्रय इत्यादिकांची प्राप्ती झाली असा आरोप करून उत्तम अर्थ साधावा.

## सेवेचे भेद.

जिंकलेल्याची सेवा, स्वगता, छद्मगा आणि प्रतिबिंबगता अशी आहे.

जिंकलेल्याचे दोन प्रकार होतात, म्हणजे जित झालेला देशांतराला जातो किंवा ज्यानें त्याला जिंकलें असेल त्याची सेवा करून राहतो. देशांतराला जाणें म्हणजे अरण्य, पर्वत, गुहा, नद्या इत्यादिकांत जाणें तें पूर्वी सांगितलेंच आहे. सेवेचें विवरण करायचें राहिलें तें सांगतों. सेवा मुळांत सांगितलेल्या तीन प्रकारची आहे.

## स्वगत सेवा.

जसें—भारत्याः गतिजितो हंसः पदसेवां चकारः पार्वतीमध्यजितः सिंहः सेवां कुरुते.

## छद्मग सेवा.

जसें—कामिन्याः वक्रजितः सर्पो वेणीवेशादनुचरीभूतः, तसेंच मुखजितः चन्द्रः चंदनवृत्ततिलकच्छद्मना सेवते.

## प्रतिबिंबगत सेवा.

जसें—मुखजितः चंद्रः कपोलप्रतिबिंबतया अनुप्रवेशं चक्रे, तसेंच जलमाधुर्यैः जितः चंद्रः प्रतिबिंबतया सरः सेवते स्म इत्यादि प्रकारें दुसरींही उदाहरणें जाणावीं.

सेवेच्या पुण्यानें दुसऱ्या कल्याणाची प्राप्ति व शत्रूचा जय वर्णन करावा.

जसें—गतिजितो हंसो यत् भारतीपदसेवां चक्रे* तेन सुकृतेन तज्जातिरपि मधुरशब्दा आसीत्, तसेंच मध्यजितः सिंहः यत् पार्वती-

---

*हंस सरस्वतीचें व सिंह पार्वतीचें वाहन असल्याचें प्रसिद्धच आहे.

पक्षसेवा नक्रे तेन सुकृतेन स्वजातिराज्यं अन्यैरनाक्रमणीयत्वं च लेभे. यात्प्रमाणेंच जितया कमलश्रिया कामिनीमुखाश्रयणेन निजरिपुः चंद्रोपि जीयते स्म, तसेंच मुखजितचंद्रेण स्फटिकादर्शच्छद्मना कामिनीमाश्रित्य स्वोदयेऽपि सदा विकासि सश्रीकं करच्छद्मकमलम् अधः क्रियते मुकुलीक्रियते च.

## दूषणकल्पना.

वर्ण्य वस्तूंची स्पर्धारूप पापानें त्याच्या सारखें जें दुसरें वस्तु तें दूषित झालें अशी कल्पना करावी.

जसें–मुखस्पर्धि कमलं स्पर्धोद्भवपापै राजप्रसादविकलं सकण्टकं च जातं, तसेंच यशस्पर्धी चंद्रः सकलंकः क्षयी च जातः.

सुकृत केलें असतांही सदोषत्व वर्णन करावें.

जसें–वर्ण्य वस्तूची स्पर्धा केली या पातकानें तत्सदृश वस्तु जें घेतलें असेल, तें सुकृत करीत असतांही दूषणयुक्त होतें. जसें–मुखस्पर्धं कुर्वन् चन्द्रो महेश्वरं सेवमानोऽपि सकलंकोऽभूत्, तसेंच मुखस्पर्धोद्भवैः पापैः कमलं हंसद्विजान् शरीरखण्डैरपि प्रीतान् कुर्वाणं सकंटकं भवति, इत्यादि प्रकारें दूषण दाखवावें.

---

१ वरच्या दोन उदाहरणात अनुक्रमानें आपल्या सारख्या जातीचा मधुर शब्द होणें, व आपल्या जातीचें राज्य आणि अनाक्रमणीयत्व प्राप्त होणें हीं दोन दुसरीं कल्याणें प्राप्त झाल्याचें दाखविलें आहे, व या तिसऱ्या उदाहरणात चंद्ररूपी आपल्या शत्रूचा जय करण्याचें सामर्थ्य आल्याचें दाखविलें आहे.

२ या उदाहरणात शत्रू तर नाहींच, पण आपल्याशीं उमेदपणानें वागणारें किंवा थोडा तिळका प्राप्त न देणारें जें कमल त्याला चंद्रानें तुच्छ केलें व मिरवून सोडलें, हें जें त्यास इष्ट प्राप्त झालें तें कामिनीच्या आश्रयानें झालें, असें दाखविलें आहे

३ यातील 'राज' शब्द श्लेष आहे. राजा म्हणजे प्रसिद्ध राजा हें तर उघडच आहे-पण राजा शब्द चंद्राचाही वाचक आहे त्यावरून राजप्रसादानें विकल अर्थात् राजानें ज्यावर प्रसाद केला नाहीं असा व राजा म्हणजे चंद्र त्याच्या योगानें जो प्रसाद म्ह० प्रसन्नता अर्थात् प्रफुल्लित होणें तें ज्याला प्राप्त झालें नाहीं असा अर्थ करावा. पहिल्यापेक्षा दुसरा अर्थ विशेष समर्पक आहे.

४ पहिल्या आणि दुसऱ्या उदाहरणांत अनुक्रमानें राजप्रसादविकलत्व व सकंटकत्व आणि सकलंकत्व क्षयित्व हे कमलाला आणि चंद्राला दोन दोन दोष असल्याचें दाखविलें आहे.

## तपानें अर्थोत्पत्ति.

आतां तपानें अर्थोत्पत्ति होते तिचे भेद सांगतों.

तप—स्वगत, छद्मगत आणि प्रतिबिंबगत असें त्रिविध आहे.

तप करणें तीन प्रकारचें आहे. जें आपणच केलें असेल तें स्वकृत, सदृश वस्तूंच्या छद्मानें केलेलें तें छद्मकृत, जलादिकांच्या ठायीं प्रतिबिंबत्वानें केलेलें तें प्रतिबिंबकृत. हें तीनही प्रकारचें तप पुढें उदाहरणें देऊन दाखवूं.

### तपाची कल्पना.

वर्ण्यादिकांहीं तप वर्ण्यजित वस्तूनें त्याच्या कलेच्या प्राप्तीकरतां केलें असें वर्णन करावें.

वर्ण्य वस्तूनें जिंकलेल्या वस्तूंला वर्ण्य वस्तूंची शोभा प्राप्त होण्याकरितां किंवा त्याला जिंकण्याकरितां वनांत राहणें इत्यादिकांनीं त्याची कल्पना करावी.

### स्वगत तप.

जसें—मुखजितं कमलं तच्छोभाप्राप्तये जलवासादितपः कुरुते.

### छद्मगत तप.

जसें—मुखशोभाप्राप्तये चंद्रो वने लताशाखावलंबी कुसुमस्तबकच्छलेन तपस्तनुते.

### प्रतिबिंबगत तप.

जसें—मुखलक्ष्मीलब्ध्यै चंद्रो रत्नभूमिप्रतिबिंबतया शैलशिरसि तपस्तनुते, याप्रमाणें नाश, सेवा इत्यादि इतर सर्व भेदांत त्रिविधत्व आहे असें जाणावें.

## तत्पदप्राप्ति.

तपानें वर्ण्यजित वस्तूंला वर्ण्य वस्तूच्या शोभेची प्राप्ति अथवा त्याची पदवी मिळाली असें वर्णन करावें. जसें—

यत्कमलेन आकंठजले जलान्तरेण तपः तप्तं तेन नारीमुखसमानता लब्धा; तथैव यत् चन्द्रेण वने कुसुमस्तबकन्दलेन तपः तप्तं तेन स्त्रीमुखलक्ष्मीः लब्धा, यत् भृङ्गश्रेणीभिः विष्णुपदाम्बुजे कांतिधारणाभिरेव सेवा कृता तेन नारीकटाक्षच्छटोपमा प्राप्ता, इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

## अप्राप्ति.

त्याची प्राप्ति न झाल्यामुळें दुःखादि झाल्याचें वर्णन करावें.

तपानेंही वर्ण्य वस्तूच्या लक्ष्मीची प्राप्ति न झाली असतां जिंकलेली वस्तु दुःखदर्शक चेष्टा करते असें दाखवावें. जसें—मुखजितं कमलं जलवासादिभिरपि मुखलक्ष्मीं न प्राप ततो भ्रमरारवैराक्रन्दं कुरुते. तसेंच वेणीजिता भृङ्गश्रेणी, वने मकरन्दास्वादमात्राशनापि वेणीसाम्यं न प्राप ततः साक्रन्दा भ्रमति, इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

त्यानेंही त्याची शोभा प्राप्त झाली नाहीं असें वर्णन करावें.

तपानेंही वर्ण्य वस्तूची शोभा जिंकलेल्या वस्तूला मिळत नाहीं. जसें—कमलजले आकण्ठमग्नं तपस्तेपे परं नारीवक्त्रोपमां न प्राप, तसेंच हंसः सरस्वतीपदसेवां चक्रे परं नारीगत्युपमां न प्राप इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

---

१ येथें वृत्तिकाराची व्याख्या चुकली असावी असें वाटतें कारण मूळसूत्र 'तेनापि नाहि तत्प्राप्ति' असें आहे पूर्वीच्या सूत्रानें वर्ण्यवस्तूची लक्ष्मी प्राप्त न झाल्यामुळें जित वस्तु दुःख दर्शित करीत आहे, असें वर्णन करण्याविषयीं सांगितलें. त्यावरून या सूत्रात 'तेनापि' म्ह० दुःखदर्शनानेंही 'तत्प्राप्ति' म्ह० वर्ण्य वस्तूच्या शोभादिकांची प्राप्ति होत नाहीं असें दाखवावें असें सांगितल्याचें दिसतें. असें न घेतलें तर पूर्वीच्या सूत्रात आणि यात फारसा विशेष दिसत नाहीं आता हें खरें आहे कीं पूर्वीच्या सूत्रात दुःखदर्शन सांगितलें असून यात तें नाहीं आहे हा भेद आहे, तथापि तत्प्राप्ति न होणें हें दोहोंत सारखेंच आहे. व्याख्याकारानीं केलेली व्याख्या बरोबर आहे असें मानलें तरी वरील सूत्राचा आम्हीं केलेला अर्थ करतां येईल व तो ग्राह्यही होईल व तो मार्मिक वाचकाच्या लक्षात येईल.

## महत्प्राप्ति.

**मोठ्या पदवीची प्राप्ति झाली, पण तिची झाली नाहीं.**

तथापि दुसरें मोठें श्रेय प्राप्त झालें, पण वर्ण्य वस्तूची शोभा मात्र प्राप्त झाली नाहीं असें वर्णन करावें. जसें-कमलं जलवासादिभिः श्रीपदं राजहंससेव्यं च जातम् न पुनः स्त्रीमुखोपमां लेभे, तसेंच चन्द्रेण ज्योत्स्ना, दानैः चकोरप्रीणनाद्युकृतैः शिवशिरसि पदं लब्धम् न पुनः स्त्रीमुखोपमानेम् इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

## प्राप्तिविषयीं विघ्न.

**त्याच्या प्राप्तीविषयीं दुष्कृत विघ्नभूत.**

तथापि वर्ण्य वस्तूची लक्ष्मी प्राप्त होण्याच्या कामांत जित वस्तूला त्याचें कांहीं तरी दुष्कृत विघ्नभूत आहे अशी कल्पना करावी. जसें-कमलं शम्भोरम्भोमूर्तेः सेवया मुखोपमाम् अयास्यत् चेत् नित्याश्रितभृङ्गबन्धनम् नाकरिष्यत्, तसेंच विष्णुपदसेवासुकृतेन विष्णुपदादितत्कीर्तितुलनाम् प्राप्नुयात् यदि नीचगमनं न कुर्यात् इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

## दुसरें शुभ.

**त्याची प्राप्ती झाली असतां अन्य शुभ.**

तथापि वर्ण्य वस्तूची शोभा प्राप्त झाली असतां सदृश वस्तूस अन्यही कांहीं कल्याण झालें अशी संभावना करावी. जसें—कमलं जलवासादिभिः मुखोपमां प्राप्य लक्ष्मीस्थानं राजहंससेव्यं च तसेंच जलवासादिभिः पांचजन्यः नारीकण्ठोपमानं प्राप्य लक्ष्मीपतेरपि करारविंदानुग्राह्यः बभूव, इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

## दोष असतांही श्रेयःप्राप्ति.

**त्याची प्राप्ति झाली असतां दोष असूनही श्रेयाची प्राप्तिः**

तथापि वर्ण्य वस्तूचें उपमानत्व प्राप्त झालें असतां सदृश वस्तूला तें

सदोष असतांही—श्रेय प्राप्त झाल्याची कल्पना करावी. जसें—जलवासादिभिः सुखोपमाम् प्राप्त कमलं सकटकमपि देवशिरांसि अधिरोहति, तसेंच विष्णुपदसेवया गंगा यत्कीर्तिसमता प्राप्य नीचगामिन्यपि शिवशिरस्सश्रया आसीत्, इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

## हर्षानें नर्तनादिक.

त्याची प्राप्ति झाली असतां नर्तन इत्यादिकाचें वर्णन करावें.

तपानें वर्ण्य वस्तूनें उपमानत्व प्राप्त झालें असतां तत्सदृश वस्तु हर्षानें नृत्य इत्यादि करीत आहे अशी कल्पना करावी.

## नृत्यादिक.

नृत्य, उत्कंधरता, स्मेर, गौरव, आपीड यांणीं युक्तता, आश्रिति, अतिथि आणि विप्र इत्यादिकांला दान आणि देवादिकांचें पूजन वर्णन करावें.

जसें—जलवासादिना स्त्रीमुखोपमाम् प्राप्य कमलं वातचलितपत्रैः नृत्यं रचयति.

## उत्कंधरता.

राज्ञा स्थैर्योपमाम् प्राप्य मेरु रुत्कंधरोऽभूत्.

## स्मेर.

गाम्भीर्योपमां प्राप्य जलधिः सर्वदिग्व्यापी बभूव.

---

१ या वरच्या दोन्ही उदाहरणांत कमलाला आणि चंद्राला स्त्रियांच्या मुखाचें उपमानत्व मिळालें नाहीं असें जें वर्णन केलें आहे, तें सामान्यतः सर्व स्त्रियांच्या मुखाविषयीं आहे, असें घेऊं नये. तर विशिष्ट प्रकारची जी वर्ण्य स्त्री असेल तिच्याच मुखापुरतें घ्यावें, हें उदाहरण देऊन स्पष्ट करतो. जसें 'जलवासादिभिस्तपस्तप्त्वा कमलेन लक्ष्म्यालयतां राजहंसैर्न्य च लब्धम न पुनर्दमयन्तीमुखोपमत्वम्' या उदाहरणांत आम्ही दमयंतीचेंच जसें ग्रहण केलें आहे तसेंच कवीला ज्या वेळीं ज्या स्त्रीचें वर्णन करावयाचें असेल तिच्या मुखाचें ग्रहण करावें. तसें न करतां स्त्रीमात्राच्या मुखाचें ग्रहण केलें तर पूर्वी याच ग्रंथांत व इतर हजारों ग्रंथांत मुखाचें आणि कमलाचें किंवा चंद्राचें उपमानउपमेयत्व घेतलें नाहीं असें तें व्यर्थ होईल

## गौरव.

मतिसमतां प्राप्य बृहस्पतिर्देवगुरुतां गतः.

## आपीड.

सुकेशी केशोपमां प्राप्य कलापि शिखाच्छलात् आपीडं धत्तेव स्थैर्योपमां प्राप्य गिरिः शिरस्थमेघावलीव्याजात् मुकुटं धत्ते.

## पुष्टता.

राज्ञः स्थैर्योपमां प्राप्य मेरुः स्थूलोऽभूत्.

## आश्रितदान.

मुखशोभां प्राप्य चन्द्रः स्वाश्रितचकोरान् स्वेच्छया ज्योत्स्नापानं कारयति.

## अतिथिदान.

मुखलक्ष्मीं लब्धा कमलं हंसद्विजान् अतिथिभृङ्गान् आहारदानेन प्रीणयाति.

## देवपूजा.

'मुखोपमां प्राप्य चन्द्रेण स्वकलया शिवपूजा कृता' इत्यादि प्रकारें वर्णन करावें.

याप्रमाणें वर सांगितलेल्या नृत्यादिकांचें वर्णन करावयाचें तें–चंचल असेल त्याला नृत्य, उंच असेल त्याचें गर्वानें मान वर करणें, विस्तीर्ण असेल त्याला स्मेरता, पूज्य असेल त्याला गौरव, ज्याच्या मस्तकावर कांहीं विशेष चिन्ह असेल त्याच्या त्या चिन्हाला आपीडक, स्थूल असेल त्याच्या ठायीं पुष्टता, इत्यादिकांची यथायोग्य रीतीनें कल्पना करावी. येथवर सांगितलेल्या अनेक उल्लेखांनीं अर्थांची कल्पना करावी.

---

१ येथें वर्णनीय जो मंत्री किंवा दुसरा कोणी असेल त्याच्या बुद्धीची समता घ्यावी.

२ येथेंही वर्ण्य राजादिकाचें स्थैर्य घेतलें पाहिजे.

## अर्थोत्पत्तीचा दुसरा प्रकार.

अर्थोत्पत्तीकरता दुसरा प्रकार सांगतों.

### अंगसुहृद्भंग.

द्वेष्य वस्तूचे अंगभंग, आणि सुहृद्भंग यांहीं.

वर्ण्य वस्तूनें जो पदार्थ जिंकला असेल त्यानें वर्ण्यवस्तु हें द्वेष्य झालें, ते हा द्वेष्य अर्थात् वर्ण्यवस्तूची जीं अंगें त्यांच्याशीं साम्य असल्यामुळें त्याच्या सुहृद् अशा ज्या वस्तू त्यांना जितवस्तूंकडून भंग झाल्याची कल्पना करावी.

जसें— नार्या कुचाभ्यां जिता कुम्भा नारीमुखमित्राणि कमलानि उन्मूलयन्ति, तसेंच नार्या मध्यजित सिंह नारीनेत्रमित्राणि मृगकुलानि भिनत्ति

### विद्वेषीपोषण.

अंगाचा द्वेष करणाऱ्याच्या पोषणानीं अर्थोत्पत्ति होते.

द्वेष्य वस्तूच्या अंगाशीं समता असल्यामुळें द्वेषी रूप ज्या वस्तु त्यानें जिंकलेल्या पदार्थाकडून पोषण झाल्याचें वर्णन करणें जसें— राज्ञ प्रतापजितो रवि राजयशोमित्रचन्द्रद्वेषिणि कमलानि सश्रीकाणि कुरुते, तसेंच राज्ञ यशोजितश्चन्द्र राजप्रतापमित्ररविद्वेषिणि कैरवाणि विकासयति, इत्यादि प्रकारें वर्णन करावें

---

१ या उदाहरणांत नारी हें वर्ण्य तिचे कुच यांनीं सादृश्यानें कुंभाला जिंकलें तेव्हां अर्थात् कुंभ हा कुचांचा द्वेषी झाला तेव्हां ज्यानें आपल्याला जिंकलें त्याचा (स्तनाचा) तर आम्हांला हातून कांहीं पराभव होत नाहीं तेव्हां याच्या मित्राला तरी उपद्रव द्यावा असें बुद्धीनें नारीमुखाचे मित्र जीं कमलें तीं तो उपटून टाकतो असें वर्णन केलें आहे

२ या उदाहरणांत वर्ण्य राजा त्यानें जिंकलेला रवि अर्थात् रवीचा राजा हा द्वेष्य झाला राजाच्या यशाचा (तें धवल असल्यामुळें) मित्र चंद्र याच्याशीं द्वेष करणारीं कमलें (रात्रीं प्रफुल्लित होत नाहींत म्हणून) यांना रवि शोभा देतो अर्थात् जित पदार्थ जिंकणाऱ्या त्याचा द्वेषी आहे म्हणून त्याच्या अंगाच्या मित्राच्या द्वेष्याचें पोषण करून आपल्या द्वेष्याला ताप होईल असा करतो असा भावार्थ पुढच्या उदाहरणांतही असेंच समजावें

## सुहृत्पोषण.

अंगद्वेष करणाऱ्यांच्या मित्रांच्या पोषणानेंही अर्थो होते.

द्वेष्यांगाचा द्वेष करणाऱ्यांचे जे सुहृत् त्यांचें जित पदार्थां पोषण झाल्याचें वर्णन करावें. जसें—नार्याः मुखजितः चंद्रः स्त्रीका द्वेषिपद्मपदश्रेणीप्रीतिदायीनि कैरवाणि विकासयति, तसेंच न गतिजितो हस्ती मुखद्वेषी कमलोपासकान् भृंगान् दानेन पुष्णाति.

## द्वेषिवध.

अंगद्वेषी जे त्यांच्या शत्रूंच्या वधानें अर्थोत्पत्ति होते

द्वेष्याच्या अंगाचे जे द्वेषी त्यांची जी द्वेष करणारी वस्तू जित पदार्थांकडून वध, नाश अथवा त्यांना दुःख देणें इत्यादि प्र झाल्याचें वर्णन करावें. जसें—नार्याः धम्मिल्लजितो राहुः स्त्रीमुख कमलद्वेषिणं नारीकुचयुग्मद्वेषी चक्रयुग्मद्वेषिणं चा चंद्रं पीडयति, त नार्याः वेणीजिता भृङ्गश्रेणी स्त्रीमुखद्वेषी चंद्रद्वेषी कमलानि पदा पराभवति.

---

१ या दोन्ही उदाहरणांत अनुक्रमानें—पहिल्या उदाहरणांत स्त्रीच्या मुखानें चंद्राला ( अर्थात् जित जो चंद्र त्याचा स्त्रीमुख हा पदार्थ द्वेष्य झाला, त्याचें अंग कटाक्ष, त्या क (मादकत्वामुळें) द्वेष करणारे भ्रमर, त्याला रात्रीविकासी कैरवाच्या योगानें प्रीति उत्पन्न म्हणून चंद्र तीं प्रफुल्लित करितो असें व दुसऱ्या उदाहरणांत जित जो हस्ती तो आपल्या दे द्वेषी अर्थात् स्त्रीमुख द्वेष करणारीं कमळें त्याचे उपासक भृंग म्हणजे आश्रित भ्रमर, त्याला दा मोदक ) देऊन त्याचें पोषण करितो, असें वर्णन केलें आहे. त्यावरून द्वेष्याच्या अंगा करणाऱ्यांचे मित्र जितानें तुष्ट केले व द्वेष्याच्या अंगाचे द्वेषी याचे आश्रित याला देऊन केले असें अनुक्रमानें दाखविलें आहे.

## चौर्यापासून नाश वगैरे.

समान वस्तूंच्या शोभेची चोरी केल्यामुळें नाश अथवा निग्रह झाल्याचें.

वर्ण्य वस्तूंच्या अंगामारखें जें वस्तु त्यानें वर्ण्याच्या अंगानी शोभा चोरल्याची कल्पना करून. अरण्यादिकांत त्याचा नाश किंवा निग्रह झाल्याची कल्पना करावी. जसें—मृगः नारीनयनशोभां हृत्वा वने नष्टः, तसेंच स्त्रीमध्यश्रियं हृत्वा सिंहो गिरिगह्वरे गतः, नारी मुखलक्ष्मीहरं कमलमिति राजहंसैर्हि खंडशः क्रियते, रात्रौ स्त्रीमुख-लक्ष्मीं हरति चंद्र इति प्रातःकालेन चिह्नकरः क्रियते.

निपात, आयतनद्रव्यभंग, प्राकारलंघन, राजवेषासन-स्थानविरुद्धादिनिषेवण अगम्यगमन, अपेयपान, अभक्ष्य-भक्षण इत्यादिकांच्या अपन्हवानें दिव्य ( प्रमाण ) अथवा प्रायश्चित्त होतें.

## दिव्य ( प्रमाण ).

प्रथम दिव्य सांगतों, जसें—

" हृत्वाऽपि कान्तिधनमस्य नृपस्य कीर्त्तेः
दिव्यं सृजन्निव जगत्यपवादभीतः ।

१ या सर्व उदाहरणात चोरी या गुन्ह्याची कल्पना केली आहे. अर्थात् चोराला हद्दपार करणें, अंधारकोठडींत कोंडून ठेवणें, त्याचे तुकडे तुकडे करणे व हात तोडणें इत्यादि प्रकारच्या शिक्षा झाल्याची कल्पना सयुक्तच आहे.

इन्दुः सुधावपुरपि प्रभुरोपधीना-
मप्येप लक्ष्मीमिपसर्पभृतौ न शुद्धः ॥"

## प्रायश्चित्त.

प्रायश्चित्त करण्याचा प्रकार सांगतों. जसें—

"समरे यत्करवालः पीत्वा मातङ्गकुम्भकीलालम्।
अनुतापीव व्रतयति रिपुनृपतीनां यशःक्षीरम् ॥"

याप्रमाणें दुसरींही उदाहरणें जाणावीं.

## भ्रमप्रकारांनीं अर्थोत्पत्ति.

भ्रमाच्या प्रकारांनीं अर्थोत्पत्ति कशी होते तें दाखवितों. जसें—

. स्वस्थादिकांनीं भ्रमानें कार्यप्रवृत्तिपरिकल्पना केली जाते.

स्वस्थछद्मस्थ आणि प्रतिबिंबस्थ या तीनप्रकारांची पूर्वी सांगितल्याप्रमाणें योजना करावी. यांचीं अनुक्रमानें उदाहरणें सांगतों.

## स्वस्थता.

जसें—

"नलिनानि पानमधुभाजनानि नः
पिदधाति यः स विधुरेप गोचरः।

१ या उदाहरणांत चंद्रानें राजाचें कान्तिरूप धन चोरल्याची कल्पना केली आहे. तो स्वतः अमृतमय शरीर व औषधींचा प्रभु असा आहे तरी तो त्या दोषापासून शुद्ध झाला नाहीं त्यानें जें धन चोरलें त्याचा रक्षक नाग आपल्या अंगावरच्या कलंकाच्या मिषानें त्याला धारण करावा लागला. तो सर्प त्यानें दिव अर्थात् आपण चोरी केली नाहीं अशी लोकाची खात्री करण्याकरतां प्रमाण करावें म्हणून धारण केल्याचें वर्णन केलें आहे.

१ या उदाहरणांत करवाल (तरवार) यानें हत्तीच्या गंडस्थलाचें रक्त प्राशन केलें अर्थात् अपेयपानरूप त्याच्या हातून पातक घडलें त्याच्या निवृत्तीकरतां पश्चात्ताप करून त्यानें व्रत घेतलें आणि शत्रुभूतराजाचें यशरूप दूध प्राशन करून तो राहात आहे, असें वर्णन केलें आहे. दूध प्राशन करून राहणें हें व्रत घेतल्याचें एक मुख्य लक्षण आहे.

इति रोपणैरिव मधुव्रतैर्धुतं
सुदतीमुखं सुरभिचारुमारुतम् ॥"

छद्मस्थता.

" ताटङ्कमुक्तमुक्तालिच्छलतस्तारकाततिः ।
निजभर्तृभ्रमेणेयं भेजे चन्द्रमुखीमुखम् ॥
यत्र वैदूर्यवर्येषु कुट्टिमेषु तमोभ्रमात् ।
प्रतिबिम्बेन ताडिन्तौ पतिरापतति स्त्रियाम् ॥

प्रतिबिम्बस्थता.

जसें—

" मणिनद्धेषु यत्सौधाङ्गणेषु प्रतिबिम्बिताम् ।
शशाङ्ककैरवभ्रान्त्या भजन्ते भृङ्गराजयः ॥"

अन्यत्र कार्यप्रवृत्ति.

कारण प्रत्यय झाला असतां भ्रमानें कार्याची अन्यप्रवृत्ति होते.

"एकत्र क्वचिदेव देवसदने संप्रेक्ष्य साक्षात्कृतप्रद्योतं
तपनीयकुम्भमुदयक्ष्माभृद्गतार्कभ्रमात् ।
आश्लिष्यत्यनिशं निशास्वपि वियद्गङ्गारथाङ्ग्यो मिल-
द्भर्तृभ्रान्तिभृतः पयोगतनिजच्छायां विमुग्धाशयाः॥"

### भ्रमानें साफल्य.

कार्यप्रवृत्तीचे ठायीं भ्रमानें क्वचित् साफल्य होतें.
जसें—

" विधुमणिमयसौधप्राङ्गणे यत्रचन्द्र-
प्रमितिमतिप्रफुल्लकैरवभ्रान्तिभाजः ।
असकृदमृतबिन्दुस्यन्दपानेन भृङ्गाः
प्रसृमरमकरन्दास्वादसौख्यं लभन्ते ॥ "
यत्रोन्मुखं चातकवृन्दमभ्रभ्रमेण चैत्योत्थितधूपधूमे ।
वेल्लत्पताकाग्रगृहीतमुक्तनभोनदीबिन्दुभिरेति तृप्तिम् ॥"

### सत्यवस्तूवर भ्रम.

भ्रमानें कार्याचें निष्फलत्व झालें असतां सत्यवस्तूचे ठायींही भ्रम होतो.
जसें—

" आलिङ्गन्त्युच्चैः सुरगृहशिरःशातकौम्भीयकुम्भान्
भर्तृभ्रान्त्या निशि विफलिताः स्वर्गगङ्गारथाङ्ग्यः ।
अर्कालोकादुपगतमपि प्रीतिभाजं रथाङ्गं
मिथ्याबुद्ध्या सपदि न परीरब्धुमारात् त्वरन्ते ॥

### तसें न करणें.

भ्रमानें कार्य निष्फल झालें असतांही तसें न करणें.
जसें—

"यस्मिंश्चित्रपतत्पतत्रिपरुपोत्कर्षेण वेश्मान्तरे
मार्जारः परिजर्जरोऽजनि जवादाहत्य सत्यभ्रमान् ।

## आहारासारखा देह व वर्ण.

आहार, सदृश, उद्गार आणि देहवर्ण यांची उत्पत्ति व विपर्यय यांनीं.

वस्तूचे ठायीं औचित्यानें त्याचा जो आहार असेल त्यासारखे उद्गार व देहाचा वर्ण यांची उत्पत्ति झाल्याची कल्पना करावी. कोठें आहारानें उद्गार आणि देहवर्ण यांचा विपर्यय ही करावा. अनुक्रमानें दोहोंचीं उदाहरणें देतों. जसें—

उद्गाराचें उदाहरण.

" अतिलौल्यतः कवलयन्
मलिनद्युति काननं किमपि दावशिखी ।
बहुभक्षणेन शितिभू
मपि पात्यनुतेस्म भोजनवदुद्गिरणम् ॥ ".

देहवर्णाचें उदाहरण.

" द्विपन्मृगाक्षीनयनाञ्जनानि
यदेप नित्यं कवलीकरोति ।
क्षितीश तेनाशनिसन्निभैव
विभा विभातिस्म भवत्कृपाणे ॥ ".

आतां विपर्ययाविषयीं उदाहरणें देतों. जसें—

उद्गाराचें उदाहरण.

" यद्वदन्त्यशनसन्निभमेवोद्गारमित्यनृतमत्र बभासे ।
गीतकं यदुदगारि सुधावत्पीतसीधुभिरपि प्रमदाभिः॥"

देहवर्णाचें उदाहरण.

" सिच्यमानमपि शत्रुकामिनी
कज्जलाविलविलोचनाम्बुभिः ।
आहताऽसितमनोऽपि भासते
श्वेतभानुसममेव यद्यशः ॥ "

## सदृशवस्तुसंग्रह.

पदार्थांचें परस्पर साम्य अर्थाप्तचीचें कारण होतें, याकरतां कित्येक सदृश वस्तूंचा संग्रह करतों.

वर्ण आणि आकार यांचे सदृश पदार्थ वर सांगितले, आतां दुसरा किरकोळ सदृश वस्तूंना संग्रह करतों.

तीक्ष्णवस्तू. जसें.—

तीक्ष्ण—मतिभाल्लाग्र, कटाक्ष, सुचिका, नखें, दांत, गाइक, शूल, कुठार, क्रकच, असिपत्रद्रुमपत्रे, शूल, माजन, नेमी, वराहदंष्ट्रा, नांगर, सिंहनख, मर्मभेदकवाक्य, कुशी, अंकुश, कुशाग्रें, खड्गधारा, हिरा, कर्त्तरि, कर्तिका, टंकानिर्वभन, नखभेदिनी.

महत्तम वस्तू.

महत्तम—दिशा, काल, आकाश. ज्ञान, शिव, विष्णु, आराम, साधूचें मन, व बुद्धि; समुद्र, अरण्य, भूमि, शय्या, अर, पुलिन, श्रोणि, कपाट, क्षेत्र आणि गृह.

सध्य यस्त

## मंगलकारक वस्तू.

मंगलकारक—दर्भ, दूर्वा, चंदन, अक्षता, दीप, रसाल, पिप्पल आणि अशोक यांचीं पानें, कमल, फल, शंख, सिद्धार्थक, सिद्धान्न, मधु, आज्य, आमिष, रौप्य, ताम्र, मणि, सुवर्ण, भूपर्ण, वस्त्रें, व्यजन, चामर, छत्र, ध्वज, वाहन, गज, वाजी, ताम्बूल, गार्यन, वाद्य, वादन, गुरु, वंदी आणि ब्राह्मण यांचे आशीर्वाद, उत्तम स्वप्न, शुभ शकुन, हंस, चाप, खंजन, मयूर, अंगना, उत्तमशृंगार केलेली रूपवती प्रेमळ व प्रिय.

## महामांगल्य वस्तू.

महामाङ्गल्यकारक— श्रीवत्स, मत्स्य, दर्पण, भद्रासन, वर्द्धमान, वरकलश, स्वस्तिक, आणि नन्द्यावर्त ह्या आठ वस्तू महामांगल्यकारक असल्याचें सांगितलें आहे.

## अमंगल वस्तू.

अमंगल—घुबड, सर्प, कपोत, शशक, कौलव, कृकलास, दुष्ट शकुन, दुष्टस्वप्न, दुष्ट उपश्रुति, कृतघ्न, अन्त्यज, पाखंडी, पतित, शत्रु, विलाप करणारा, नग्न, छिन्नांग, रोगार्त, दीन, ब्राह्मणादिकांला मारणारे, झाडणी, गाढव आणि बकरा यांच्या पायाचा धुरळा, चिताधूर, शाखोटक, व बिभीतक, ह्या दोन वृक्षांची व मंचक आणि दीप यांची सांवली.

## पवित्र वस्तू.

पवित्र–शिव, बुद्ध, अर्हन्, विष्णु, ब्रह्मा, सूर्य व त्याचे किरण, अग्नि, उदक, वायु, भूमि, वेदवाणी, संन्यासी, द्विज,

पुरोहित, धेनु अतिथि, सुवर्ण, दर्भ, गोमय, सत्य, सत्पुरुषांचीं चरित्रें, पूज्य मनुष्याचे पाद, रजःकण, गंगा, गोदावरी, नर्मदा, यमुना, सरस्वती, कामरूपदेश, कुरुक्षेत्रप्रदेश, अन्तर्वेदिप्रदेश, काशी-नगरी, सीता, दमयंती, द्रौपदी, अरुंधती, इत्यादि पतिव्रता, तप, ब्रह्मचर्य, हरिश्चंद्र, नलराज, रामचंद्र, आणि युधिष्ठिर.

## अपवित्र वस्तू.

अपवित्र—रक्त, अस्थि, गाईवांचून इतर प्राण्यांचें शकृत्, दुश्चरित, अंत्यज, रजस्वला, श्मशानभूमि, श्मशानभस्म किंवा चिताभस्म, चितांगार, प्रेत, कृतघ्न, स्वामिद्रोही, विश्वासघातकी, ब्राह्मणादिकांचा घात करणारा, अंगापासून तुटून पडलेले केश इत्यादि, उच्छिष्टान्न, ऋद्विक, कुत्रा.

## सुखदायक वस्तू.

सुखदायक—प्रियस्त्री, गीत, नृत्य, वाद्य इत्यादि, नाटक, आराम, पुष्पें, स्त्रिया, स्त्रियांचे विलास व क्रीडा, सुखशय्या, चंद्र, हिंदोळा, स्वातंत्र्य, लक्ष्मी, पुत्रोत्पत्ति, नष्ट झालेल्याची प्राप्ति, इच्छितलाभ, वियुक्त झालेल्या प्रियाचा समागम, दाता, विद्वान्, मित्र, विद्या, स्वर्ग, अमृत, अप्सरा, धर्म, सद्वचन, सत्पुरुष, संतोष, ज्ञान, मुक्ति.

## दुःखकारक वस्तू.

दुःखद—मनोव्यथा, नरक, बंदिशाळा, व्याधि, विरोधी, कुत्सित भार्या, दारिद्र्य, कुग्रामवास, दुष्टधन्याची सेवा, कन्याबाहुल्य, तारुण्यांत स्त्री किंवा पुत्र यांचें मरण, बाल-

पणांत आईचें मरण, परगृहवास, दुर्लभ, नीरस, स्नेहहीन व दुसऱ्याच्या ठिकाणीं आसक्त अशांवर प्रेम, पारतंत्र्य, दुसऱ्यावर आसक्त झालेली स्त्री, दुर्नय पुत्र, वर्षाकालांत प्रवास, दोन स्त्रिया, कुभृत्य, भागीदारीची शेती, निष्कलंक असलेल्यास कलंक, मानी पुरुषाची मानखंडना.

## स्थिर वस्तू.

स्थिर—पृथ्वी, पर्वत, धर्म, अधर्म, साधूचें मन, साध्वीचें शील, युद्धांत धीर, महात्म्यांला शरण जाणें.

## अस्थिर वस्तू.

अस्थिर—नदीचा पूर, उदकाच्या लहरी, बिंदु, बुद्बुद, विद्युल्लता, धूम, स्फुलिंग, उल्कानल, अनिलाहतदीप, मत्स्य, वानर, ध्वज, संध्याकाल, हत्तीचें पुच्छ, सोंड आणि कान, कन्दुक, चामर, चक्र, दोला, स्त्रीची विलासभ्रमर्षी, निमेषोन्मेष रसना, नेत्र, अंग, आयुष्य, तारुण्य, स्नेह, इंद्रधनुष्य, स्वामिप्रसाद, स्वप्न, दुर्जनमैत्री.

## वेगवान् वस्तु.

सवेग—वायु, इंद्राचे घोडे, मन, गरुड, घोड्याची दृष्टि, बाण, नदी, विमान, हनुमान्, मत्स्य, उंट, मृग, पक्षी.

## मंद वस्तु.

मंद—शनि- पांगा, मुनि, बाल, नितंबिनी, गजगत, पुण्यपुरुष, हंस, वृषभ, हत्ती.

## बलिष्ठ वस्तू.

बलिष्ठ--विष्णु, शिव, स्कंद, इंद्र, गरुड, वायु, श्रीराम, हनुमान्, भीम, बलदेव, बलि, वज्र, सुदर्शन, सुरा, दैत्य, सिंह, शरभ, गज, महावराह, दिग्गज, शेष, कूर्म, कुलाचल, पृथु, ऐरावत, चक्री, साध्वी स्त्रीचें मन, पूर्वकर्म, प्रतिपन्न, मोठ्यांची प्रतिज्ञा, स्त्री जड, आणि ग्रह.

## निर्बल वस्तू.

अबलिष्ठ--रोगार्त, बाल, क्षुधित, कातर, बळजबरीनें केलेलीं कामें, नारी, पाप करून द्रव्य सांचविणारा राजा.

## क्रूर वस्तू.

क्रूर--सर्प, मांजर, मकर, व्याध, पोत्री, हर्यक्ष, दुर्जन, श्येन, स्तेन, प्रत्यंतवासी.

## अक्रूर वस्तू.

अक्रूर--शिशु, साधु, धार्मिक, धर्मनंदन, उत्तम स्वामी, उत्तम भृत्य, उत्तम मित्र, तत्त्वज्ञ, गाय, उत्तम स्त्री.

---

१ हिरण्याक्षानें रसातळास नेलेली पृथ्वी वर काढण्याकरतां वराह अवतार घेऊन आपल्या दाढेवर धरून पृथ्वी वर काढली अशी पुराणांत कथा आहे. पृथ्वी पाताळीं न जावी म्हणून तो वराह रूपी भगवान अद्यापि पृथ्वीच्या खालीं आहे असेंही वर्णन आहे. त्या वराहाला 'महावराह' म्हणतात. कित्येक ठिकाणीं 'आदिवराह' असेंही त्याला नांव दिलें आहे.

२ प्रत्यंत हें नांव म्लेंच्छ ज्या देशांत राहतात त्या देशाचें आहे. भारतवर्षाच्या सरहद्दीवर असलेला देश असें होतें. अर्थात् आर्यभूमीच्या सरहद्दीवर असलेला मुलुख जो काबूल वगैरे त्याला प्रत्यंत देश म्हणतात. येथें वर प्रत्यन्त देशांत राहणारे लोक क्रूर म्हणून सांगितले आहेत. यावरून हा ग्रंथ ज्या वेळीं मुसलमान लोक आपला देश सोडून इकडे येऊन आर्य लोकांशीं युद्ध करीत होते अशा वेळचा असावा असें वाटतें.

## मधुरध्वनिकारक वस्तू.

मधुरध्वनि—हंस, मयुर, पिक, सारस, कामिनी, कुरर, कंक, कीर, पारावत, भ्रमर, घातक, ककुद, केतु, किंकिण, परघराबलि, घंटनाद, हतनाद, बालादिकांचा पायांचा घरघर शब्द, वेणू, वीणा इत्यादिकांचा शब्द, मंजरी, मेखला आणि कांकणें यांचा शब्द, गंधर्व, अप्सरा, हाहा, हुहू, तुम्बरु, किन्नर, गांधार, गाणारे हंस, षड्ज, गाणारे केकी, पंचम गाणारे कोकील, मध्यम गाणारे क्रौंच, निषाद गाणारे कलभ, व धैवत सुरावर ध्वनि करणारे घोडे, ऋषभ, हे ऋषभस्वरावर आवाज करितात इत्यादि स्वरवस्त्यांनीं जाणावें.

## कठोर शब्द करणारे,

कठोर—रटित, घूक, घरट, करभ, खर, मंडूक, कोल, काकोल, कपोत, कुकुट, भाल, दारांचा आवाज, वेडीच्या सांखळीचा ध्वनि.

## महा शब्द.

महाशब्द—मेघ, ऐरावत, गरुडाचे पंख, समुद्राच्या लाटा, समुद्राचा मंथा, शिवाचा अट्टहास, शिवाच्या डमरूचा ध्वनि, सिंह, उंट, हनुमान, आणि राक्षस, क्ष्वेडा, सांराविण यांचे शब्द, नान्दी, अब्धि, कृष्णशंख, ओघ आणि मल्लांचा बाहु, स्फोट यांचा ध्वनि, निर्घात, रथघोष, ज्याटंका, गज, राजी, भदढक्का, शिखोद्धार, स्फारनिर्जर, घरघर, देवळांतल्या किंवा हत्तीवरच्या घांटा, गुहादिकांतला प्रतिध्वनि, वीरांचा निनद,

दुरून हाक मारणें, रडण्याचा शब्द, वीणा इत्यादि ततवाद्य, ताल इत्यादि घनवाद्य, वंश इत्यादि सुशीरवाद्य, मुरज इत्यादि विततवाद्य, हें चार प्रकारचें वाद्य; वंदी, पंचारव, नांदी व द्वादश तूर्यांचा घोष नाटकादिकांत, भंभा, मकुंद, मर्दल, करडा, झल्लर, हुडुक, कंसाला, भेरी, तिलिमा, वंशा, शंख, कणव, नाटकांतली नांदी, टुका, ढक्का, डमरु, काहल, बुक्क, भेरी, लाणय, पहुहो, जुग, शंख, जरड, थोग, प्रमर्दल, कंसाल, व रणांत नांदी.

## सुगंध वस्तू.

सुगंध—कापूर, कस्तूरी, यक्षकर्दम, वस्त्र, मलयजधूप, अगरु, मीनमद, यश, सुगंधी तेल, स्वर्गांतल्या वृक्षांचीं पुष्पें, फुलांचें पतन, पद्मिनी जातीच्या स्त्रीचें मुख, मेघोदकानें भिजलेली पृथ्वी, ग्रंथिपर्णक, जायफळ, पत्री, लवंग, वेलदोडे, कंकोळ, तज, तमालपत्र, मद्य, सप्तछद, हत्तीचा मद, साळी, कुसुम, जाई, केतकी, बकुल, कमल, पाटला, चंपक, मल्लिका, करुणि, शतपत्रिका.

---

१ येथें तत, घन, सुषिर आणि वितत असे वाद्याचे चार भेद सांगितले आहेत. वीणादिकांचा स्वर लांब व विस्तृत होतो म्हणून त्याला तत म्हणतात. झांज, टाळ इत्यादि हीं वाद्यें घन असतात म्हणून त्याला घन म्हटलें आहे. वंश (पावा) इत्यादि वाद्यें पोकळ असतात म्हणून त्यांस सुषिर म्हणतात. तसेंच चवथें नांव वितत हें येथें सुरज मात्र आढळतें, पण अन्यत्र या नांवाचा कोठें उल्लेख केलेला आढळत नाहीं. त्याच्या बदल 'आनद्ध' म्हणजे चामड्यानें मढविलें आहे तें (अमरकोश कांड १ वर्ग ७ श्लोक ४ पहा) वितत म्हणण्यापेक्षां आनद्ध म्हणणें हेंच बरोबर दिसतें.

२ या वाद्यांच्या पूर्वी मर्दल इत्यादि जीं वाद्यें सांगितलीं आहेत तीं वाजवून नाटकाची नांदी म्हणजे नाटकाचा आरंभ होतो असें समजावें.

३ या पूर्वीं सांगितलेलीं वाद्यें वाजवून युद्धारंभ होतो म्हणून यास युद्धांतली नांदी असें म्हटलें आहे.

## दुर्गंध वस्तू.

दुर्गंध—अंगाचा घाम, कुजलेलें इत्यादि अन्नाचा दुर्गंध, मृत मनुष्याच्या स्नानादिक पुरीष, अपानमारुत इत्यादि.

## शीतल वस्तू.

शिशीर—सज्जनाचें वाक्य, प्रभूचा प्रसाद, इष्टसंगम, सत्संग, काव्य, यश, संतोष, सुधा, अंबु, हेमंत, हिमकर, करका.

## उष्ण वस्तू.

उष्ण—तरणि, वन्हि, वडवानल, शिवाची भाल, दृष्टि, कालाग्निरुद्र, विष्णूचें चक्र, ब्रह्मास्त्राचा अग्नि, अस्त्रांचें तेज, वज्र, विद्युल्लता, दावाग्नि, ग्रीष्म, करीषाग्नि, रजई, मनःपीडा, भ्राष्ट्र, ज्वर, धर्मसताप, दुर्वाक्य, तप, क्षुधा, दीप, शाप, दुर्वासाचा क्रोध, वैऱ्याकडून पराभव, सपत्नी, इष्टवियोग, इष्टरुतावज्ञा, स्मरज्वर.

## कोमल वस्तू.

कोमल—स्त्रीचें अंग, शिरीष, नवपल्लव, हसरोम, कदलीस्तंभ, पट्टवस्त्र.

## कठोर वस्तू.

कठोर—शिला पर्वत, वज्र, दुर्जनाचें मन, दुष्ट धनी, वाईट चाकर, कुमित्र, कुपत्नी, डाकिनीचें मन, लोखंड, वैऱ्याचें मन, हत्ती, मनुष्याचा हात, तरुण स्त्रीचे स्तन, कृतघ्न, नालिकेर, इंगुदी आणि कपित्थ यांचीं फळें.

## मधुर वस्तु.

मधुर---विदग्धाची उक्ति, काव्य, गायन, प्रियेचा अधर, सुधा, मधु, दुग्ध, नारळाचा रस, चंद्रकांति, द्राक्षा, आंबा, दाळिंब, केर, राजादन इत्यादिकांचीं फळें.

## रस.

रस---पुष्परस, कीर्त्ति, गूळ, खडीसाखर, ऊंस, साखर, सुरा, शिखरिणी, मस्तु, पायस, पानकें.

## कडू वस्तू.

कटू---राजिका, हिंग, तेल, धत्तूरक, तुही, विष, तुंबीफल, लिंब, वारणइंद्र, वारुण, गडूची.

## खारट वस्तू.

क्षार---लवण, सुवर्चल, सैंधव, टंकण, यवक्षार, स्वर्जिका, अजमूत्र, क्षारसमुद्र.

## तिखट वस्तू.

तिक्त---मरीच, सुंठ, सूरण, शृंगवेरक, पिंपळी, पिंपळीमूळ, अजमोदा इत्यादि

## आंबट वस्तू.

आम्ल---बीजपूर्ण, जम्बीर, करग, आम्लिका, आरनाल, कपित्थ, निम्बूक, आम्लवेतस.

## द्रव वस्तू.

द्रव---अमृत, पानीय, घृत, तक्र, दूध, सुरा, तेल, आम्र,

मकरंद, इक्षुरस, शिखरिणी, मषी, मद, अश्रु, रुधिर, मूत्र, स्वेद, पारद, अवश्यायाम्बु, कर्पूरजल, चंद्रोपलद्रव.

## तेजस्वी वस्तू.

तेजस्वी--रवि, चंद्र, तारा, सुवर्ण, पारा, नेत्र, दंत, नख, आरसा, रुपें, काशें, अभ्रक, मणि, सूर्यकांत, चंद्रकांत, खद्योत, मोतीं, विद्रुम, हिरे, पद्मराग, मरकत, वैडूर्य, आणि राजपट्ट.

## सुरूप पुरुष.

सुरूप--मदन, स्वामी कार्तिक, अनिरुद्ध, नलकूबर, अश्विनीकुमार, नकुल, नळराज, आणि पुरुरवा.

## दानशूर.

दानी--कामधेनु, चिंतामणि, कल्पद्रुम, जीमूतवाहन, कर्ण, दधीच ऋषि, शिबिराजा, विक्रमादित्य.

## धनुर्धर.

धन्वी–शिव, कृष्ण, इंद्र, परशुराम, श्रीराम, लक्ष्मण, अर्जुन, भीष्म, कृपाचार्य, द्रोणाचार्य, अश्वत्थामा, अभिमन्यु, प्रद्युम्न.

## आधार.

आधार–स्वर्ग, आकाश, भूमि, दिशा, पाताल, पर्वत, वटवृक्ष, तीर, ग्राम, नगर, गृह, प्रासाद, बिछाना आणि आसन.

## नगरी.

पुरी–अमरावती, भोगावती, लंका, अलका, विदर्भा, मिथिला, अयोध्या, कान्यकुब्ज, कुशस्थल, कौशांबी, त्रिपुरी,

काशी, मथुरा, हस्तनापुर, अवंती, पाटलीपुत्र, चंपा, द्वारावती, गया, विदिशा, निषधा, कोटिवर्ष, कांची, तमालिनी, माहिष्मती, भृगु, कच्छ, कांपिल्य आणि वारणावत.

## राजे.

राजे—पृथुराजा, मांधाता, धुंधुमार, पुरूरवा, हरिश्चंद्र, भरत, कार्तवीर्य, युधिष्ठिर, स्वायंभुमनु, ककुत्स्थ, सगर, भगीरथ, नलराज, रघुराज, अजराज, दशरथ, रामचंद्र, कुश, श्रेणिक, संप्रति

## विद्वान् राजे.

प्रतिष्ठान नगरींत शालिवाहन, उज्जयनींत विक्रमार्क धारा नगरींत मुंजराज, भोजराज.

## मंत्री.

मंत्री—बृहस्पति, शुक्र, जांबवान्, माल्यवान्, सालंकायन, कूष्मांड, श्रुतशील, उद्धव, यौगंधरायण, मुद्राराक्षस नाटकांतला राक्षस, चणकाचा पुत्र चाणक्य इत्यादि हे नामांकित प्रधान होत असें समजावें.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षवृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधायां अर्थसिद्धिप्रताने चतुर्थे प्रकीर्णको नाम पंचमः स्तवकः समाप्तः ॥५॥

## संख्या स्तबक ॥ ६ ॥

यानंतर संख्येपासून अर्थोत्पत्ति कशी होते तें सांगतों.

औचित्यानें रचलेले असून संख्येनें ज्याचा क्रम बांधला असे जे उपमादि अलंकार त्यानीं बुद्धिमानानें अर्थाचें समर्थन करावें.

जेव्हा एक संख्येचा पदार्थ विवक्षित असेल त्या वेळीं एकाच संख्येनें दुसरेंही अन्य पदार्थ घ्यावेत. जेव्हा दोन संख्येच्या पदार्थांची विवक्षा असेल तेव्हा द्विसंख्याक अन्य पदार्थ घ्यावे. आणि जेव्हां त्रिसंख्य पदार्थ विवक्षित असेल तेव्हा त्रिसंख्य अन्य पदार्थ घ्यावे. याप्रमाणें अन्य ही संख्या कोणत्याही अलंकारानें संकलित करून काव्यांत संग्रहीत कराव्या. त्याचीं उदाहरणें त्या त्या संख्येनें पुढें दाखविण्यात येतील

### एकच ज्यांची संख्या आहे असे पदार्थ.

जसें—

आदित्य, मेरु, चक्र, प्रासाद, दीपदंड, कलश, खड्ग, हरनेत्र, शेष स्वरदंड, अंगुष्ठ, हस्तिकर, नासा, वंश, विनायकदंत, पताका, मन, शशांक आणि अद्वैतवाद हे सर्व एकेकच आहेत असें सुकवीनें वर्णन करावें.

जसें—

"एकदन्ती जयत्येकदन्तस्तंभं दधत्पुरः ।
योवक्तीव जगद्विघ्नविधाता द्वैतमात्मनः ॥"

### द्विसंख्याक पदार्थ.

भुज, दृष्टि, कर्ण, पाद, स्तन, रामलक्ष्मण, शृंग, गजदंत, प्रीति, रति, गंगा, गौरी, विनायक, स्कंद, पक्ष, नदीतट, रथ-

धुर्य, खड्गधारा, भरत-शत्रुघ्न, कुश-लव, रवि-चंद्र, हे सर्व पदार्थ जोडी जोडीनें आहेत असें वर्णन करावें.

जसें—

"किं भूचरौ तरणिशीतरुची किमन्यौ
रामाच्युतौ किमु गणेशगुहाविहैतौ ।
एतौ पुनः किमुदितौ रघुराजपुत्रा-
विंत्याकुलैर्नृपकुलैः सहसैव दृष्टौ ॥
आश्लिष्यतामथ भुजाविव विक्रमस्य
मूर्तौ सभाग्रभुवमेकधनुर्भ्रमन्तौ ।
नत्वा कृते धनुषि सज्जगुणेऽर्जुनेन
भीमो गदादिदमुवाच भुवामधीशान् ॥
प्रविष्टौ कुरुसैन्येषु द्रुतं भीमघटोत्कचौ ।
भक्ष्येषु सममेव द्वौ बालकस्य कराविव ॥

१ येथें भीम आणि घटोत्कच यांच्या सैन्यप्रवेशाला बालकाच्या हातांची उपमा दिली आहे ती योग्य दिसत नाहीं. यांत उभयतांच्या संप्रवेशें साम्य व एककालिक प्रवेश हे जरी बरोबर आहेत तरी भीम आणि घटोत्कच यासारख्या कठीण, क्रूर व विशाल पुरुषांला लहान बालकाच्या कोमल हातांची उपमा देण्यांत औचित्य नाहींसें होतें हें लक्षांत आणिलें पाहिजे. तसेंच बालकाचे कर हे एका बालकाचे दोन्ही अवयव आहेत व भीम आणि घटोत्कच हे पिता पुत्र आहेत. बालकाच्या हातांचा परस्पर जन्यजनकसंबंध नाहीं पण भीम आणि घटोत्कच यांचा तो संबंध आहे. यामुळें येथें उपमान आणि उपमेय असदृश दिसत आहेत असें आम्हांस वाटतें.

प्रविष्टौ कुरुसैन्येषु द्रुतं भीमधनंजयौ ।
भक्ष्येषु सममेतौ द्वौ भुञ्जानकराविव ॥

या उदाहरणांत क्रमप्राप्त लक्षणें राहात, त्यांचे भुज आणि भीम व अर्जुन यांचें विशेष साम्य दिसून येईल. कारण भीमार्जुन कुरुसैन्याचा नाश करण्याकरितां द्रौपदी एकदम [illegible] पुढें पडले आणि राक्षसांचें [illegible] आपले भाग अर्थात् मनुष्यादिक प्राणी यांचा नाश करण्याकरितां एकदम त्याच्यावर तुटून पडले, असें वर्णन केलें असतां सयुक्तिक होईल असें वाटतें.

पीड्यमाना दृढं ताभ्यां प्रियं दोर्भ्यामिव प्रिया ।
सिस्वेद च चकम्पे च संमुमोह च सा चमूः ॥"

## त्रिसंख्याक पदार्थ.

भुवन, वलि, वन्हि, विद्या, संध्या, गजजाति, शिवनेत्र, त्रिशिरादैत्याचें मस्तक, दशा, क्षेत्रपाल, फणा, काल, संन्याशाचा दंड, त्रिफला, त्रिशूल, त्रिपुण्ड्र, पळसाचीं पानें, कालिदासाचीं काव्यें[1], वेद[2], अवस्था, गंगेच्या प्रवाहाच्या रेषा, त्रिकूट पर्वताचीं शिखरें, महादेवानें नाश केलेलें पुर (त्रिपुर), रात्रीचे प्रहर, यज्ञोपवीताचे दोरे हे पदार्थ वेदिकांनीं व छत्र, प्रदक्षिणा, गुप्ति, शल्यें, मुद्रा, प्रणाम, गौरव, शिव, भवमार्ग आणि शुभेतर हे जैनांनीं तीन तीन आहेत असें गणावें.

हे सर्वही पदार्थ त्रिसंख्यायुक्त काव्यांत योजावे. जसें.—

कण्ठोऽयमस्या मृदुमध्यतार-
स्वरत्रयाधार इति त्रिरेखः ।
मुद्रं ददाति त्रिजगज्जयाय
प्रयाणशङ्खो मकरध्वजस्य ॥

---

१ येथें कालिदासाचीं काव्यें तीनच घेतलीं असून काव्य शब्द सामान्य प्रवृत्तीप्रमाणें दृश्य काव्याचा वाचक घेतला आहे हें उघड दिसतें. यावरून रघुवंश, कुमारसंभव आणि मेघदूत हीं तीनच काव्यें कालिदासानें केलेलीं असें सिद्ध होतें. व यावरून ऋतुसंहारादि जीं इतर काव्यें कालिदासाच्या नांवावर मोडतात तीं त्याचीं नव्हत हें उघड होतें. निदान या ग्रंथकाराच्या वेळीं तरी कालिदासानें तीनच काव्यें केलीं अशी समजूत होती हें अगदीं निर्विवाद आहे.

२ येथें वेदाची त्रिसंख्याक पदार्थांत गणना केली आहे. ती त्रयी अर्थात् ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद या अर्थानें केली आहे असें समजावें. कारण वेद चार असून पुढें चतुःसंख्याक पदांत त्यांची गणना करण्यात येणार आहे.

किं रोमराजी यमुनातटेऽस्या-
वलित्रिदण्डीं कलयन्ननङ्गः ।
कस्यापि रूपेण जितस्तपस्वी
तमेव जेतुं तपते तपांसि ॥
शल्येन धारितस्यासेर्धाराद्वितयत्रिम्भ्रतः ॥
त्रिमूर्तिरिव रेजेऽसौ त्रिवेदी वेदिजोऽर्चितुम् ॥

## चतुःसंख्याक पदार्थ.

ब्रह्मदेवाचीं मुखें, वेद, वर्ण, विष्णूचे भुज, ऐरावतीचे दांत, चतुरिकेचे खांब, संघ.(जैनांचे) समुद्र, आश्रम, घात, गाईचे स्तन, आश्रमकषाय, दिशा, हत्तीच्या जाती, याम (प्रहर), सेनेचीं अंगें, दंड, हस्त, महाजनांत वणिज, दशरथपुत्र व त्यांचे उपाध्याय, ध्यान, कथा, अभिनयाच्या रीति, गाईचे पाय, माल्यस्तवक, हाताच्या घोटांच्या संज्ञा, देवांतले भेद, योजनांचे कोस, आणि लोकपाल हे काव्यांत चतुःसंख्याक योजावे. जसें—

" संसारिस्फुटरोपदोपपटलीखेलाय संश्लेषिणो
मार्गानुग्रतमप्रमादरजनीयामान्तिकामाश्रयान् ।
संसारोरुपुरप्रधानपुरुषान् व्यामोहकारागृह-
हारप्राहरिकान् क्षिपन्ति चतुरः केचित्कषायत्विषः॥

वृकोदराद्याः सहसा मनस्विनः
सहोदरास्तं परिवव्रिरे नृपम् ।
सुहस्तिनोहस्तमिवासुहृद्रण-
च्छिदानिदानंरणपारदारदाः ॥

### पंचसंख्याक पदार्थ.

मदनाचे बाण, पांडव, इंद्रियें, हाताचीं बोटें, शिवाचीं मुखें, महायज्ञ, विषय, व्याकरणाचीं अंगें, व्रतें, अग्नि, सुपार्श्व, नागाच्या फणा, परमेष्ठी ( जैनांचे ), महाकाव्यें, शरीरांतील वायु राहण्याचीं स्थानें, मृगशीर्ष नक्षत्राचे तारे, पंचकुलें, महाभूतें, प्रणाम, पंचोत्तर विमान, महाव्रत, पंचवायु, युद्धस्थानें ज्या-ठिकाणीं श्रम केला असेल त्यांचीं, ह्या वस्तु पांच या संख्येनें कवितेंत योजाव्या.

जसें—

" पञ्चेषु द्विपभेदपञ्चवदनः पञ्चव्रतस्वस्तरुः-
स्वर्णाद्रिः समुदाञ्चिपञ्चविषयव्यापारपञ्चाशुमान् ।
पञ्चांगस्थितिमुक्तपञ्चमगतिः प्रस्थानपञ्चारवः
सेव्यः पञ्चसमितपदादिनिलयः पञ्चेन्द्रियाणां जयः

कर्णस्य सूनुर्वृषसेनवीरः
शरप्रपातैः परिपीडितायाः ।
पञ्चेन्द्रियाणीव परध्वजिन्या
द्राग् द्रौपदेयान् विधुरीचकार ॥

## षट्संख्याकपदार्थ.

रस, राग, व्रज, कोण, त्रिशिराचे नेत्र, अरि, गुण, तर्क, दर्शनें, स्वामिकार्तिकाचीं मुखें, भूखंड, चक्रें हे पदार्थ कवितेंत षट्संख्याक योजावे.

जसें—

" यस्योग्रमूर्त्तेः शरभूर्बभार
षड्भिर्मुखैः षण्मुखतां प्रतापः ।
यत्कुण्डलानीव विरेजुरुच्चै-
श्चञ्चद्द्युतिद्वादशमण्डलानि ॥ "

## सप्तसंख्याकपदार्थ.

द्वापार, विवाह, पाताल, इंद्राचे घोड्याचीं मुखें, दुर्गति, समुद्र, भय, सातविणीच्या झाडाचीं पानें आणि गोदावरी नदीचे प्रवाह हे सात असल्याचें वर्णन करावें.

जसें—

" त्रैलोक्यपालयमपाशनिर्भयभयप्रध्वंसलीलाजय-
स्तम्भादुस्तरसप्तदुर्गतिपरद्वारावरोधार्गलाः ।
प्रीतिप्रोक्षितसप्ततत्त्वविटपिप्रोद्भूतनूत्नाङ्कुराः
शीर्षे सप्तभुजङ्गपुङ्गवफणाः पार्श्वप्रभोः पान्तु वः ॥

## अष्टसंख्याक पदार्थ.

दिशा, देश, दिक्पाल, कुलपर्वत, शिवमूर्ति, वसु, योगा-

चीं अंगें, व्याकरणें, मत्स्यदेवाचे कान, आणि सर्पांचीं कुळें हीं आठ आठ अगत्याचें काव्यांत वर्णन करावें.

जसें—

" अथावनीभारधुरीचकार
जयातिरेकप्रवरो ययातिः।
गीतं दिगन्तेषु यशो यदीयं
श्रोतुं दधेऽष्टश्रुतितां विधाता ॥ "

## नवसंख्याकपदार्थ.

पृथ्वीचीं खंडें, रावणाचीं मुंडं, अमृत कुंडें, जैन, ग्रैवेय, शृंगारादि रस, वाघिणीचे स्तन, गुप्ति, निधि आणि ग्रह हे काव्यांत नवसंख्याक योजावे.

जसें—

" ख्यातिं यत्र नवग्रहास्तिरुदयं नायाति तत्त्वानि यो
व्याचख्यौ न च यस्य वाङ् वसुधाकुण्डत्रपाकारिणी।
नित्यं यत्पदपद्मयुग्मपुरतः पद्मानि देवा नव
व्यातेनुर्नवमो जिनः स जयति श्रीपुष्पदन्तप्रभुः ॥ "

## दशसंख्याकपदार्थ.

रावणाचीं मुखें, अंगुली, चंद्राचे घोडे, यतिधर्म, शिवाचे कर्ण, दिशा, शरीराचीं द्वारें, अवस्था, दशा, हे सर्व पदार्थ काव्यांत दशसंख्याक योजावे.

जसें—

"निजाश्रुनीरैः स्नपिता द्विषद्भिः
प्रदीपिता मौलिमणीमृजाभिः ।
दशापि यत्पादनखाः समीयु-
र्दिशां दशानामपि दर्पणत्वम् ॥"

एकादशसंख्याकपदार्थ.

रुद्र, त्यांचीं अंगें, नेत्र अंगें आणि उपागें (जैनमतांत सांगितलेलीं) ध्रुव, आणि जिनोपासकांच्या मतिमा हे सर्व एकादशसंख्याक काव्यांत योजावे.

जसें—

"पार्श्वः सोऽस्तु मुदे न तस्य फणिनः सप्तास्यचूडामणिः
संक्रान्तः किल यो ऽष्टमूर्तिरजनि सप्ताष्टकर्मच्छिदे ।
यद्रूक्तं दशदिग्जनव्रजमभित्रातुं तथा सेवितुं यं
यत्पादनखाविशत्तनुरभूदेका दशाङ्गो ऽपि सः ॥"

द्वादशसंख्याक पदार्थ.

स्वामी कार्तिकाचे नेत्र, राशी, महिने संक्रान्ति, आदित्यचक्र, राजे, चक्रीहस्त, सभासद, हे द्वादशसंख्याक काव्यांत योजावे.

जसें—

येन द्वादश सद्व्रतानि धनिनां ता द्वादशानुक्रमम्
भिक्षूणा प्रतिमास्तथा निदधिरे सद्भावतो द्वादश ।

दध्नौ च धर्मं स्मृतिभिः पुराणै-
र्विस्पष्टमष्टादशभिः प्रणीतम् ॥ "

## विंशतिसंख्याक पदार्थ.

विष्णूच्या हातांचीं बोटें, विंशोपक, सर्व लोकांच्या हाता-पायांचीं बोटें, रावणाचे नेत्र आणि भुज, हे संख्येनें वीस वर्णावे.

जसें—

" विंशत्या नयनैर्दोर्भिर्विंशत्या दशकन्धरः ।
पश्यन्स्पृश्यन्व्यधाद्वध्वाः स विंशतिगुणं सुखम् ॥"

## शतसंख्याक पदार्थ.

कमळाचीं दळें, रावणाचीं बोटें, इंद्राचे यज्ञ, समुद्राची लांबी (रामेश्वरापासून लंकेपर्यंत) शतपत्राचीं पत्रें, आद्य-जिन, अर्थात् ऋषभदेव आणि धृतराष्ट्र राजा यांचे पुत्र, जपमालेचे मणि, हाराचे मणि, अस्त्रांची कांति आणि कीचक हे सर्व शतसंख्याक योजावे.

जसें—

" हस्तेन चेदिक्षितिपः शतघ्नी-
मुदास घात्याः शतमित्यमर्षात् ।
स्थाप्याश्च पञ्चेति महीं महाङ्घ्रि-
घातेन चक्रेऽङ्गुलिघातचिन्हाम् ॥

पादाङ्गुलीभिर्युधिके ऽपि के ऽपि
कराङ्गुलीभिः परिचूर्णनीयाः ।
घात्या द्विपोऽमी शतमित्यमर्पात्
कृष्णासुतैः पञ्चभिरप्यभापि ॥

## सहस्रसंख्याक पदार्थ.

शेषाचीं मस्तकें, गंगेचीं मुखें, कमलाचीं दलें, सूर्याचे करण, इंद्राचे नेत्र, विश्वामित्राचे आश्रम, पर्जन्याच्या धारा, कार्तवीर्याचे भुज, सामवेदाच्या शाखा आणि पुण्यपुरुषानें पाहिलेले चंद्र हे सहस्रसंख्याक आहेत असें जाणावें.

जसें—

सहस्रपत्रपत्राणां प्रत्येकं स्मेरताकृते ।
सहस्रकरविस्तारं किं सहस्रकरोऽकरोत् ॥

याप्रमाणें दुसरीं हीं आणखीं उदाहरणें जाणावीं. ग्रंथविस्तारभयास्तव ज्या सख्या येथें सांगितल्या नाहींत त्याहीं काव्याच्या उपयोगाकरितां प्रेक्षावानांनी यथायोग्य पाहून घ्याव्या.

इति श्रीजिनदत्तसूरिशिष्यश्रीमदमरचंद्रविरचितायाः काव्यकल्पलतायाः कविशिक्षावृत्तेः महाराष्ट्रभाषाविवृतौ काव्यकल्पलतामंजर्यभिधायां अर्थसिद्धिप्रताने चतुर्थे संख्यास्तबको नाम षष्ठःस्तबकः समाप्तः॥६॥

---

## समस्यास्तवक ॥ ७ ॥

### कल्पादिकालनें, सिंधूनें व लघूनें गुरुत्व वर्णन करावें.

लघुपदार्थाची कल्पादिकालनें, समुद्रानें व दुसऱ्या लघुपदार्थानें गुरुता म्हणजे मोठेपणा वर्णन करावा.

कल्पादिकल्पनेनें गुरुत्व,

जसें—

"कल्पादिकाले गुरुदेहदेशा
पिपीलिका राजति शैलतुल्या ।
तस्मिंश्च सत्यं धरणीधरोऽपि
विगाहते देवगिरींद्रशोभाम् ॥"

ज्या हेतुस्तव कल्पाच्या प्रथम सर्वही पदार्थ अत्यंत मोठे होतात त्या हेतुस्तव सर्वत्र लघुपदार्थांचें औचित्य असेल त्याप्रमाणें कल्पाच्या आदिकालांत गुरुत्व आरोपित करावें.

---

१ 'समस्या' हा शब्द लोकांच्या बराच ओळखीचा आहे. सामान्यतः समस्येच्या संबंधाचे वरचेवर प्रसंग केव्हां केव्हां सानत होतात, व पूर्वीचे कवि व काव्यें यांचे भोक्ते जे भोज, विक्रमादित्यादि विद्वान राजे इत्यादि यांच्या दरबारात या समस्येचें फारच मोठें माहात्म्य होतें. कविता करणाराची परीक्षा करण्याची समस्या ही कसोटी आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. समस्या शब्दाचा अक्षरशः अर्थ केला तर—समसन म्हणजे पूरण तो समास समास जिचें प्रयोजन आहे ती समस्या अर्थात जी पूरणसाकांक्ष आहे ती असा होतो. सामान्यतः कोणता तरी अर्थ ज्याला पूर्ण करण्याची अपेक्षा आहे असा घेऊन त्याचा एक चरण अथवा चरणाचा कांहीं भाग करावा व त्याला यथोचित रीतीनें साजेल अशा रीतीनें तें पद्य पूर्ण करावें. अशा प्रकारच्या कवितेला समस्या म्हणतात ही दोघाकडून अथवा एकाचकडून पूर्ण होते. भोजराजादिक आपल्या पदरच्या कवीला वर सांगितल्या प्रकारचा एखादा चरण म्हणून दाखवीत व ते कवि त्याची योग्य रीतीनें पूर्तता करीत अशा प्रकारच्या शेंकडों कथा वद्धश्रुत व रसिकलोकांच्या ऐकण्यात असतील. हा संपूर्ण स्तबक अशा प्रकारच्या समस्यांनीं भरला आहे वाचकाच्या लक्ष्यात येण्याकरितां समस्येचा भाग मोठ्या अक्षरात देऊन पूरणाचा भाग त्यापेक्षां बारीक अक्षरात लिहिण्याचा क्रम ठेविला आहे ही व्यवस्था या स्तबकांत येणाऱ्या प्रत्येक उदाहरणात दिसून येईल.

## समुद्रानें गुरुत्व.

"अहो पयोराशिविलासियादः
पिपीलिका राजति शैलतुल्या।
सदा जनानां महतां निपङ्गी
दत्ते लघूनामपि गौरवाणि ॥"

ज्या हेतुस्तव—

मनुष्य, हत्ती, घोडे, इत्यादि जीव स्थलावर जेवढे दिसण्यांत येतात तेवढे सर्वही उदकामध्यें आहेत. त्यांचा निर्देश जल शब्द पूर्वी लावून (जळमाणूस, पाणघोडा इत्यादि प्रकारें.) करावा.

मुळांत सांगितल्याप्रमाणें स्थिति असल्यामुळें समुद्रांत असलेल्या लघुमाण्यांलाही गुरुत्व आहेच असें मानिलें पाहिजे, अर्थात् पाणघोडा स्थलावरच्या घोड्यापेक्षां मोठा असें मानिलें पाहिजे.

## लघूनीं गुरुत्व.

जसें—

"कुन्थुप्रमाणेन महत्तमाङ्गी
पिपीलिका राजति शैलतुल्या।
यस्मादधोधः परिदर्शनेन
सदा लघूनामपि गौरवाणि ॥"

इत्यादि उदाहरणें जाणावीं. याप्रमाणें वर सांगितलेल्या तिन्ही रीतींनून औचित्यानें जी रीत मोठ जमेल तेथें त्या त्या रीतीनें सर्वत्र लघु पदार्थांवर गुरुत्व आरोपित करावें.

## लघुत्वारोपाचे प्रकार.

युगांत दूरावलोक व गुरु यांहीं लघुता विधान करावी.

जो पदार्थ मोठा असेल तो युगाचा शेवट (अर्थात् चौकडीतल्या शेवटच्या युगाचा शेवट), दुरून पाहणें व गुरु वस्तु यांहीं लघुता स्थापित करावी.

युगांतानें लघुत्व.

जसें—

" कल्पान्तकालनलिनीकृतदेहदेशः
शैलो बिभर्ति परमाणुसमत्वमेषः ।
पूर्वं युगादिसमये विभराम्बभूव
यो जातरूपधरणीधरसन्निभत्वम् ॥"

ज्या हेतूस्तव कल्पांतीं सर्व पदार्थ लघु असण्याचा संभव आहे त्या हेतुस्तव कल्पांतानें गुरु पदार्थावर लघुत्व आरोपित करावें.

दूरावलोकनानें लघुत्व.

जसें—

" स्थूलोन्नतो ऽपि परमाम्बरवर्तमान-
धावद्विमानचरखेचरकामिनीनाम् ।
अभ्यागतो नयनवर्त्मनि सत्यमेव
शैलो बिभर्ति परमाणुसमत्वमेषः ॥"

ज्याकरितां दूर असलेला पदार्थ मोठा असला तरी लहानासारखा भासतो त्याकरितां दूरत्वानें त्याच्यावर लघुत्व आरोपित करावें.

गुरूनीं लघुत्व.

जसें—

" कल्पान्तकालधरणीधरणप्रवृद्ध-
कोलाधिराजतनुमानविलोकनेन ।

शैलो बिभर्ति परमाणुसमत्वमेष
नो कस्य लाघवमहो गुरुसन्निधाने ॥"

इत्यादि प्रकारानें अत्यंत मोठे असलेल्या पदार्थानें मध्यम मोठा असलेल्या पदार्थाची लघुता सिद्ध करावी.

याप्रमाणें वर गुरूला लघुत्व देण्याच्या तीन रीति सांगितल्या आहेत. यांतून जेथें जी रीत औचित्यानें योग्य असेल तेथें त्या रीतीनें लघुत्वाचें विधान करावें.

## युग्मरूपविधान.

उदकादिकांचे ठायीं प्रतिबिंबाच्या योगानें दोन्ही होतात.

उदक, दर्पण, स्फटिकादिकांची भूमि इत्यादिकांच्या ठायीं प्रतिबिंब पडल्यानें एकच वस्तु दोन असल्या सारख्या दिसतात. जसें—

" पश्चिमाद्रेर्मणिशिरः क्रान्ते पूर्वाद्रिगे रवौ ।
लोकैर्विशङ्क्यते किं भोः समुदेति रविद्वयम् ॥ "

## वैपरीत्य.

कृष्ण प्रतिबिंबित झाल्यानें वैपरीत्य.

कृष्णाचें तोंड खालीं केल्यानें व प्रतिबिंबित झाल्यानें वैपरीत्य झाल्याचें वर्णन करावें. जसें—

अधोमुखाचें उदाहरण.

जसें—

" कालियाहिग्रहव्यग्रे यमुनायां जगन्निधौ ।
झम्पयाऽधोमुखे जाते विपरीतं जगत्त्रयम्॥ "
भूपाल तव यज्ञस्य धूमवर्तिरधोमुखे ।
पयोधिप्रतिमा भाति श्वभ्रपाथित्र्यहेतवे ॥ "

प्रतिबिंबिताचें उदाहरण.

जसें—

" तडागी दर्पणभयजलसंक्रान्तितोऽभवन् ।
जलशायी कृतः कृष्णप्रासादः कलशोपरि ॥
अस्ताद्रिमस्तकगणिमगुणक्ष्मायाः-
मादर्शसन्निभरुचौ प्रतिबिम्बिताङ्गः ।
आशंक्यते दिनमुखे वरुणेन सोऽप्य-
मभ्युद्यतो दिनकरः खलु पश्चिमायाम् ॥ "

यापमार्गे वैपरीत्याचरा दोन रीति घर सांगितल्या. त्यांपैकीं जेथें जी रीत जमत असेल तेथें त्या रीतीनें निर्वाह करावा. कोणत्याही प्रपंचानें कृष्णाला विपरीत केला असतां त्याचा उदरांत असलेल्या जगत्रयांत असलेला पदार्थ विपरीत असल्याचें वर्णन करावें. याविषयीं यात्र सूत्रकारानें ( अरिसिंहानें ) रचलेली समस्या सांगतों.

जसें—

" कल्पादिसमये यस्मिन् कीटिका कुम्भिसन्निभा ।
कुम्भी पुनर्महाशैलस्पर्धिदेहाकृतिस्तदा ॥
माहात्म्यं तस्य पाथोधेर्व्याख्यातुं कुत्र शक्यते ।
सापि यत्र बभौ तोयकीटिका कुम्भिसन्निभा ॥
परमाणुतनोरग्रे कीटिका कुम्भिसन्निभा ।
कुम्भीन्द्रोऽपि सुवर्णाद्रिमाननः कीटिकायते ॥
युगान्तसमये यस्मिन् वारणः कीटिकासमः ।
तस्मिन् पिपीलिकामानं लक्ष्यतामिति न क्वचित् ॥

महागिरिशिरःस्थानां वारणः कीटिकायते ।
महापर्वतमानेन वारणः कीटिकायते ॥
साधुचित्तानुमानेन पर्वतः कीटिकायते ॥
पूर्वाद्रिरत्नभित्त्यन्तर्जाताद्रिप्रतिबिम्बतः ।
शङ्क्यते शक्रकान्ताभिः किमुदेति रविद्वयम् ॥
यमुनाह्रदभूम्यायामधोवक्त्रे जगन्निधौ ।
तदा सम्भाव्यते ननु स्वर्गोपरि मही बभौ ॥"

## विपर्यय.

चंद्र, अंधकार, रवि, कीर्त्ति, कुकीर्त्ति, सन्ध्याराग इत्यादिकांच्या संगानें वर्णविपर्यय झालेल्यानें.

काळा, लाल, पिंवळा, निळा, इत्यादि वर्ण चंद्रानें श्वेत केले जातात. जसें—

"पर्णार्द्रमहिमद्योतद्योतितविद्योतितांऽभितः ।
कैलासगिरिसंकाशः काशते विन्ध्यभूधरः ॥
जपापुष्पं जातिसुमं सुवर्णं रजतप्रभम् ।
सुधाकरकरस्पर्शान्मषीचन्दनवद्बभौ ॥ "

रक्त, पीत आणि श्वेत इत्यादि वर्ण अंधकारानें काळे केले जातात. जसें—

"कैलासो विन्ध्यसङ्काशः कर्पूरः कज्जलप्रभः ।
जपातापिच्छगुच्छश्रीरन्धकारैर्विनिर्ममे ॥ "

कृष्ण श्वेत, इत्यादि वर्ण बालसूर्यानें, संध्याकाळच्या सूर्यानें अथवा केवळ सूर्यानें लाल केले जातात.

जसें—

"कज्जलं कुसुमच्छाया जातीपुष्पं जपासुमम् ।
सुवर्णं पद्मरागश्चि प्रभातार्कप्रभावृतम् ॥

या रीतीनें सर्वत्रही औचित्य पाहून रंगाचा विपर्यय केला जातो. आणि जेव्हां चंद्र, अंधकार आणि सूर्य यांच्याच रंगाचा विपर्यय कर्तव्य असेल तर कीर्ति, कुकीर्ति, सन्ध्या, इत्यादिकांनींच त्यांचा वर्णविपर्यय करावा; तसाच अन्यवस्तूंनाही चंद्रादिकांप्रमाणें त्यांनीं वर्णविपर्यय करावा. जसें—

" स्वर्धुनीसलिलसन्निभस्फुर-
त्तावकीननवकीर्त्तिमण्डलैः ।
विस्तृतैस्त्रिजगति क्ष्मापतेः
शीतरश्मिरिव वीक्ष्यते रविः ॥ "

अन्य वस्तूचा वर्णविपर्यय.

जसें—

" मेदिनीदयित तावकैर्भृशं
सङ्कुशः समुदयैः समुच्छ्रितैः ।
क्षीरनीरनिधिसोमकोमलैः
कज्जलं रजतसन्निभं बभौ ॥
हिमाद्रिसदृशो मेरुः कुङ्कुमं शशिसन्निभम् ।
भूमीधव भवत्कीर्त्या शोभते भुवनत्रये ॥ "

कुकीर्त्तिनें वर्णविपर्यय.

जसें—

" भूमिपाल भवदीयविद्विप-
न्मेदिनीपतिकुकीर्त्तिपंक्तिभिः ।
प्रावृषेण्यजलवाहकान्तिभिः
श्यामलो जयति कज्जलोपमः ॥ "

अन्य वस्तूंचेही.

जसें—

" मेदिनीदयित तावकाद्विप-
त्संविसारिकुयशःकदम्बकः ।
अन्धकारनिकरैरिवोदितैः
कुङ्कुमं जयति कज्जलोपमम् ॥
हिमाद्रिर्विन्ध्यबन्धुश्रीः स्वर्ण मरकतप्रभम् ।
महीधव तवद्वेपिकुकीर्तिप्रसरैर्बभौ ॥ "

सन्धीनें वर्णविपर्यय.

जसें—

" पूर्वभूधरशिरस्तटीगतः
सान्ध्यरागपटलैः परावृतः ।
प्रेक्ष्यते ऽत्र रजनीमुखे ऽधुना
विद्रुमप्रतिमदीधितिर्विधुः ॥ "

अन्यवस्तूच्या योगानें वर्णविपर्यय.

जसें—

" कान्तकोपपरवामलोचना
लोचनान्तविततारुणद्युतौ ।
सान्ध्यरागपटले सति क्षणं
कज्जलं भवति कुङ्कुमोपमम् ॥
स्वर्णसिन्दूरपूरश्रि कर्पूरं पद्मरागरुक् ।
जपाकुसुमसङ्काशैः सन्ध्यारागभरैरभूत् ॥ "

वर्णान्तरानें वर्णविपर्यय.

यानंतर दुसऱ्या वर्णांच्या संगानें वस्तूचा वर्णविपर्यय केला जातो.

जसें—

" शशिमुकुटललाटे शैलजागण्डपाली
विगलितमृगनाभिव्यक्तघर्माम्बुसिक्तः ।
समजनि नरकारिश्यामलो यामिनीशः
श्रयति मलिनसङ्गात् कश्मलत्वं न को वा ॥
मसृणघुसृणपङ्कप्रक्रियाप्राग्रजाग्र-
त्कुचकलशविलासैः कम्बुकुन्दोज्ज्वलोऽपि ।
समरुणदरुणत्वं कामिनीकण्ठहारो
जगति भवति रागो रागिसङ्गान्न कस्य ॥

क्षितिधरपतिपुत्रीमौक्तिकव्यक्तिभङ्गी-
निलयवलयमाला कान्तिजालावलीढः ।
हिमरुचिरुचिरासीन्नीलकण्ठस्य कण्ठो
भवति विमलयोगान्निर्मलत्वं न कस्य ॥

याप्रमाणें वर सांगितलेल्या रीतीनें सर्वत्र वर्णविपर्यय कसा करावा तें जाणावें.

आणखी ही कांहीं उदाहरणें.

जसें—

"धर्मध्यानव्यसनरसिकास्पष्टमष्टाङ्गयोगा-
त्कैयं बाला पतितदशना पाण्डुरीभूतकेशा ।
भक्तिव्यक्तप्रणतशशभृत्पादजाग्रन्नखाग्र-
ज्योतिर्जालैस्त्रिदशतटिनीनीरधिकारधीरैः ॥
रङ्गेऽस्मिन् रङ्गदभ्रंलिहगृहवलभीवर्यवैदूर्यतिर्य-
ग्ज्योतिर्जातप्रयाताद्युतिकरविधुरीभूतशोभाविभूतिः ।
कालिन्दीकालकान्तिःसमजनिरजनीजीवितव्याधिनाथो
धत्ते को वा कलावानपि नहि मलिनासङ्गतःकश्मलत्वम् ॥
अहो राहुग्रहग्रस्तसमस्तोज्ज्वलमण्डलः ।
इन्दुः कज्जलबिन्दुश्रीर्हानिः कस्य न विप्लवे ॥"

याप्रमाणें सर्वत्रही सगतीनें रगाना व्यतिक्रम करावा.

दुसरा प्रकार.

दृष्टांतबद्ध 'यदि' शब्द युक्त असल्यानें.

दुसऱ्या वस्तूचें निदर्शन हाच दृष्टांत होय. त्या वस्तूच्या स्वभावानें अन्य अर्थाचे ठायीं जर शब्द 'यदि' या शब्दानें संयुक्त केला तर समस्या पूर्ण होते. जसें—

" प्रतीच्यां यदि मार्तण्डः समुदेति स्फुरत्करः ।
तदा सञ्जायते नूनमग्निस्तुहिनशीतलः ॥ "

याप्रमाणें सर्वत्र समस्या पूर्ण होते असें जाणावें.

प्राचीनांहीं.

प्राचीन कवि, राजे यांच्या चरित्रानें समस्या पूर्ण केली जाते. जसें—

" अगस्तिमुनिनिष्पीतनिःशेषजलमण्डलात् ।
अहर्पतिमहःशुष्कात्समुद्राद्धूलिरुत्थिता ॥"

याप्रमाणें दुसरींही उदाहरणें विचार करून पहावीं.

समस्यापूरणाचा दुसरा प्रकार.

वात्सल्य, शोक, मधु, घात, वियोग, आणि उन्माद यांहीं.

वात्सल्यानें.

वत्सलत्वानें समस्येचें पूर्णत्व होतें. जसें—

" अतुच्छसुतवात्सल्यपिच्छलीभूतचेतसा ।
सोग्रमूर्त्तिः क्षमी व्याघ्रो जनन्या मन्यते ध्रुवम् ॥ "

इत्यादि उदाहरणें जाणावीं–शोक, मधु, घात आणि उन्माद यांनीं ही समस्या पूर्ण होते. कारण शोकवियोगादिकांनीं व्याप्त झालेला पुरुष अघटित कांहीं तरी बडबडतो. अर्थात् त्यांच्या योगानें समस्या पूर्ण होणें योग्य आहे.

## दुसऱ्या रीतीनें समस्येची पूर्णता.

स्वप्न, इंद्रजालिक, मतिभ्रम, चित्र, माया, मंत्र, औषधी, मणि, तप, पद, भग इत्यादिकांनीं व शौर्योपमा, वांछित, मनोगति, पुण्य, दैव, प्रसाद, प्रश्नोत्तर, क्षय, समास आणि विभिन्नसाध्य यांहीं समस्या पूर्ण होते.

### स्वप्नानें.

स्वप्नानें समस्या सिद्ध होते कारण स्वप्नांत अघटित असेंही घडल्यासारखें वाटतें जसें—

" निद्रामुद्रापरिचयलवान्मुद्रितानन्तचिन्ता-
चित्ते चित्ते निभृतममृतज्योतिषि म्लानधाम्नि ।
प्रातः स्वप्नेऽरुणकपिशितं प्राग्दिशीकोऽथ कस्मा-
दाकाशस्थं जलचरपदं दृष्टिहीनो ददर्श ॥ "

'अहो ज्योतिष्कलेंत परमदक्ष ( जोशीबुवा ) मी स्वप्नांत अमुक पाहिलें त्याचा तुम्ही विचार करा' असें स्वप्न पडलेला मनुष्य ज्योतिष्याला सांगत आहे इत्यादि प्रकारची कल्पना करून वर्णन करावें

इंद्रजालानें अघटित अशाही सर्व गोष्टी घडतात तसेंच बुद्धिभ्रंश नेहीं पाहिजे तसें सर्व घडतें चित्रांत विसदृश असेंही काढलें तरी प्रभवतें 'अहो चित्रकार असें चित्र काढा' याप्रमाणें एक मनुष्य दुस-

स्वर्गलोकाचें अवतरण, जगाच्या प्रलयानें मर्त्यलोकाचें अवतरण, महाच्या अस्तानें नभोलोकाचें अवतरण. जसें—

" श्रीहट्टकेश्वरस्वामिनमस्करणकारणात् ।
सुरेन्द्रादिभिरायातैः स्वर्गः पातालमाययौ ॥
कदाचिच्चारभेदेन क्रमादस्तमुपागतैः ।
ग्रहैः सम्भाव्यते नूनं पातालं प्रययौ नभः ॥ ।

पृथ्वीवर अवतरण.

यानंतर पृथ्वीवर समुद्रमंथनाच्या निमित्तानें स्वर्ग आणि पाताल यांचें पृथ्वीवर अवतरण व प्रतिबिंबभावानें नभोलोकाचें अवतरण कसें करावें तें दाखवितों, जसें—

" समुद्रमथनारम्भे मिलितैरमरादिभिः ।
पृथिव्यां स्वर्गपाताले दृश्येते स्फुटमागते ॥
दर्पणप्रतिमोल्लासि जलपूरसरोम्बरे ।
प्रतिबिंबच्छलादेतद्भुवि व्योम समागतम् ॥ ॥"

आतां आकाशांत संग्रामानें स्वर्गाचें, हरिश्चंद्र नक्रिपुरानें मर्त्यलोकाचें, चंदन आणि शस्त्रपात यांहीं नागलोकाचें अवतरण झालें असें वर्णन करावें. जसें—

" रणप्रवणवीराणां विलोकनकुतूहलात् ।
समायातैः सुरेन्द्राद्यैः स्वर्गो नभसि दृश्यते ॥
आकाशान्तरसंचारिहरिश्चंद्रपुरीच्छलात् ।
भौमस्य मिलनायेन जगाम जगतीं नभः ॥